Publish
Sat Vi
Nirmal
2, Dr.
Mumb
Phone

E-M
satv

Publ

©

30
Ju

# हृद्गत

आजच्या विज्ञानयुगात ज्यावेळीं मानव स्वत:च्या बुद्धीच्या शक्तीने चंद्र-सूर्याला पकडण्याच्या व त्यांच्यावर वसाहत करण्याच्या हिंमतीने उड्डाण करीत आहे व अगाध सागराच्या तळाला मुक्त संचार करूं शकत आहे अशा काळात या पुस्तकाचें शीर्षक 'श्राद्ध' वाचून सहज आश्चर्य वाटेल. वाचक-समुदायाला हा शब्दच अतिशय प्राचीन वाटेल. आज मानव आकाशात व समुद्राच्या तळाला मुक्त संचार करूं शकतो परंतु या भूमीवर शांतीने व समाधानाने कसें राहायचें हें त्याला माहीत नाहीं. मानवाची वैयक्तिक तशीच सामाजिक उन्नति व्हावी यासाठीं ज्या ऋषींनी, ब्रह्मर्षींनी जीवनविषयक प्रयोग करून, स्वत:च्या रक्ताचें पाणी करून संस्कृति उभी केली त्यांचें श्रद्धेने स्मरण केलें पाहिजे. या ऋषिमुनींनी प्रयोग करून स्वत:चे अनुभव लिहून ठेवले आहेत. परंतु आपण श्रद्धापूर्वक त्यांच्याजवळ जातच नाहीं. त्यामुळें शांति, समाधान व स्वास्थ्य गमावून बसलो आहोत. श्राद्ध म्हणजे श्रद्धेने केलेलें स्मरण, श्राद्ध म्हणजे पूर्वजांबद्दलचा आदर, श्राद्ध म्हणजे कृतज्ञता. ब्रह्मर्षि, देवर्षि, ज्ञानी भक्त व भारतीय संस्कृतीचे प्रणेते दधीची, याज्ञवल्क्य, वसिष्ठ इत्यादींची चरित्रें वाचून त्यांचें भावपूर्ण स्मरण करण्याचें सद्भाग्य जेव्हा लाभेल तेव्हा खरें! परंतु जीवनपथाची पायवाट दाखविणारे दासो दिगंबर, त्यागराज, ऋतुध्वज, एकनाथ वगैरेंचें श्रद्धापूर्वक स्मरण या पुस्तकात केलें आहे.

भारतीय संस्कृतीत त्याग व पवित्रता या दोन गुणांना अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. भारतीय मनुष्य केवळ पैशांना, केवळ सत्तेला महत्त्व देत नाहीं. सत्ता-संपत्तीबरोबर त्याग व पावित्र्य असलें पाहिजे. भारतीय जनतेने कधी राजाची पालखी उचललेली नाहीं. परंतु संतांची पालखी तर प्रतिवर्षीं हजारो लोक उचलत आहेत. भारतीय संस्कृतीत एकएका सद्गुणासाठीं, एकएका ध्येयासाठीं स्वत:चें सर्वस्व अर्पण करणाऱ्या महान् विभूती दिसतात. भारतीय संस्कृति या महान् विभूतींचा इतिहास आहे. असें म्हणतात कीं महापुरुषांचें चरित्र म्हणजेच इतिहास. भारतीय

संस्कृतीचा इतिहास म्हणजे भारतीय संतांचा इतिहास. भारतीय वीरांचा इतिहास.

कच्छ, सौराष्ट्र, गुजरात व महाराष्ट्र येथील धर्मयात्रेच्या कार्यक्रमाची सुरुवात तीर्थरूप पूजनीय पांडुरंगशास्त्री आठवले, या महान् विभूतींना श्रद्धांजलि अर्पण करून व नमस्कार करून करीत असत. ही भारतीय महानुभावांची चरित्रें तत्त्वज्ञान मासिकातून प्रसिद्ध झालेली आहेत. त्यांतील कांहीं चरित्रें आज या पुस्तकाकारात प्रकाशित करताना अत्यानंद होत आहे. भारतीय महानुभावांचें चरित्र-चित्रण तीर्थरूप पूजनीय शास्त्रीजींसारखी विरला व्यक्तीच करूं शकते. चरित्र-चित्रण करताना त्यांच्या वाणीमागें त्यांचें विलोभनीय जीवन सतत डोकावत होतें. एवढेंच नव्हे तर त्यांच्या हृदयातील भाव, भावाश्रू व आनंदाश्रूंच्या रूपात त्यांच्या नेत्रांद्वारे व्यक्त होत होता. श्रोते देखील त्यांच्या अस्खलित वाक्प्रवाहात वाहून जात होते. त्यांच्या वाणीचा स्रोत अगाध होता. त्याला शब्दांचें रूप देऊन महान् चरित्रांचा पहिला भाग पुस्तकाकारात प्रकाशित होत आहे. त्यांत कांहीं दोष सापडलें तर ते संकलन करणारांचे आहेत. कितीही झालें तरी जीवंत चैतन्याचे शब्द व लिहिणें यांत फरक राहणारच. असें असलें तरी या भारतीय महानुभावांचें स्मरण भारतीय अस्मिता जागृत करील, जीवनात मार्गदर्शन करील याची खात्री आहे.

वाचकांनी हें पुस्तक वाचून, पूर्वजांचें स्मरण करून तर्पण करावें व जीवन कृतार्थ करावें हीच प्रार्थना.

– सद्विचारदर्शन

*****

# अनुक्रमणिका





# दासो दिगंबर

मोंगलांनी भारत देशात आपलें आसन स्थिर केलें होतें, बाटवाबाटवीचे प्रकार चालत होते. त्या काळची ही गोष्ट. मराठवाड्यात दिगंबरपंत कुळकर्णी या नावाचे एक सात्त्विक, सधन व धर्मनिष्ठ ब्राह्मण गृहस्थ राहात होते. ते स्वभावाने अति प्रेमळ व दयाळू अंत:करणाचे होते. मोंगलांचा सरकार-सारा वसूल करण्याचें काम त्यांच्याकडे होतें. त्या काळीं सरकार-सारा पैशांच्या रूपाने न घेता धान्याच्या रूपाने घेत असत. साऱ्याच्या रूपाने जमा केलेलें धान्य सरकारी गोदामात एकत्र केलें जाई. दिगंबरपंत या गोदामाचे कारभारी होते. आपलें हें काम दिगंबरपंत अगदी चोख बजावीत. त्यांचा तसा नाव-लौकिकही होता.

या दिगंबरपंतांच्या मुलाचें नांव दासो. तो अतिशय चलाख होता. त्याची बुद्धि फारच तीव्र होती. पाहाता पाहाता एखादी गोष्ट चटकन् त्याच्या ध्यानात येई. मग तो वडिलांना प्रश्न विचारी. त्यांना भंडावून सोडी.

एकदा आपल्या वडिलांबरोबर तो फिरायला गेला होता. वाटेत त्याने पाहिलें : काहीं लांबलांब दाढीवाले, लुंगीधारी मुसलमान गोरगरीब लोकांना मुसलमानी धर्माची श्रेष्ठता समजावीत होते. दासोने वडिलांना विचारलें :

'बाबा! हे कोण हो?'

'मौलवी!'

'कशाला आले आहेत?'

'धर्म-प्रचारासाठीं.'

'कोण पाठवतो यांना?'

'बादशहा!'

'खाणें कोण देतो!'

'बादशहा!'

'बादशहाजवळ एवढा पैसा कोठून येतो?'

'साऱ्याच्या रूपाने!'

'काय; साऱ्याचा पैसा या कामीं वापरतो बादशहा! हिंदूंचा पैसा आणि मुस्लीम धर्माचा प्रचार! लोकांचा पैसा लोकांच्या कामीं न लावता स्वत:च्या मर्जीने या मौलवींना पोसण्यासाठीं वापरतो, त्या राजाला काय धार्मिक म्हणायचें?'

दासो असें कांहीं तरी वडिलांना विचारी आणि दिगंबरपंत अवाक् बनत. या मुलाला कसें समजवावें हें त्यांच्या ध्यानी येत नसे. मग ते खिन्न बनत. त्यांना वाटे : आपल्या हातून कांहीं तरी अपराध घडतो आहे. त्यांचें मन त्यांना सतत टोचत राही कीं, एका क्षुद्र, अनीतिमान्, अधार्मिक राजाची तू नोकरी करतो आहेस.

पण नोकरी सोडण्याचें धाडस त्यांच्या हातून घडत नव्हतें. अनेक प्रश्न त्यावेळीं डोळ्यांसमोर उभे राहात. त्यात त्यांना दासोचें भवितव्य दिसे आणि सारें दु:ख गिळून ते आपल्या रोजच्या कामाला लागत.

पुन्हा एकदा असाच एक प्रकार घडला. एक नर्तकींची टोळी छुमछुम् पैंजण वाजवीत राजदरबाराकडे जात होती. दासोने त्यांना पाहिलें. त्या विचित्र, भडक वेषधारी स्त्रिया पाहून दासोने विचारलें :

'बाबा! या बाया कोण हो?'

'नर्तकी! बादशहाला त्यांचा नाच पहायचा आहे. त्यासाठीं त्या दरबाराकडे चालल्या आहेत.'

'यांना द्यायला बादशहा कोठून पैसा आणणार?'



'बादशहाची असली सारी कामें लोकांनी दिलेल्या साऱ्यातूनच चालतात.'

वडिलांच्या उत्तराने दासो एकाएकी चिडला, लालीलाल झाला. त्याच्या आवाजाने पंचम गाठला. जणूं काय तो सिंहासारखा गर्जत होता.

'राजाचे भोग-विलास पुरविण्यासाठीं कां आम्ही कर भरायचा! प्रजेच्या पैशांवर चैन-मौज करणारा हा राजा अधार्मिक आहे. त्याला सारा देणें पाप आहे. बाबा! तुम्ही नोकरी सोडून द्या. तुम्ही रक्ताचें पाणी करून शेतसारा जमा करायचा व या बादशहाने तो बायांपाठीमागें उधळायचा! साऱ्याचा पैसा लोकांसाठीं, संस्कृतीसाठीं, ईश्वरासाठीं वापरायला पाहिजे. तो तसा वापरला जात नाहीं. बाबा! तुम्ही बादशहाच्या पापाचें वाटेकरी होणार?'

दासोचें म्हणणें सयुक्तिक होतें. पण त्याप्रमाणे आचरण करण्याची हिंमत दिगंबरपंतांमध्ये नव्हती. ते दूरवरचा विचार करीत. 'नोकरी सोडली तर कुटुंबाचें काय? आपला नोकरी सोडण्याचा हेतु बादशहाला कळला व बादशहाने घरादारावरून नांगर फिरवला, तर माझ्या दासोचें काय होईल? ही अपरिपक्व बुद्धि, पक्व होईपर्यंत तिची जोपासना करणें माझें काम आहे. त्यासाठीं मान व मन यांचा विचार करून चालणार नाहीं.'

दासोच्या तीव्र बुद्धीचा व भवितव्याचा दिगंबरपंत अशा तऱ्हेने सतत विचार करीत. त्यामुळें मोंगलांची नोकरी सोडणें त्यांना जमत नसे. दिवसांमागून दिवस जात होते. जगाचें रहाटगाडगें चालू होतें. सूर्य उगवत होता, मावळत होता. चंद्र आल्हाददायक प्रकाश देत होता. तारे लुकलुकत होते. वारा वाहात होता. पाऊस पडत होता. लोक आपापली कामें गुण्यागोविंदाने करीत होते.

आणि एक साल असें उजाडलें कीं त्या वर्षीं मराठवाड्यात पाण्याचा एक थेंब ही पडला नाहीं. बादशहाने मात्र जबरदस्तीने आपला सारा वसूल केलेला होता. त्यामुळें लोकांकडचें असलें-नसलेलें धान्य संपलें होतें. ते कंगाल झाले होते. त्यांच्या घरात दाणा शिल्लक राहिला

नव्हता. छातीवर लाथा मारून विपुल धान्य पिकविणाऱ्या शेतकऱ्यांवर धरणीमाता रागावली होती. मुलाच्या अक्षम्य अपराधाबद्दल अदय दंड देत होती. लोक धान्याच्या कणाकणासाठीं दारोदार हिंडत होतें.

अशा या घटनेला दुष्काळ म्हणतात. त्या दुष्काळात लोक अन्नपाण्यावाचून तडफडूं लागलें. दासोच्याने तें पहावलें नाहीं. तो आपल्या वडिलांजवळ गेला. त्यांना विनवूं लागला :

'बाबा! किती काळजी घेता माझी! आई मला पोटभर जेवूं वाढते. पण बाबा! माझ्या मित्रांना दोन दिवस काहींच खायला मिळालें नाहीं. लोकांच्या घरात धान्याचा एक कणही शिल्लक नाहीं, पण राजाची ही कोठारें मात्र काठोकाठ भरलेली आहेत! वस्तुतः हें धान्य लोकांचें आहे. लोकांनी ढोर मेहनत केली, रक्ताचें पाणी केलें म्हणून देवाने त्यांच्या प्रयत्नांना यश दिलें, हें धान्य पिकलें. तें धान्य पिकविणारें लोकच आज उपाशी आहेत!'

'दासो!' दिगंबरपंत कळवळून बोलत होते. 'मला पटतात तुझे विचार. हें धान्य कोठारात आहे, म्हणून तें सरकारचें आहे. त्यातला एक कणही कुणाला द्यायचा झाला तर त्याला सरकारची परवानगी लागते.'

'बाबा! तुम्हीच विचार करा. एक दिवस मला जेवूं नाहीं मिळाले तर तुम्हाला काय वाटेल! कल्पना करा : लहान लहान बालकें आपल्या आईजवळ खायला मागत असतील. आपल्या आईच्या पदराचा सोगा पकडून, रडून रडून आळवीत असतील : 'आई आम्हाला खायला दे! भूक लागलीय!' त्या वेळीं त्या माय-माउलीची काय स्थिति होत असेल!... बाबा! धान्याने भरलेलें कोठार अशा वेळीं जर लोकांच्या उपयोगी पडणार नसेल तर तें असून काय कामाचें! प्रजेच्या दुःखात जर राजा सहभागी होत नसेल तर तो त्या प्रजेचा राजा कसला! या राजाला रक्षक म्हणत नाहीत भक्षक म्हणतात!... कोठारात धान्य असताना प्रजेला खायला न देणें हा अधर्म आहे. बाबा! या अधर्मात तुम्ही तरी सामील होऊं नका!'



दासोने इतकें कळवळून सांगितलें पण दिगंबरपंत काहीं बोलले नाहीत. नेहमीप्रमाणे आजही दासोने त्यांना निरुत्तर केलें होतें.

दिगंबरपंत मनात म्हणत होते, 'देवा! केवढी कृपा तुझी! दुसऱ्याच्या दुःखाने दुखावणारा मुलगा तू मला दिलास. पण मी..... माझ्या डोळ्यांसमोर फक्त राजदंडच नाचतो आहे. हें कोठार मीं खुलें केलें तर राजा माझे काय करील! काय करील राजा?.....'

आणि दुसऱ्या दिवशीं धान्याचें कोठार लोकांसाठीं उघडें झालें. भुकेलेल्यांनी हवें हवें तेवढें धान्य नेलें. बऱ्याच दिवसांची त्यांची भूक शांत झाली. लोकांनी दुवा दिला, आशीर्वाद दिलें. इतकें दिवस गुदमरणारें दिगंबरपंतांचें मन प्रसन्न झालें.

हां हां म्हणता, ही बातमी बादशहाला कळली. बादशहा गरम झाला. त्याचें पित्त खवळलें. त्याच्या परवानगीवाचून सरकारी धान्य लोकांना वाटलें गेलें होतें. दिगंबरपंतांनी धन्यवाद मिळविलें होतें. त्यांची कीर्ति वाढली होती. बादशहाला तें सहन झालें नाहीं. त्याने दिगंबरपंतांना दरबारात हजर राहाण्याचा हुकूम दिला.

गुप्तहेर-खात्याकडून आणखीही एक बातमी बादशहाला कळली. लोकांना धान्य वाटण्यात दिगंबरपंतांपेक्षा त्यांच्या मुलाने अधिक पुढाकार घेतला होता. हा मुलगा फार हुशार आहे. तल्लख बुद्धीचा आहे व समर्पक उत्तर देताना तो कुणाला घाबरत नाहीं. हें ऐकून तर बादशहा अधिक बिघडला. त्याने त्या मुलालाही दरबारात येण्याची आज्ञा दिली.

ठरल्यावेळीं पिता-पुत्र दरबारात हजर झालें. असें काहीं तरी होईल याची दिगंबरपंतांना जाणीव होती. परकी राजा जाब विचारल्यावाचून राहाणार नाहीं. तो आपल्याकडून समर्पक उत्तर घेणार आणि.....

पुढील भयंकर भवितव्याचा दिगंबरपंत विचार करीत होतें. तेवढ्यात बादशहाने आपल्या अधिकारी आवाजात हाक मारली.

'दिगंबरपंत!'

'सरकार!'

'बादशहाच्या हुकमाशिवाय आपण सरकारी धान्याचें कोठार लोकांना उघडें करून दिलें!'

'होय, सरकार!' दिगंबरपंत म्हणाले.

'आपण सरकारचा फार मोठा गुन्हा केलेला आहे. राजदंडाचा अवमान केल्याबद्दल...'

'पण जहांपनाह, दासो मध्येच म्हणाला. 'सारी प्रजा आपली संतान आहेत. आपत्काळीं राजाने प्रजेला मदत करणें, हें राजाचें कर्तव्य आहे.'

'होय; राजाचें! कोठाराधिपतीचें नव्हे.' दासोला अडवीत राजा गरजला.

दासोनेही त्याच सुरात उत्तर दिलें : 'सर्वत्र दुष्काळ पडला आहे. राजा खुशाल ऐशआरामात आहे. सारी प्रजा अन्नासाठीं दारोदार हिंडत आहे. कोणी एक कण दाखवीत नाहीं. अशा वेळीं प्रजेने सरकारात भरलेलें आपलेंच धान्य परत घेतलें व पोटासाठीं वापरलें तर त्यात काय मोठेंसे विपरीत घडलें? उलट, आपलेंच धान्य प्रजा परत घेत होती व बादशहाला दुवा देत होती. ही घटना मात्र प्रशंसनीय आहे!'

मुलाचें धाडस, त्याचें बोलणें, त्याचे विचार, सारें कांहीं आगळेंच वाटलें बादशहाला. सारा दरबार चकित झाला. बादशहा देखील दासोकडे अचंब्याने पाहूं लागला.

दासो सांगत होता: 'प्रजेला अन्न-वस्त्र देणें, घरें देणें, जीवनविकासासाठीं शिक्षण देणें, ही राजाची कामें आहेत. यासाठींच प्रजा सरकार-सारा भरते. तेव्हा सध्याच्या दुष्काळात माझ्या वडिलांनी लोकांना सरकारी गोदामातलें धान्य दिलें, यात त्यांचा कांहीं गुन्हा नाहीं. उलट, त्यांच्यां त्या लहानशा कृतीने राजाची कीर्ति मात्र वाढली आहे!'



दासोच्या भाषणातला शब्द राजा ऐकत होता. त्याची निर्भयता व चातुर्य पाहून तो खुश झाला होता. त्या खुशीबरोबर त्याच्या मनात कांहीं निराळ्याच विचारांनी स्थान मांडलें. राजाला वाटलें या मुलाला आपण जवळ करायला पाहिजे. हा मुलगा आपलासा झाला, त्याला आपण बाटवलें तर इस्लामचा प्रचार करणारी एक महान् शक्ति आपल्या हातीं लाभेल. म्हणून त्याने उलटा पवित्रा घेतला. त्याने दिगंबरपंतांना न्याय दिला.

'दिगंबरपंत! प्रजेला अन्न देऊन आपण आमचें फार थोर काम केलें आहे. त्याबद्दल तुम्हाला धन्यवाद! पण ताब्यात असलेली सरकारी मालमत्ता, सरकारी नोकर आपल्या इच्छेप्रमाणे वापरूं लागले तर उद्या नोकरांवरील आमची सत्ता उडून जाईल. म्हणून आज आम्ही कायद्याप्रमाणे आपणास शासन केलेंच पाहिजे.'

'सरकार!'

'कायद्याचा दरारा वाटावा म्हणून आम्ही तुम्हाला पांच लक्ष मोहरा दंड करीत आहोत. आपल्याबद्दल आमच्या मनात प्रेम आहेच! म्हणून हा दंड भरण्यासाठीं आम्ही आपणाला एक महिन्याची मुदत देतो. तोपर्यंत तुमचा हा मुलगा आमच्याकडे अनामत राहील. पण लक्षात असूं द्या, तीस दिवसांच्या आंत दंड भरला गेला नाहीं तर एकतिसाव्या दिवशीं दासो मुसलमान होईल!'

दिगंबरपंतांच्या अंगावर वीज कोसळली! पांच लक्ष मोहरा दंड भरला नाहीं तर दासो मुसलमान! ते मटकन् खालीच बसले. त्यांना वाटलें, 'सारा भूगोल गरगर फिरत आहे!'

जड अंत:करणाने ते दरबारातून बाहेर पडले. जडावलेली त्यांची पावलें मोठ्या कष्टाने घराच्या वाटेने चालली होती. मनाची इच्छा नव्हती तरी ती पुढें पुढें पडत होती. डोक्यात विचारांनी काहूर माजवलें होतें.

त्यांना सारखें वाटत होतें, 'घरी पोचताच पत्नी विचारील : 'माझा दासो कुठे?' काय उत्तर द्यायचें तिला?.... पांच लाख मोहरा आणूं

कुठून?.... घर विकलें, उसनवारी केली तरीही पैसे देणें शक्य होणार नाहीं. आणि पैसे देता आले नाहीत तर? माझा दासो मुसलमान होणार! लोक म्हणतील, 'दिगंबरपंताचा मुलगा मुसलमान झाला.' छे! छे! ही गोष्ट शक्य नाहीं. कधीच शक्य नाहीं!'

पण त्यांची आर्थिक असहायता त्यांना माहीत होती. आपण भरूं शकणार नाहीं एवढा भयंकर दंड राजाने आपणाला केला आहे याची त्यांना सारखी जाणीव होत होती आणि मग त्यांना वाटत होतें : 'दासो मुसलमान होणार! बादशहाच्या हातून तो आता सुटत नाहीं!'

घरी पत्नी मोठ्या आतुरतेने वाट पहात होती. दिगंबरपंत दिसताच तिने पहिला प्रश्न केला.

'आपण आलात; माझा दासो कुठे?'

दिगंबरपंतांजवळ या प्रश्नाचें उत्तर नव्हतें. त्यांचा चेहरा अगदी उतरला होता. मलिन दिसत होता. पतीचा निस्तेज चेहरा पाहून पत्नीची शंका आणखीच दृढ झाली. कुशंकेने तिचें सारें शरीर शहारलें.

शेवटी कसाबसा धीर करून दिगंबरपंत म्हणाले : 'आजपासून दासो आपला राहिला नाहीं. आता आपल्याला दासोच्या मुखातून वेदमंत्र, उपनिषदें व गीता ऐकूं येणार नाहीं. आपला दासो आता मुसलमान होणार, मशिदीत बांग देणार!'

बोलता बोलता दिगंबरपंतांचा कंठ दाटून आला. डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. बारा तेरा वर्षांच्या मुलावर होणारा हा अत्याचार त्यांच्याने पाहावेना. त्यांच्या डोळ्यांसमोर अंधारी आली. डोकें गरगर फिरूं लागलें.

मग मातृहृदयाला हा आघात कसा बरें सहन होईल? पण प्रसंगाचें गांभीर्य त्या माउलीने पटकन् ओळखलें. आपल्या पतीची व्यथा तिच्या



लक्षात आली. तिने दिगंबरपंतांना धीर दिला. मोठ्या कौशल्याने तिने सर्व हकीकत समजून घेतली. दोघांचीही मनें जाणून चुकली : बादशहाला दासोला मुसलमान बनवायचें आहे. त्यासाठीं भरूं न शकूं इतका पांच लक्ष मोहरा दंड व दासो अनामत!

दिगंबरपंतांचा हा अंदाज खोटा नव्हता. दासो कैदेत होता तरी त्याची बादशहाने उत्तम व्यवस्था राखली होती. निरनिराळे विचारवंत दासोची भेट घेत व त्याला उपदेश करीत. साऱ्यांच्या बोलण्याचा एकच आशय असे. इतर धर्मापेक्षा मुसलमान धर्म श्रेष्ठ आहे.

बादशहाच्या या वागण्याचा दासोलाही अर्थ कळला होता. कैदेतील त्याची व्यवस्था, त्याला पाठविले जाणारे नजराणें, भेटायला येणाऱ्या लोकांच्या हालचाली व एका सामान्य घटनेतून त्याच्या वडिलांना झालेला एवढा मोठा दंड, सारें एकच सांगत होते. असा नाहीं तर तसा दासो मुलसमान होणार!

एक सायंकाळची वेळ. कैदेतील आपल्या भोवतालच्या वातावरणाचा व आपल्या भवितव्याचा तो विचार करीत होता. 'मी काय केलें?' पहिला प्रश्न त्याच्या मनात आला. 'लोकांचें धान्य लोकांना खाऊं द्या म्हणून वडिलांना सांगितलें. काय चुकलें माझें यात? त्यासाठीं माझ्या वडिलांना पांच लक्ष मोहरा दंड!' दुसरा विचार आला, 'या जगात माझें कोण? भगवंताच्या सृष्टीतील वस्तु आपण 'माझी माझी' म्हणतो पण ती आपली असते का? या जगात कुणीच आपले नाहीं. फक्त एकच आपला : भगवान्! तोच सुखदु:खात सोबत करतो.'

दासोला वडिलांनी शिकविलेलें स्तोत्र आठवलें. भावपूर्ण अंत:करणाने तो तें गाऊं लागला.

**विवादे विषादे प्रमादे प्रवासे।**
**जले चानले पर्वते शत्रुमध्ये।**
**अरण्ये शरण्ये सदा मां प्रपाहि।**
**गतिस्त्वं गतिस्त्वं त्वमेका भवानि।।**

स्तोत्र पूर्ण होताच दासोचा कंठ दाटून आला. सदासर्वकाळ माणसाच्या सोबत असणारा एकच. परमेश्वर! बाकी दुसरा कोणी नाहीं. मग ही बाकीची हवीत कशाला? जो एकमेव आधार, तोच आपण पकडला कीं बाकीची दुखणी त्रास देणार नाहीत. आजूबाजूच्या साऱ्या उपाधि दूर होतील.

दासोने मनाचा निग्रह केला. त्याने भगवान् दत्तात्रेयांची आराधना सुरू केली. **'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा!'** असा जपघोष सुरू केला. अत्यंत कारुण्यपूर्ण अंत:करणाने तो दत्तात्रेयांची भक्ति करूं लागला. बादशहाकडून त्याला रोज एक मोहर मिळे. त्या मोहरेचें काय करायचें? ती तो दानधर्मात खर्च करूं लागला.

दासोत झालेलें हें परिवर्तन, अवतीभवती काम करणाऱ्या नोकरांनी राजाला कळवलें. त्यामुळें आपल्या प्रयोगाचा दासोवर विपरीत परिणाम झाला हें बादशहाच्या लक्षात आलें. म्हणून तो स्वत: दासोची समजूत काढायला आला.

'दासो! तू हुशार आहेस, बुद्धिमान् आहेस, क्षुद्र हिंदुधर्मात तुझा जन्म झाला म्हणून तुला वाईट वाटतें कां? हिंदुधर्मापासून मुक्ति मिळावी म्हणून कां तुझें हें तपाचरण चाललें आहे? भिऊं नकोस, बादशहा तुझ्या पाठीशी आहे. तू मुसलमान हो आणि मग पहा! सगळें जग तुझी कीर्ति गाईल, सारें वैभव तुझ्या पायीं लोळेल.'

पण बादशहाचें तें मतलबी गोड भाषण दासोला रुचलें नाहीं. तो बालक खरा; पण तो सिंहाचा छावा होता. गीता, उपनिषदें, वेद यांचें तो दूध प्यायला होता. तो एकदम संतापला. त्या रागाच्या भरात तो म्हणाला :

'खाविंद! दासो कधी गुलाम राहणार नाहीं! गुलामीत राहून तुमच्याकडून मिळणाऱ्या वैभवाचा मी धिक्कार करतो. लाथ मारतो त्या वैभवावर!'



आणि त्या बेभान स्थितीत लाथ मारण्यासाठीं स्वत:चा उजवा पाय वर उचलला आणि वस्कन् बादशहाच्या अंगावर धावून जात म्हणाला :

'मी थुंकतो तुमच्या वैभवावर! मला माझा धर्म व माझा भगवंत प्राणापेक्षा प्रिय आहे. हिंदु धर्म माझा आहे. मी हिंदु म्हणून जगेन व हिंदु म्हणून मरेन. राजेसाहेब! आपल्या धर्मात विशेष असें काय आहे? सगुण उपासना तुमच्यात आहे कां? परमेश्वराशी प्रेमाने बोलता येतें कां? आपली सुखदु:खें देवाला सांगून मन हलकें करता येतें कां? जगदीश आपला पिता. त्याच्याजवळ हट्ट धरून बसण्याची हिम्मत तुमच्या धर्मात आहे कां? स्वधर्मे निधनं श्रेय: परधर्मो भयावह:। भगवंताने स्पष्टपणें गीतेत सांगून ठेवलें आहे.'

दासोचे हे शब्द तापलेल्या तेलाप्रमाणे बादशहाच्या कानात घुसले. दात-ओठ खात, पराभूत होऊन त्याला बाहेर जावें लागलें. 'दासो बालक खरा; पण कच्चा नाहीं. हिंदुधर्माचे संस्कार त्याच्या अंत:करणात खोल रुतले आहेत. ते सहजासहजी जाणार नाहीत.' याबद्दल बादशहाची खात्री झाली.

आता त्याला एकच आशा होती. आपण एवढा मोठा दंड दिगंबरपंतांना ठोकला आहे, कीं तो ते या जन्मात भरूं शकत नाहीत आणि तसें झालें कीं, आपोआपच दासो आपल्या ताब्यात येईल. आपण त्याला मुसलमान बनवूं व आजच्या अपमानाची भरपाई करूं. अशा तऱ्हेची मनोराज्यें रचीत तो तिथून परत गेला.

दासो विचार करीत होता. एक...दोन....तीन... करता करता महिना संपला. दंड भरला गेला नाहीं. आता उद्या आपण मुसलमान होणार! या खंतेत तो रात्री तळमळत होता.

तो मनात म्हणत होता : 'प्रभो! तू सोबत असता माझ्यावर अशी आपत्ति यावी? लहानपणीं बाबा शिकवीत असत : 'बाळा! वेद, उपनिषदें, गीता या आपल्या माता आहेत. अति पवित्र आहेत.' आईवडिलांनी मला

यांचें दूध पाजलें. आता ते पीयूष मला परत मिळणार नाहीं. हें जानवें! माझी ही वैदिक धारणा! आता मला सोडून द्यावी लागणार. भगवंता! जानवें गेलें, कीं वेद, उपनिषदें, गीता मी वाचूं शकणार नाहीं.'

दासोला हा विचार असह्य झाला. दोन्ही हातांनी त्याने आपलें मस्तक दाबून धरलें. त्याचें मन सारखें ओरडत होतें, प्रभो! माझ्यावर ही आपत्ति काय म्हणून?.. आणि त्याचें डोळे पाणावले. तो अस्वस्थ झाला. रडूं लागला.

'भगवंता! तू ठेवशील तसें राहणें हा धर्म आहे. पण हा प्रसंग माझ्यावर न आणतास तर? त्याने **'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा'** हा धावा सुरू केला. त्या ध्यान-समाधीत त्याचा डोळा लागला.

दुसऱ्या दिवशीं दरबार भरला. लोकांचे लक्ष निर्णयाकडे होतें. त्यामुळें सर्वांच्या नजरा बादशहाकडे खिळल्या होत्या. त्याचें शब्द ऐकण्यासाठीं कान टवकारलेलें होते आणि मनात तर्कवितर्कही चाललें होते. दिगंबरपंत पांच लक्ष मोहरा भरतील कां? त्यांनी दंड भरला नाहीं तर? हुशार, चलाख, भगवद्भक्त दासो मुसलमान होणार. सत्तेपुढें कोणाचें चालत नाहीं हेंच खरें!

लोकांच्या या तर्कवितर्काला बादशहाच्या प्रश्नाने खंडित केलें. बादशहाने विचारलें : 'दिगंबरपंत आलें आहेत कां?'

सभेत एकदम स्तब्धता पसरली. कुठून तरी 'होय' उत्तर यावे असें सर्वांना वाटत होतें पण तसें घडलें नाहीं. कुणीच काहीं बोललें नाहीं. त्यामुळें बादशहाची खात्री झाली. आता दासो आपल्या हातून सुटत नाहीं. शिकार हातात आली. आपण त्याला मौलवी बनवायचें!

'दिगंबरपंत नसतील तर पांच लाख मोहरा भरून, दासोची सोडवणूक करणारा दुसरा कोणी आहे कां?'

राजाने दुसरा प्रश्न केला. दोन चार क्षण उत्तराची अपेक्षा केली आणि तो निर्णय देण्यासाठीं सरसावला : 'आजपासून दासो हिंदूचा...'



'बादशहा! थांब. या तुझ्या पांच लाख मोहरा. मोजून घे.' दरबारात धावत धावत प्रवेश करणाऱ्या एका आगंतुक इसमाने बादशहाचा शब्द अडवून म्हटलें.

मोहरा मोजून पाहिल्या. त्या पांच लाख होत्या. त्यामुळें बादशहा व लोक सारेच चकित झालें. पदरच्या पांच लाख मोहरा खर्चून दासोला सोडविणारा हा महाभाग कोण? सर्वांच्या मनात हा प्रश्न उठला होता. त्याच वेळीं बादशहाने त्याला विचारलें :

'आपलें नांव?'

'मला दत्ताजी भास्कर म्हणतात.' त्या अनाहूत व्यक्तीने खणखणीत जबाब दिला व काम पूर्ण होताच ती व्यक्ति निघून गेली. दिसेनाशीच झाली.

आपण आता बादशहाच्या तावडीतून सुटणार याचा दासोला अतिशय आनंद झाला. आज भगवंताने त्याची लाज राखली होती. मुसलमान होण्यापासून त्याला वाचविलें होतें.

राजाच्या कैदेतून सुटल्यावर दासोने या दत्ताजी भास्कराचा खूप तपास केला. त्या तपासाला लोकांनीही साथ दिली. पण दत्ताजी भास्कर पुन्हा दिसला नाहीं. त्याचा पत्ता कळला नाहीं.

या स्वार्थी संसारात अकारण कोण कुणाला मदत करतो? शिवाय पांच लाख मोहरांएवढी मोठी रक्कम! नक्की हा दत्ताजी भास्कर नव्हता. प्रभुप्रेषित होता. दत्तात्रेयांनीच माझी लाज राखली हे निश्चित!

मनात आलेल्या या विचारांनी त्याचें मन पुलकित झालें. त्याने मनातल्या मनात भगवंताला अनेक प्रणाम केलें. अनन्य, आर्त व करुणामय हाकेला तो धावून येतो या शास्त्रकारांच्या मताचा प्रत्यय आला.

दासोवर भगवंताची कृपा झाली होती. तो कैदेतून सुटला होता. पृथ्वीतलावरचा बाप सोडवूं शकला नाहीं तरी या जगाचा, आपला सर्वांचा

पिता जो परमेश्वर, त्याने त्याला मुसलमान होण्यापासून मुक्त केलें होतें. त्या आनंदात तो घरीं आला. चालता चालता पायाखालची वाट कधी संपली तें त्याच्या ध्यानातही आलें नाहीं.

त्याने आईवडिलांना नमस्कार केला. तिघांचेही नेत्र प्रेमाश्रूंनी भरून आले. आई-वडिलांना वाटलें होतें, बादशहाने दासोला मुसलमान बनवलें असेल. पण मुलगा तर पुढ्यात उभा होता. त्याने त्यांना नमस्कार केला होता.

आपण सुटल्याचा अपरिमित आनंद दासोच्या डोळ्यांतून ठपकत होता. तें पाहून दिगंबरपंतांनी आश्चर्याने विचारलें : 'दासो! बादशहाने तुला सोडलें कसें? कुणी पैसे भरले तुझे?'

दासोने भगवंताला अनन्यभावाने प्रणाम केला. **'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा'** भजन तो गाऊं लागला.

दिगंबरपंत समजले. त्यांचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्यांनी दासोला कडकडून मिठी मारली. पुन:पुन्हा परमेश्वराचें आभार मानले. तिघांचेही नेत्र प्रेमाश्रूंनी वाहूं लागले.

त्या दिवसापासून दासोच्या वृत्तीत एकदम बदल झाला. दासोच्या मनात आलें, ज्या भगवंताने मला मुसलमान होण्यापासून वाचवलें त्याला मी आता कसा विसरूं? तो प्रभुभक्तीत रंगूं लागला.

मुलगा राजाच्या कैदेतून सुटून आला होता. त्यामुळें आईची माया अधिक उफाळून आली होती. ती रोज कांहीं ना कांहीं गोडधोड करी व दासोला खायला देई. पण त्याला त्याच्यात गोडी वाटत नव्हती. शिकण्यासाठीं दासो गुरुजींपाशी बसे. पण तिथे त्याला फक्त वाणीचाच विलास वाटे.

**षड्गादिवेदो मुखे शास्त्रविद्या कवित्वादिगद्यं सुपद्यं करोति।**
**हरेरंघ्रिपद्मे मनश्चेन्नलग्नं ततः किं ततः किं ततः किं ततः किम्।।**



त्याला भगवद्भजनाशिवाय कांहींही गोड लागेना. अध्ययनात गोडी नव्हती, खाण्यात गोडी नव्हती, प्रभुभजनाशिवाय कशातच त्याला गोडी वाटत नव्हती. त्यामुळें आई-वडिलांना त्याची काळजी वाटूं लागली.

अभ्यास करताना दासोला वाटे, राजाच्या कैदेतून मला कोणी सोडविलें? आईने की वडिलांनी? नाहीं. जगदंबेने! मग ही जगदंबाच श्रेष्ठ नाहीं कां? त्या परम कृपाळू जगदंबेला मी भेटलो नाहीं, तर तिला किती बरें दु:ख होईल! काय वाटेल तिला मी नाहीं भेटलो तर! ही आई खायला देते; जगदंबा तें पचवते. ही आई काळजी वाहाते; जगदंबा चोवीस तास जवळ राहून रक्षण करते. सावलीसारखी बरोबर फिरते.

या सृष्टीत मानव खूप उड्या मारतो. यशाचें, कर्तृत्वाचें श्रेय स्वत:कडे घेतो पण आपत्तीत कोण कोणाच्या उपयोगी पडतो? परमेश्वराशिवाय कोण उपयोगी आला माझ्या! म्हणून जीवाची अंतिम गति तोच!

**न तातो न माता न बंधुर्नदाता**
**न पुत्रो न पुत्री न भृत्यो न भर्ता।**
**न जाया न विद्या न वृत्तिर्ममैव।**
**गतिस्त्वं गतिस्त्वं त्वमेका भवानि।।**

मग अशा या परमेश्वरालाच शरण जाणें बरें, नाहीं कां?

दासोच्या या उदासीन वृत्तीमुळें आईवडिलांची चिंता वाढली. आपली चिंता दूर व्हावी व उदासीनतेतून दासोने सुटावें, म्हणून त्यांनी एक तोडगा शोधून काढला. त्यांनी दासोचें लग्न केलें. पण दासोची ती सात्त्विक उदासीनता कांहीं दूर झाली नाहीं. एक दिवस रात्री बारा वाजता कुणाला न सांगता तो घरातून निघून गेला. भगवंताला भेटण्याचा त्याने मनाशी निश्चय केला.

अर्ध्या रात्रीच्या भयाण काळोखातून घर सोडून निघालेला दासो प्रथम नंदीग्रामला आला. तिथे त्याने गोदावरीत स्नान केलें. **दिगंबरा**

**दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा**, हा गजर सुरू केला व तो पुढें चालूं लागला.

दिगंबरपंतांनी दासोला शोधण्याचा खूप प्रयत्न केला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सह्याद्रीच्या अविचल गिरिमालिकेत दासो अदृश्य झाला होता. भगवच्चिंतनीं तो स्वत:ला विसरून गेला होता. जेव्हा भूक लागे तेव्हा गांवात एखाद्या ब्राह्मणाच्या घरीं जाई. भोजन मागून आपली भूक भागवी, पुन्हा गिरिशिखरात जाऊन भगवद्भजनात रंगून जाई.

अशा तऱ्हेने तीन वर्षें निघून गेली. एकदा भगवच्चिंतनीं दंग असता तीन दिवस त्याने कांहीं खाल्लें नाहीं. चौथ्या दिवशीं भुकेची जाणीव होताच नित्याप्रमाणे तो निघाला. एका सात्त्विक ब्राह्मणाच्या दाराशी जाऊन उभा राहिला. त्याची तेजस्वी कांति, नेत्रांत चमकणारें तेज व तापसी वृत्ति पाहून त्या ब्राह्मणाने त्याचें स्वागत केलें, त्याची पूजा केली, मोठा सत्कार केला. दासोनेही त्या ब्राह्मणाच्या घरीं भगवंताचें गुणगांन केलें. नामसंकीर्तन केलें. सर्व भक्तिरसात रंगून गेले. त्या मोदमय प्रसंगीं तो ब्राह्मण म्हणाला :

'भगवन्! आपण महान् आहात. आपणाला उपदेश करण्याचा आमचा अधिकार नाहीं. पण आपलें नामसंकीर्तन एकून जें मनात आलें, तें प्रेमाने व मोकळ्या मनाने आपल्यासमोर निवेदन करावें, असें वाटतें.'

'अवश्य!' तितक्याच प्रेमाने दासो म्हणाला.

'केवळ भगवंताचें गुणवर्णन करून भक्ताचें कार्य पुरें होत नाहीं. नामस्मरणाबरोबर त्याने देवाचें कार्यही करायला हवें. 'भगवंता! तू पतितपावन आहेस, करुणासागर आहेस,' या विशेषणांनी तो खूष होत नाहीं. केवळ नामस्मरण ही पांगळी भक्ति होय. म्हणून नामस्मरणाच्या जोडीला कार्य हवें. जसें 'भाजी-भात' असा जप करून पोट भरत नाहीं तसें नुसतें 'दिगंबरा, दिगंबरा' म्हणून भक्तीतील उच्चतम आनंद मिळणार



नाहीं. कदाचित् त्याने आध्यात्मिक आनंद मिळेल; पण त्यात दिव्यता नाहीं. म्हणून तुम्ही प्रभु-कार्य केलें पाहिजे. केवळ नामजप ही मागणी आहे. मागणीने लाचारी येते. भगवंताने आपण होऊन दिलें पाहिजे. त्यासाठीं कार्य लागतें.'

दासोला तें पटलें. त्याला वाटलें : या ब्राह्मणाच्या रूपाने भगवंत स्वत: बोलला. त्याने सह्याद्रीच्या आजूबाजूच्या गांवांत प्रभुकार्याला सुरुवात केली.

त्याने पाहिलें कीं लोक पशुतुल्य जीवन जगत होते. भूक लागेल त्यावेळीं खात. झोप येई त्यावेळीं झोपत. जेवायला वाढलें कीं ताबडतोब खायला सुरुवात करीत. याला काय जीवन म्हणायचें? अन्न देणाऱ्या प्रभूचें माणूसही स्मरण करीत नाहीं व वानरही करीत नाहीं; मग दोघेही सारखेच कां? ज्या शक्तीमुळें आपण संपूर्ण दिवस काम करूं शकतो, त्या प्रभूचें रात्री झोपताना एक क्षण तरी स्मरण करतो कां? हें पशुतुल्य जीवन पाहून दासोचें हृदय भरून आलें. तो झोपडी झोपडीत जाऊं लागला. लोकांजवळ बसूं लागला. त्यांना समजावूं लागला. भगवंतापासून दुरावलेल्या लोकांना पुन्हा ईश्वरसन्मुख करूं लागला.

दासोच्या जीवनात भक्ति होती. त्यात कर्माचा मिलाप झाला. त्यामुळें त्याचें जीवन आता प्रफुल्लित झालें होतें.

एके दिवशीं रात्री बसल्या बसल्या तो विचार करूं लागला. आजवर प्राप्त झालेली सर्व शक्ति आपण प्रभुकार्यात खर्च केली. पण अजून आपल्याला भगवत् साक्षात्कार कांहीं झालेला नाहीं आणि तो एकदम गहिंवरून गेला. काय झालें तें क्षणभर त्याच्याही लक्षात आलें नाहीं. तो भानावर आला त्यावेळीं साक्षात् दत्तात्रेय त्याच्या पुढ्यात उभे होते. त्यांनी त्याच्या मनातले विचार जाणून दर्शन दिलें होतें.

दत्तात्रेय दासोला सांगत होते : 'दासो! तू आता याचक राहिला नाहीस; खऱ्या अर्थाने तू माझा भक्त आहेस. तू माझें काम करणारा महापुरुष आहेस. बोल, तुझी कोणती इच्छा पुरी करूं?'

जन्मोजन्मींचें पुण्य फळाला आलें होतें. दासोचे नेत्र आनंदाश्रूंनी भरून आले. तो म्हणाला: 'प्रभो! तुझें दर्शन झालें. आता त्रिभुवनाचें वैभवही तुच्छ! मला कीर्ति नको, वैभव नको, मुक्तीही नको! तुझें मुखारविंद सतत डोळ्यांसमोर रहावें एवढीच इच्छा! प्रभो! सूर्य, चंद्र नक्षत्रें यांना गति देणारा तू, तुझी शक्ति मी माझ्यात कशी साठवूं? मला फक्त तुझ्या चरणांची सेवा घडेल असें कर. त्या चरणांकडे मी शांत चित्ताने पाहात राहीन, तुझें स्मरण करीन व उरलेलें जीवन तुझ्या कार्यासाठीं खर्च करीन.'

दत्तगुरूंनी 'तथास्तु' म्हटलें व सांगितलें : 'तू वणी संगमीं जा, तिथे गोदावरीत स्नान कर, तुला तिथे खडावा मिळतील.'

दत्तात्रेय अंतर्धान पावले. दासोचें जीवन कृतकृत्य झालें. प्रभुदर्शनाचा अलभ्य व अवर्णनीय लाभ झाला. तो प्रभूचा लाडका बनला.

मग गोदावरीच्या तीरावर येऊन त्याने एक अष्टक गायलें. नंतर तो स्नानासाठीं पाण्यात उतरला. त्यावेळीं, कोट्यवधि जीवनें पवित्र बनविणाऱ्या गोदामाईला वाटलें : दासोच्या पावन स्पर्शाने आपण कृतार्थ झालो! तिने दासोला आलिंगन दिलें. सबंध अंगावरून आपला मायेचा ओला हात फिरविला. त्या स्पर्शाने दासोही धन्य झाला.

आंघोळ करून पाण्याबाहेर पडताच त्याच्यासमोर खडावा हजर होत्या. त्याने त्या उचलल्या. भगवंताचा तो प्रसाद त्याने हृदयाशी कवटाळला. किती तरी वेळ तो भान विसरून समाधिस्थितीत उभा होता.

भानावर येताच तो जवळच्या वाघेश्वर मंदिरात गेला. शेकडों लोक वाघेश्वराच्या यात्रेला येत, त्याचें दर्शन घेत. दासो जवळ श्रवणाला बसत. दासो त्यांना जीवनाचें पाठ समजावून देऊं लागला. जीवनाचें उद्दिष्ट समजावूं लागला. मानवीदेहाचें सार्थक कशात आहे तें सांगूं लागला. त्यामुळें त्याचें जीवन कर्मयोगी बनलें. त्याच्या जीवनातली याचक भक्ति कुठल्या कुठे गडप झाली. तिची जागा तेजस्वी भक्तीने घेतली 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' या गजराचा मंत्र बनला.



वणीसंगमाच्या भवतालच्या प्रदेशात व वाघेश्वर मंदिरात दर्शनासाठीं येणाऱ्या दूरदूरच्या भक्त मंडळींत आता दासोची कीर्ति झाली. मंदिरातील उपाध्यायही दासोसमोर आदराने नमत, त्याचा सन्मान राखीत.

एक दिवस दासोने पाहिलें; सर्व उपाध्यायांची खूपच धावपळ सुरू आहे. म्हणून जाता जाता सहज एका उपाध्यायाला विचारलें, तेव्हा तो म्हणाला : 'मराठवाड्यातून यात्रेकरूंचा एक तांडा आला आहे. त्या तांड्यामध्ये एक धनिक कुटुंब आहे. त्या कुटुंबातील तरुण स्त्रीला आपली सौभाग्यवस्त्रें व बांगड्या गोदावरी मातेला अर्पण करायच्या आहेत. बारा वर्षे झाली. तिचा पति हरवला आहे. त्याचा शोध लागला नाहीं, म्हणून ती वैधव्यदीक्षा घेणार आहे. तिच्या त्या व्रताच्या सांगतेसाठीं ही सारी धावपळ आहे.'

दासोला त्या तरुण स्त्रीबद्दल कळवळा वाटला. तो मनात म्हणाला, 'प्रभो! तुझी लीला खरोखरच अनाकलनीय आहे. तू कोणावर कोणता प्रसंग केव्हा आणशील हें सांगणें कठीण!'

त्या काळीं एक रूढि होती. स्त्रीचा पति जर हरवला तर बारा ते पंधरा वर्षे ती स्त्री त्या पतीची वाट पाही व पति परत आलाच नाहीं तर एखाद्या तीर्थक्षेत्रात जाऊन ती स्वहस्ताने स्वत:चें सौभाग्य कुंकू नदीला अर्पण करी. सौभाग्यचिह्न म्हणून धारण केलेलें कुंकू स्वत:च्या हाताने पुसून टाकायचें! जीवनाची सौभाग्यरूपी इमारत स्वत:च्या हाताने मोडून टाकायची! केवढा भयंकर क्षण असेल तो! परंतु हा विधि सनातनी लोक कटाक्षाने अमलात आणीत.

आपली पुत्रवधु वैधव्याची दीक्षा घेणार अर्थात् आपला मुलगा खरोखरच मेला हें जाहीर होणार, या जाणिवेने तें कुटुंब शोकमग्न झालें होतें. आलेला प्रसंग निभावलाच पाहिजे म्हणून उपाध्याय त्यांची समजूत काढीत होता. बोलता बोलता उपाध्यायाला दासोची आठवण आली. तो म्हणाला : 'नशिबात आलें तें स्वीकारलेंच पाहिजे. दु:खात कुणाचा आधार

नसतो. आपलें आपण सहन करावें लागतें. आपल्या सुदैवाने इथे एक महापुरुष आलें आहेत. त्यांचें आपण दर्शन घ्या. त्यांचा उपदेश ऐका. त्यामुळें आपलें दु:ख थोडें हलकें होईल.'

'प्रभुकार्य हाच त्या महात्म्याचा जीवनमंत्र आहे. त्याला कसलीही इच्छा नाहीं. त्यांचें शिक्षणही खूप झालेलें आहे. बुद्धि तेजस्वी आहे. अंत:करण भावपूर्ण आहे. प्रभुकार्याने जीवन पावन झालेलें आहे.' उपाध्यायानी त्या महात्म्याचें वर्णन केलें. कुटुंब प्रमुखाला वाटलें : देवाचें जसें दर्शन तसें महात्म्याचें! तो अमोल लाभ आपण घ्यावा.

दासोलाही वाटलें मराठवाड्यातून यात्रेकरू आले आहेत. आपण भेटावें त्यांना. त्यांच्याशी बोलावें. भगवन्नामाचें महत्त्व सांगावें. कदाचित् एखादा ओळखीचाही भेटेल. म्हणून तो त्यांच्या निवासस्थानाच्या दिशेने जाऊं लागला.

रस्त्यात त्याला एक तेजस्वी ब्राह्मण भेटला. त्याने दासोला प्रणाम केला. बोलता बोलता कित्येक दिवस त्याच्या मनात असलेली एक शंका दासोला विचारायची त्याला इच्छा झाली. तो म्हणाला: 'प्रभो! अविवेक होत असेल तर माफ करा. पण एक गोष्ट विचारूं कां?'

दासोने अनुमति दिली. तेव्हा तो म्हणाला : 'प्रभो! आपली आम्ही खूप ख्याति ऐकली आहे. आपण नेहमी प्रभुकार्यात मग्न असता. अतिशय निस्पृह आहात. तसें आपलें जीवनही विशुद्ध आहे. तें पाहून समाधान झालें आणि आपल्या पवित्र स्पर्शाने आम्ही पावन झालो. पण एका गोष्टीचा उलगडा झाला नाहीं.'

'कोणत्या?' सहज भावाने दासोने विचारलें.

'हा विचित्र वेष तुम्ही कां धारण केला? ज्याला आपलें अलगत्व दाखवायचें असतें तो असला विचित्र वेष धारण करतो. सामान्य लोकांनी आपल्या कच्छपी लागावें म्हणून त्यांना भुलविण्यासाठीं कांहीं लोक हा वेष धारण करतात. तुम्हाला या दोहोंपैकीं कशाचाच स्पर्श नाहीं, मग हा विचित्र वेष कां?



'खरें आहे तुमचें म्हणणें. मला लोकांनी मोठा नाहीं म्हटलें तरी चालेल! आणि या विचित्र वेषामुळें मी वेगळा आहे, असें तुम्हाला वाटत असेल तर हा वेष मी आताच गोदावरीला अर्पण करतो.'

आणि तो निघाला. नदीच्या दिशेने चालूं लागला. शुद्ध चतुर्दशीचा चंद्र आपल्या धवल रुपेरी प्रकाशाने साऱ्या सृष्टीवर अमृत वर्षाव करीत होता. तें पाहून दासोला वाटलें. माणसाचें चरित्र व जीवन असें निर्मळ आणि आल्हाददायक असलें पाहिजे. आपलें जीवन तसें व्हावें म्हणून भगवंत किती काळजी घेतो! नाहींतर हा ब्राह्मण कां भेटला असता? किती मौलिक विचार त्याने सांगितले. लोकांत राहाणाराने लोकांसारखें असलें पाहिजे. तरच त्याला त्या लोकांच्या अंत:करणाचा ठाव घेता येईल.

अशा तऱ्हेने विचार करीत दासो चालला असता कुणा तरी तरुण स्त्रीच्या रुदनाचे सूर त्याच्या कानीं आले. ती स्त्री आर्त, व्याकूळ होऊन रडत होती. भगवंताला करुणा यावी अशा प्रकारचें तिचें क्रंदन होतें.

दासोने कानोसा घेतला. त्या रुदनाने त्याचें हृदय हेलावलें. त्याचे पाय पुढें पडत नव्हते.

घरात संवाद चालला होता : 'बाळे! गत जन्मातलें आपलें महापातक म्हणून हें दिवस आज आपल्याला पहावे लागत आहेत.'

'आई! तू तरी काय करणार! दु:ख विभागून घेता येत नाहीं. माझें पाप मला भोगलेंच पाहिजे.'

तिचे हुंदके अनावर झाले. त्यातील अनन्यता दासोच्या लक्षात आली. त्याच्या हृदयाला पाझर फुटला. उद्या वैधव्यदीक्षा घेणाऱ्या त्या तरुण स्त्रीचें हें कुटुंब तर नसेल ना? दासोच्या मनात प्रश्न उठला.

त्याच वेळीं त्याच्या कानीं शब्द पडले : 'सुनबाई! कुणास ठाऊक भगवंताने आपल्या नशिबीं काय लिहिलेंय तें! इथे एक फार मोठे महात्मा पुरुष आले आहेत असें कळतें. त्यांचा आशीर्वाद घेऊन....'

पुढील शब्द, उचंबळून येणाऱ्या हुंदक्यात विलीन झाले. दासोला आवाज ओळखीचा वाटला. अति परिचयाचा वाटला. माझे वडील तर नाहीत ना? आणि मग ती तरुण सून....

दासोच्या नजरेसमोरून बारा वर्षांपूर्वीचा त्याचा जीवनपट सरकूं लागला. क्षणात त्याला सर्व आठवलें. तो धावत धावत आंत गेला. चिंतेने जर्जर झालेल्या गलितगात्र वृद्धाचे पाय धरले.

वृद्ध पटकन् मागें सरला. तो म्हणाला, 'तुम्ही तेच महापुरुष दिसता. शेकडों जीवांना तुम्ही नवजीवन दिलें आहे. मी अधम आहे, पापी आहे. माझ्या या वृद्ध हातांनी मला माझ्या तरुण सुनेला वैधव्यदीक्षा द्यावी लागत आहे. माझ्या या पापात आपण आणखी वाढ कशाला करता?'

'बाबा! मला ओळखलें नाहीं? मी दासो!'

आणि तो आईला नमस्कार करायला वाकला. त्या वृद्ध पति-पत्नीचे नेत्र आनंदाश्रूंनी भरून आले. आनंदातिरेकात ती पुरें बोलूही शकली नाहीत. 'कोण? दासो!' हें शब्द ओठातच मुरलें. त्यांनी वात्सल्याने दासोला आलिंगन दिलें. कित्येक क्षण ती तिथें त्याच्या तेजस्वी मुखाचें अवलोकन करीत होती.

तें सारें दृश्य पाहून त्या तरुण स्त्रीला, पार्वतीला किती आनंद झाला असेल! भगवंताची लीलाच विचित्र! क्षणापूर्वी सारें कुटुंब दु:खाच्या खोल गर्तेत बुडालें होतें. तेंच कुटुंब क्षणानंतर आनंद सागरात डोलताना दिसत आहे.

'दासो! माझ्या हातून केवढा अनर्थ होणार होता! तू जीवंत असताना मी पार्वतीला वैधव्याची दीक्षा देणार होतो.'

'बाबा! आता तुम्ही निश्चिंत रहा. आता तिला दीक्षा देण्याची गरज नाहीं. मीच माझा विचित्र वेष गोदावरीत समर्पित करतो.'

पार्वतीचे नेत्र चमकले. तिने परमेश्वराचे आभार मानले.



दुसऱ्या दिवसापासून दासो अगदी सामान्य ब्राह्मणासारखा राहूं लागला. असामान्य जीवन जगणारा सामान्य बनून राहिला. हाच त्याच्या जीवनाचा विकास होय.

कांहीं दिवस या स्थितीत गेले. एक दिवस दुपारच्या भोजनानंतर बाप-बेटे वामकुक्षी करत पहुडले होते. एकाएकी दासो उठून बसला. खूप दिवस मनात घोळत असलेली एक गोष्ट त्याला दिगंबरपंतांना सांगायची होती. तो म्हणाला :

'बाबा! आपण आपली जमीन-जहागीर ब्रह्मार्पण केली तर?'

दिगंबरपंत पाहात राहिले. त्यांनी क्षणभर विचार केला. मग म्हणाले: 'ठीक!'

मुलाच्या शब्दाखातर दिगंबरपंतांनी आपली सारी जमीन दान-धर्मात वाटली. त्या चौघांनीही आपलें गांव सोडलें व प्रभुकार्यासाठीं बाहेर पडली. दासो गांवोगांव जाई. लोकांची जीवनें बदलवी. मानवदेह धारण केलेल्या परंतु पशूप्रमाणे जीवन जगणाऱ्या लोकांना मनुष्य बनून जगायला शिकवी. प्रेमाने त्यांना प्रभुसन्मुख बनवी.

फिरता फिरता तो आंबेजोगाई गांवाजवळ आला. गांवाबाहेर एक सुंदर तलाव होता. दासो त्या तलावाच्या कांठावर बसला. पहाणाराला वाटत होतें हा कोणी तरी भिकारी आहे! इतका तो साधेपणाने राहात होता.

त्या गांवात सीतोपंत कुळकर्णी नावाचा एक विद्वान् गृहस्थ राहात होता. तो अति भाविक होता तसाच श्रद्धावान् पण होता. स्वत:ची मान अकारण कोणासमोर वाकूं नये, याची तो फार दक्षता घेत असे. त्या दिवशीं सायंकाळी मुलीला घेऊन तो फिरायला निघाला. त्याने दासोला तलावाच्या कांठीं पाहिलें. सहजपणेंच त्यांची बोलाचाली सुरू झाली. हा कोण महापुरुष याची त्याला जाणीव नव्हती.

बोलता बोलता तो दासोला प्रश्न विचारीत होता. दासो त्याची समाधानकारक उत्तरें देत होता. आजपर्यंत ज्या जीवनविषयक प्रश्नांची त्याला उत्तरें मिळत नव्हती, त्यांची दासोकडून त्याला समाधानकारक उत्तरें मिळाली. तो खुश झाला. एका प्रकारचा अननुभूत आनंद त्याला मिळाला. संत समागमाचा तो अलभ्य लाभ होता.

त्याने विचारलें : 'आपण कोण?'

'दासो दिगंबर!'

सीतोपंत चकित झाला. दासोची कीर्ति त्याने ऐकली होती. जो राजाश्रय घेत नाहीं पण महान् भक्त आहे, ज्याने शेकडों लोकांची जीवनें बदलली आहेत, तो दासो दिगंबर हा!

ज्याने उभ्या आयुष्यात कोणासमोर मस्तक नमवलें नाहीं तो सीतोपंत कुळकर्णी म्हातारपणीं दासोपुढें नमला. त्याचे चरण धरले आणि म्हणाला :

'भगवन्! तुमची बुद्धि, तुमचें कर्तृत्व आणि भक्ति फार मोठी आहे. एवढे असामान्य, एवढे सामान्य बनून राहाता यातच आपली महानता आहे. आजपर्यंत मी गुरु केलेला नाहीं. जे मला भेटले ते सर्व रडवे, तेजोहीन व दुबळे होते, देवाजवळ भीक मागत होते. तुम्ही महान् आहात. तुमची भक्ति शूराची आहे. तुम्ही आपल्या जीवनात वेद उतरवले आहेत. तुम्ही माझे गुरु आहात.'

सीतोपंत! तुम्हीच महान् आहात. मी कोणाचा गुरु नाहीं. गुरु बनून कुणाचा बोजा उचलायला हा स्तंभ समर्थ नाहीं.'

'पण भगवंता! गुरु करायचा नसतो, तो आपोआप होतो. देवानंतर जी व्यक्ति डोळ्यांसमोर येते त्याचें नांव गुरु. तुम्ही आजपासून माझे गुरु आहात. तुम्ही जें कांहीं लिहून ठेवाल ती सरस्वतीची पूजा ठरेल. त्या लेखनाने वाङ्मय पुष्ट होईल.'



सीतोपंताने दासोला राहायला बंगला दिला. आपले नोकरचाकर त्याच्या सेवेस वाहिले, दासोपंतांची त्याने राजासारखी व्यवस्था राखली.

दासोने पहाटे उठावें, स्नानसंध्या, ध्यान-धारणा आटपावी व लिहायला बसावें. असा कार्यक्रम सुरू झाला. दासोने **'गीतार्णव'**च्या सव्वालाख पंक्ती लिहिल्या.

असामान्य जीवन असतानाही तो सामान्य माणसासारखा जगला. पशुजीवन जगणारांना दैवीजीवनाकडे वळविलें. **'गीतार्णव'** लिहून त्याने दैवी वाङ्मय पुष्ट केलें आणि माघ वद्य षष्ठीला हा महान् दत्तभक्त दत्तस्वरूपात विलीन झाला.

□□□□□

# चंद्रा व महीपाल

हजारों वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. ज्याकाळीं वैदिक सिद्धांतांचे जीवनात महत्त्व होतें, ते सिद्धांत जीवनात साकार करण्यासाठीं लोक प्रयत्न करत असत, त्या काळची गोष्ट आहे.

कमलापुर नामक एक सुंदर गांव होतें. निसर्गसौंदर्याचा त्याला वरदहस्त लाभलेला होता. त्या गांवाबाहेर भैरवनाथाचें एक रमणीय मंदिर होतें. मंदिराजवळ पिंपळाची एक राई होती. तिच्या छायेत दररोज संध्याकाळी सारा गांव एकत्र होत असे. त्या पिंपळाला लहान लहान ओटे बांधलेले होते. गांवातल्या लहानथोरांनी संध्याकाळच्या वेळी ते ओटे विभूषित झालेले असत. सर्वांचे चेहरे हसतमुख असत. प्रसन्नता ओसंडून वाहात होती. काळोख पडण्यापूर्वी भैरवनाथाचें दर्शन घेऊन सर्व स्त्री-पुरुष हसत खेळत घरीं परतत. तरुणांच्या चेहऱ्यावर कर्तृत्वाचें तेज होतें. आकाशातल्या चंद्रालाही खेचून आणण्याची दुर्दम्य अभिलाषा बाळगणारे तरुण त्या गांवचें वैशिष्ट्य होतें. सगळीकडे प्रसन्नता, शांतता व स्वास्थ्य यांचें साम्राज्य होतें. देवांनासुद्धा तिथे येऊन राहण्याचा मोह व्हावा अशा प्रकारची स्वर्गीय प्रसन्नता त्या गांवाला भूषवित होती.

या सर्वांच्या मुळाशी एका ब्राह्मणाची तपश्चर्या होती. त्या ब्राह्मणाचें नांव चंद्रस्वामी. चंद्रस्वामी अतिशय बुद्धिमान् व विद्वान् होते. तपोवनातील आपला अभ्यासक्रम यशस्वीरीतीने पुरा करून त्यांच्या इतर सहाध्यायी बंधूनी स्वतःचा संसार सुखी व्हावा यासाठीं राजाश्रय घेतला होता. परंतु चंद्रस्वामी व्रतनिष्ठ होते. ब्राह्मण्याचें पालन व सेवा यांनी जो आपलें जीवन चालवतो तोच खरा पंडित अशी त्यांची धारणा होती. **विनाश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लता** (स्त्री, वेल आणि पंडित आश्रयाशिवाय शोभून दिसत नाहीत ) असें म्हणत राजाश्रय घेणाऱ्या इतर पंडितांसारखी त्यांची वृत्ति नव्हती. पंडित अन् आश्रय ही गोष्ट त्यांना मान्य नव्हती.



दुसऱ्याच्या आश्रयाने उभा राहिला तर तो पंडित कसला? प्रभूशिवाय इतर कोणाचाही आश्रय त्यांना मंजूर नव्हता. चंद्रस्वामींनी गरिबी पत्करली. गरिबीचा आपण होऊन स्वीकार केला.

गृहस्थाश्रमाच्या उषःकालीं एका संध्याकाळीं हा निर्धन ब्राह्मण आपल्या पत्नीला विचारीत होता : 'देवमति तू माझी सहचारिणी आहेस. जीवनातील जोडीदारीण आहेस. आपण अग्निसमक्ष प्रतिज्ञा घेतलेली आहे: **धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि।** या प्रतिज्ञेप्रमाणे जीवनाच्या या कठीण रस्त्याने तू माझें अनुसरण करीत आहेस. परंतु तुला असें नाहीं कां वाटत कीं माझे सहाध्यायी राजाश्रय घेऊन सुखाने संसार करीत आहेत अन् मी इतका विद्वान्, इतका बुद्धिमान् असूनही कोरडी भाकरी मिळविण्यासाठीं गांवोगांव हिंडतो आहे. हा माझा अव्यवहारीपणा नव्हे काय? जाणून बुजून मी सुखसमृद्धीचा राजरस्ता सोडून बिकट मार्गाने जात आहे. माझा रस्ता चुकला असें तुला नाहीं ना वाटत? तुझ्या शरीरावर असलेले हे फाटके कपडे पाहून लंकेची पार्वती असलेल्या तुला असें नाहीं कां वाटत कीं यापेक्षा मी दुसऱ्या एखाद्या पंडिताची पत्नी झाले असते तर किती सुखात असते! सोन्याच्या बांगड्यांनी, मोत्यांच्या हारांनी व हिऱ्यांच्या दागिन्यांनी हें सुंदर शरीर मढवून काढलें असतें.'

'तुम्ही माझे पतिदेव आहात. तुम्हीच माझें सर्वस्व आहात. माझे **गुरु** आहात. तुमच्या सहवासापेक्षा मला दुसरें काय हवें असणार? **लाचारीने** मिळविलेल्या अलंकारांपेक्षा सुतात ओवलेलें मंगळसूत्र किती तरी **चांगलें** आहे! राज्याश्रित होऊन बक्षिस म्हणून फेकलेल्या मिठाईच्या चार **तुकड्यांपेक्षा** मिळालेली कोरडी भाकरी किती तरी पटीने श्रेष्ठ आहे असें **मी** मानते. यातच मला आनंद आहे.'

अशा तऱ्हेने बोलत बोलत व्रतनिष्ठ पति-पत्नी आपल्या दोन **मुलांसह फिरत** फिरत भैरवनाथाच्या मंदिराजवळ पोचली. भैरवनाथाचें **दर्शन घेतलें.** विश्रांतीसाठीं पिंपळाच्या ओट्यावर बसली. त्या रमणीय **स्थानाने चंद्रस्वामींचें** मन हरखून गेलें. त्यांनी त्या मंदिरात मुक्काम केला.

मंदिराच्या समोर एक विस्तीर्ण पटांगण होतें. दररोज संध्याकाळीं त्या पटांगणात खेळणाऱ्या छोट्या छोट्या बालकांना चंद्रस्वामी प्रेमाने बोलावीत. त्यांच्याशी गप्पागोष्टी करीत व हसत खेळत त्या बालकांना सद्‌विचार व सदाचार यांचे धडे देत. सुंदर सुंदर सांस्कृतिक कथा सांगून सर्वांची अंत:करणें त्यांनी जिंकली होती. दिवसेंदिवस मुलांना चंद्रस्वामींविषयीं आकर्षण वाटूं लागलें. मुलें घरीं गेल्यावर चंद्रस्वामींचें वर्णन करूं लागली. 'मंदिरात एक फारच चांगले ब्राह्मण आले आहेत. ते आमच्याशी खेळतात. आम्हाला प्रेमाने जवळ बोलावतात. सुंदर सुंदर गोष्टी सांगतात. त्यांच्या गोष्टी आम्हाला खूप खूप आवडतात. त्यांचा चेहराही किती किती प्रसन्न!' हळूहळू त्या मुलांचे आईवडीलही त्यांना भेटायला येऊं लागले. गांवातले लोकही त्यांना मान देऊं लागले. चंद्रस्वामींचे विचार श्रवण करूं लागले. चंद्रस्वामी आजारी लोकांना आश्वासन देत, स्वत: प्रभुभक्ति करीत व दुसऱ्यांना करायला प्रवृत्त करीत. समाधानी जीवन कसें जगायचें हें लोकांना समजावून सांगत. लोकांना तेजस्वी, वैदिक विचारांचा स्वाध्याय करण्याचा वसा देत आणि सोबतच प्रभुभक्ति आणि चित्तएकाग्र करत चंद्रस्वामी आनंदी जीवन व्यतीत करत होते. देवमतीही पतीच्या या कार्यात पूर्णपणे सहभागी होई. ती आजाऱ्यांची शुश्रुषा करी. त्यांना धीर देई.

हळूहळू गांवातल्या लोकांना वाटायला लागलें: हा ब्राह्मण मोठा सज्जन दिसतो. आमच्यासाठीं रक्ताचें पाणी करतो. प्रेमाने आजाऱ्यांची शुश्रुषा करतो. स्वत:ची संपूर्ण कर्तृत्वशक्ति, बुद्धिशक्ति आपल्या भल्यासाठीं, आपण संस्कारी, तेजस्वी आणि सच्चे मानव बनावेत यासाठीं खर्च करतो. जीवनातल्या सुंदर सुंदर गोष्टी आम्हाला शिकवितो. ते आणि त्यांच्या पत्नी अर्थार्जनासाठीं स्वत:ची शक्ति वापरीत नाहीत. तेव्हा त्यांच्या योगक्षेमाची जर आम्ही व्यवस्था केली नाहीं तर आम्ही कृतघ्न ठरूं. आपण सर्व गृहस्थाश्रमी असताना अशा प्रकारच्या विद्वान्, निस्पृह व तेजस्वी ब्राह्मणाला कंदमुळांवर राहायला लागावें ही आपल्याला नामुष्कीची गोष्ट नाहीं कां? त्यातही त्यांना महीपाल व चंद्रा अशी दोन गोंडस मुलें आहेत.



चंद्रस्वामींकडे येणारी प्रत्येक व्यक्ति थोडें थोडें धान्य घेऊन येऊं लागली. चंद्रस्वामींना कोडें पडलें. इतक्या प्रेमाने हे लोक धान्य घेऊन येतात. त्यांना नको तरी कसें म्हणायचें? ही बिचारी सामान्य माणसें आहेत. स्वत:च्या मुलांच्या तोंडातला घास काढून मला धान्य देत असतील तर त्याचा स्वीकार तरी कसा करायचा? पण दुसऱ्याच क्षणीं चंद्रा व महीपाल यांची मूर्ति डोळ्यांसमोर उभी राही. पितृहृदय प्रेमाने भरून जाई. म्हणून न मागता आलेलें व लोकांनी प्रेमाने दिलेलें तें धान्य ईश्वराने पाठविलें असेल असें समजून त्यांनी तें स्वीकारायचें ठरविलें.

लोकांच्या जीवनात चंद्रस्वामींना आता सन्मानाचें व गौरवाचें स्थान प्राप्त झालें होतें. ते आलेलें दु:ख सहन करायला लोकांना शिकवूं लागले. भक्ति व कर्म यांचे सिद्धांत समजावून देऊं लागले. चंद्रस्वामींची प्रेमळ अन् ओजस्वी वाणी सर्वांच्या अंत:करणाचा ठाव घेत असे. जीवनाचा खरा दृष्टिकोन समजावून घेण्यासाठीं लोकही स्वयंस्फूर्तीने त्यांच्याजवळ येऊं लागले. सर्व लोक एकत्र बसून नियमित स्वाध्याय करूं लागले.

महीपाल व चंद्रा, चंद्रस्वामींची मुलें, स्वत:च्या निरागस क्रीडेने घरातील वातावरण प्रफुल्ल ठेवीत. हळूहळू चंद्रस्वामींच्या संसारातील दु:खाचे मेघ दूर होऊं लागले. त्यांचा संसार सुखी होऊं लागला. गांवातही वेगळेंच वातावरण दिसूं लागलें.

चंद्रस्वामींची कीर्ति आजूबाजूच्या गांवांतही पसरूं लागली. विद्वान् व धनिकही त्यांच्याजवळ येऊं लागले. चंद्रस्वामी तरुणांजवळ बसून त्यांचे प्रश्न सोडवूं लागले. ते बालकांशी खेळत व मोठ्यांना मार्गदर्शन पण करीत. श्रीमंतही चंद्रस्वामींची संभावना करूं लागले. त्यामुळें चंद्रस्वामींची आवक वाढूं लागली. पण त्याच बरोबर त्यांना वाटूं लागलें ही कांहीं खरी संपत्ति नव्हे. उदार अंत:करण हीच खरी संपत्ति होय. मुलांच्या तोंडातील घास काढून एक मूठभर धान्य देणाऱ्या श्रमजीवी व्यक्तीचें अंत:करण कुठे व लाखो रुपये मिळविल्यावर पांचपन्नास रुपये देणाऱ्या श्रीमंताचें हृदय कुठे! पण, न मागता आलेली संपत्ति ईश्वराचीच असें समजून त्या संपत्तीचा ते स्वीकार करीत.

तसेंच त्यांना वाटलें, 'आता गरीब श्रमिकांकडून कसें स्वीकारावें? पण लगेच प्रश्न पडला, 'त्यांना नाहीं तरी कसें म्हणावें?' शेवटी, गरीबांनी आणलेल्या धान्यातून प्रतीकरूपाने थोडेंसें ठेवून उरलेलें प्रसादरूपाने त्यांनाच परत देऊं लागले. ते गरिबांना सांगूं लागले : 'ईश्वराला विसरूं नका. विशुद्ध अंत:करणाने व दुर्दम्य निष्ठेने जीवन जगण्याचा प्रयत्न करा. भगवंताला तुमची काळजी घ्यावीच लागेल.' गीतेतही भगवंताने हाच संदेश दिलेला आहे :

**अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।।**

या भगवद्वचनाची सार्थकता चंद्रस्वामींच्या अनुभवाला आली. प्रभु-कृपेने त्यांचें धान्याचें कोठार हळूहळू भरूं लागलें. चंद्रस्वामी सांस्कृतिक व आध्यात्मिक दृष्टींनी सुखी होतेच. ते आता भौतिक दृष्टीनेही सुखी झाले व सारा गांव त्यांनी सुखी केला.

परंतु सगळेच दिवस कांहीं सारखे नसतात. त्या गांवावर भगवंताचा एकाएकी कोप झाला. पावसाळ्यात पाण्याचा एक थेंबही पडला नाहीं. हिरवीगार दिसणारी शेतें भयाण दिसूं लागली. गांवकऱ्यांनी एक वर्ष कसें तरी काढलें. दुसरें वर्षही तसेंच गेलें. कमलापुर गांवात हाहाकार उडाला. लोकांजवळ धान्याचा एक कणही राहिला नाहीं. कोवळीं बालकें अन्नाशिवाय तडफडूं लागली. ज्यांच्याजवळ पांच-पांच दहा-दहा वर्षें पुरेल इतकें धान्य असायचें त्यांनाही त्या दुष्काळाची झळ लागूं लागली.

धनिकांच्या घरांसमोर भुकेने कासाविस झालेल्या लोकांच्या रांगाच्या रांगा लागूं लागल्या. 'आम्हाला खायला द्या!' अशा करुण किंकाळ्यांनी सारें गांव भरून जाऊं लागलें.

चंद्रस्वामींनी देवमतीला सांगितलें : 'आपल्या घरात पुष्कळ धान्य आहे. या भुकेलेल्या लोकांना यातलें थोडेंसें धान्य दिलें तर नाहीं कां चालणार?'



'संकट ज्याच्यावर येतें त्यालाच संकटाची कल्पना असते. दुपारी बारा वाजता मुलें वडिलांजवळ जात नाहीत. ती आईजवळ जातात. हें सर्व धान्य जर या भुकेलेल्या लोकांना दिलें तर आपली मुलें काय खातील? आपल्यालाही दोन मुलें आहेत हें तुमच्या ध्यानात आहे ना? आज सगळें धान्य देऊन टाकलें तर उद्या त्यांना मी खायला काय देऊं?' देवमतीचें मातृत्व जागृत झालें.

प्रसंगाचें गांभीर्य चंद्रस्वामींच्या लक्षात आलें. भगवंताने जें दिलें होतें तें सर्वच्या सर्व मी गृहलक्ष्मीच्या हवाली केलें. कोठाराची ती मालकीण आहे. तिला दु:खी करून बळजबरीने धान्य देण्यात काय हशील?

दिवसांमागून दिवस जात होते. एक दिवस चंद्रा व महीपाल ओट्यावर खेळत होती. त्यावेळीं एक माता आपल्या दोन बालकांसाठीं धान्याची भीक मागत जात होती. मुलें त्या ओट्यापाशी थांबली. त्यांनी महीपालाजवळ खायला मागितलें. हें दृश्य पाहून चंद्राला अतिशय दु:ख झालें. आपल्या वयाच्या या बालकांना अन्नासाठीं घरोघरी भीक मागत फिरावें लागत आहे आणि आपण दोन्ही वेळा पोटभर जेवत आहोत!

चंद्रा धावत धावत आईकडे गेली व म्हणाली : 'आई! या मुलांना तू कांहीं खायला दे ना गं! बिचारी भुकेलेली आहेत, रडत आहेत.'

'बाळ! मी यांना कुठून देऊं? आणि जर यांना दिलें तर मग तुम्ही काय खाणार?' देवमति म्हणाली.

चंद्राला ह्या बालकांचें दु:ख पाहावेना. ती लाडिक स्वरात म्हणाली: 'आई! आमच्यासाठीं संध्याकाळीं तू जी भाकरी करणार आहेस ती तू यांना दे ना! आम्ही भाकरीसाठीं हट्ट नाहीं करणार.' इतक्यात महीपाल आला. तो म्हणाला : 'आई! असें असेल तर आम्ही एक वेळच जेवूं, पण या भुकेलेल्या बालकांना खायला दे ना गं!'

देवमतीच्या ठिकाणीं असलेली सांस्कृतिक भावना जागृत झाली. त्या भावनेने मातृत्वाच्या ममतेवर विजय मिळविला. तिने त्या मुलांना बोलावलें

व पोटभर जेवूं घातलें. चंद्रस्वामींना वाटलें : जणू भगवानच या मुलांच्या द्वारे बोलला. त्यांचे डोळे अश्रूंनी भरून आले. देवमतीच्या सहमतीने दोघांनीही निर्णय केला : लोकांपासून मिळालेल्या धान्याचा आपण लोकांसाठींच उपयोग करूंया.

कमलापुर गांवात असे किती तरी लोक होते, कीं ज्यांना याचना करण्यापेक्षा उपाशी मरणेंच श्रेयस्कर वाटत होतें. चंद्रस्वामी अशा प्रकारच्या लोकांच्या घरी गेले व त्यांना विचारलें : 'तुम्ही श्रीमंतांकडे धान्य मागायला कां जात नाहीं?'

'तुम्हीच आम्हाला तेजस्वी दृष्टिकोन नाहीं कां शिकविलात! तेजस्वी जीवन कसें जगावें हें तुमच्यापासूनच नाहीं कां शिकलो? अन् आज तुम्हीच मागायला जाण्याचा उपदेश करीत आहात!'

चंद्रस्वामी घरी आले. पत्नीला अनेक माणसांचा स्वयंपाक करायला सांगितला. सर्वांना त्यांच्या घरी जाऊन आपल्या घरी भोजनाला यायचें आमंत्रण दिलें.

'तुमच्या घरी आम्ही कसें जेवूं? तुमच्यासारख्या पवित्र, श्रोत्रिय व तपोनिष्ठ ब्राह्मणाला आम्हीच कांहीं तरी द्यायला पाहिजे. तुमचें अन्न आम्ही कसें खाणार?'

चंद्रस्वामींनी लोकांची समजूत घातली. चंद्रस्वामी म्हणाले : 'हें कोठार माझें नव्हे. मी शेती केली नाहीं, व्यवसाय केला नाहीं, कोणाची नोकरी केली नाहीं. त्यामुळें माझ्याजवळ जें काहीं आहे तें तुमचेंच आहे. त्यात माझें कांहींही नाहीं. तुम्हाला जें मी खायला देणार आहे तें सर्व तुमचेंच आहे.'

चंद्रस्वामींचें म्हणणें लोकांना पटलें. ते चंद्रस्वामींकडे भोजनाला आले. चंद्रस्वामींचें घर आता अन्नछत्र झालें होतें. परंतु मोठेपणाची हाव असलेल्या श्रीमंतांना हें सहन झालें नाहीं. त्यांना वाटलें : हा ब्राह्मण आमच्या पैशावर मोठेपणा मिळवीत आहे. त्यांनी चंद्रस्वामींकडे धान्य



पाठवायचें बंद केलें. चंद्रस्वामींची स्थिति मोठी चमत्कारिक झाली व येणारी आवक कमी झाली. खर्च तर अमाप होता. कोठाराने तळ गाठला. शेवटीं असा एक दिवस उगवला कीं त्या दिवशीं स्वतःच्या मुलांनाही द्यायला कांहीं उरलें नाहीं.

देवमति चंद्रस्वामींजवळ येऊन रडूं लागली. म्हणाली : 'उद्या चंद्राने खायला मागितलें तर तिला काय देऊं? महीपालाला, खायला नाहीं, असें कोणत्या तोंडाने सांगूं?'

चंद्रस्वामींनी तिला आश्वासनपूर्वक सांगितलें : 'तू भगवंतावर पूर्ण श्रद्धा ठेव.

**अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।।**

भगवान् आपल्याला योग्य तो मार्ग दाखवील.'

परंतु एवढ्याने देवमतीचें समाधान झालें नाहीं. ती म्हणाली : 'एक गोष्ट सांगूं कां? रजतपुर इथून फार दूर आहे व तिथे दुष्काळही नाहीं. आपण तिथे गेलो तर?...'

'देवमति! तू चुकतेस. समाजवृक्षाला जीवनरूपी खत घालावें तेव्हाच तो मोठा होतो. एक सामान्य संकट आलें तर त्यामध्ये तुझी तेजस्वी वृत्ति नष्ट झाली? तुला आठवत असेल : चंद्राच्या जन्माच्या वेळीं तू स्वतःच आपल्या माहेराला शेवटचा रामराम केला होतास. तिथे तू आज आश्रय घेण्यासाठीं जाणार? ज्या मुखाने प्रभूचें नामस्मरण केलें जातें. त्याच मुखाने तू भावाजवळ जाऊन आश्रयाची भीक मागणार? तुझ्या भावाच्या लग्नाच्या वेळीं तू माहेरी गेली होतीस. अनेक श्रीमंत स्त्रिया तिथे गोळा झाल्या होत्या. अहेरासाठीं मौल्यवान दागिने घेऊन आल्या होत्या. तुझ्याजवळ अहेरासाठीं द्यायला कांहींच नव्हतें. मी तुला जाऊं नको म्हणून सांगितलें होतें परंतु तू भावाच्या प्रेमाखातर गेलीस. बहिणीने प्रेमाने दिलेली कोणतीही वस्तु त्याला चालेल असें तू म्हणालीस. अहेराचे वेळीं

साडीच्या पदराला बांधलेलें मूठभर पोहे भावाला दिलेस व म्हणालीस : 'दादा! मी अतिशय गरीब आहे. माझ्याजवळ तुला द्यायला दुसरें कांहीं नाहीं. थोडेसे पोहे होतें ते दिले. गरीब बहिणीची ही प्रेमभेट आहे. या पोह्यांचा स्वीकार कर. तुझें वैवाहिक जीवन सुखाचें होईल.' जमलेल्या लोकांनी तुझी मस्करी केली. आईलाही तुझी कींव आली. गरीब बिचारी! पोह्यांशिवाय दुसरें काय असणार? भावाला पोहे घेतेवेळीं संकोच वाटला. शेवटी तिथेच पोहे टाकून जेवल्याशिवाय तू निघून आलीस हें विसरलीस वाटतें!'

'हें मी बोलत नसून माझ्या ठिकाणीं असलेली माता बोलत आहे. मला आपल्या जाण्याविषयी कांहींच म्हणायचें नाहीं. परंतु मुलांना तरी पोचवून येऊंया. आपण अयाचक व्रत घेतलेलें आहे. त्या व्रताच्या पालनासाठीं कितीही सहन करावें लागलें तरी सहन करूंया. पण या कोवळ्या पोरांनी तर हें व्रत नाहीं ना घेतलेलें? अशा या वेळीं अन्नाशिवाय मुलांना तडफडत ठेवणार काय?'

दुसऱ्या दिवशीं सकाळी मुलांना आजोळीं पाठवायचें असें चंद्रस्वामींनी ठरविलें व देवमतीने चंद्रस्वामींच्या व्रताचें पालन करावें असें ठरवून दोघेंही झोपी गेली.

मुलें आपल्यापासून वेगळी होणार या भावनेनेच देवमतीला अतिशय दुःख झालें परंतु या प्रसंगीं त्यांच्यापुढें दुसरा कोणताच उपाय नव्हता. दुसऱ्या दिवशीं सकाळी मुलांना अतिशय प्रेमाने जवळ बोलावलें व म्हणाली : 'महीपाल! चंद्रा! तुम्ही आपल्या मामाकडे जात आहात पण एक गोष्ट लक्षात ठेवा. तिथे मामा-मामींना बिलकुल त्रास द्यायचा नाहीं. मी तिथे नाहीं. मुळीच भांडायचें नाहीं.' हें शब्द बोलताना आईचें हृदय भरून आलें. 'महीपाल तू मोठा झाला आहेस. तुला आता बहिणीला सांभाळलें पाहिजे. सकाळी उठल्याबरोबर मामा-मामींना नमस्कार करायचा.' यापुढें तिला बोलवेना.

चंद्रा म्हणाली : 'आई! तुला आम्ही नेहमी विचारीत असूं, कीं आमचा मामा कुठे आहे? तू सांगायचीस : भैरवनाथ तुमचा मामा आहे.



मग आज हा मामा कोठून आला?' बिचाऱ्या आईच्या डोळ्यात अश्रू झळकले. तिने चंद्राला छातीशी धरलें. तिला कडकडून भेटली. कारण त्या प्रश्नाने ती खरोखरच निरुत्तर झाली होती.

'अतिशय प्रेमाने दोघांना आंघोळ घातली. जेवूं घातलें व शेवटीं दोघांच्याही हातावर दही घातलें. चंद्रस्वामी दोघांना घेऊन निघाले. इतक्यात चंद्राने आकांत केला : 'आई! तू नाहीं का आमच्याबरोबर येणार? मला तुझ्याशिवाय चैन पडणार नाहीं.'

'आपण रोज संध्याकाळीं स्वाध्याय करतो, जर मी आले तर मग इथे स्वाध्याय कोण करवील? तुमचे बाबा तुमच्याबरोबर आहेत ना?' देवमति म्हणाली.

'पण आई! भगवान् तर सर्वत्र आहे. आपण मामाच्या घरीं भजन करूं.' कांहीं कांहीं वेळा मुलांच्या प्रश्नांची उत्तरें देता येणें कठीण होऊन जाते. देवमतीचीही अशीच अवस्था झाली. ती म्हणाली : 'बाळांनो! तुम्ही बाबांबरोबर पुढें चला. मी घरातलें काम आटोपून मागोमाग आलेंच.' मुलांचें तात्पुरतें तरी समाधान झालें.

चंद्रस्वामी दोन बालकांचें हात धरून चालूं लागले. डोंगरावरून अनिमेष नेत्रांनी डोळ्यात आसवें आणून देवमति आपल्या लाडक्यांना न्याहाळीत होती. हळूहळू मुलें क्षितिजापलीकडे जात होती. ती आता दिसेनाशी झाली होती तरी देखील तिला तिथून उठून जावें असें वाटेना. इतक्यात भैरवनाथाची घंटा वाजली व ती तिथून अनिच्छेनेच परतली.

आता दुपार झाली होती. सूर्यनारायण आपल्या प्रखर किरणांनी पृथ्वीला तापवीत होता. साहजिकच चंद्राला तहान लागली. विश्रांतीसाठीं मुलांसह चंद्रस्वामींनी एका झाडाचा आश्रय घ्यायचें ठरविलें. पण पाणी कुठे मिळणार? इतक्यात समोरून दोन चार लोक येताना दिसले. आशा जागृत झाली. यांच्याजवळ पाणी मिळेल असें वाटलें. ते भिल्ल होते. त्यांनी लांबूनच झाडाखाली बसलेल्या एका तेजस्वी ब्राह्मणाला पाहिलें.

ते जवळ आले. त्याबरोबर चंद्रस्वामींनी विचारलें : 'बाबांनो! तुमच्याजवळ पाणी आहे कां?' 'हो; चला माझ्याबरोबर. मी दाखवतो तुम्हाला पाणी.' असें बोलून एक भिल्ल पुढें चालूं लागला. महीपाल व चंद्रा यांना झाडाखाली बसवून चंद्रस्वामी त्या भिल्लांबरोबर निघून गेले. थोडेंसें अंतर चालून गेले तरी पाणी दिसेना. तेव्हा अधीर होऊन चंद्रस्वामींनी विचारलें : 'किती लांब आहे अजून पाणी? माझी मुलें झाडाखाली पाणी पाणी करीत बसली असतील!' 'मुकाट्याने माझ्याबरोबर चल.' असें बोलून तो भिल्ल सिंहदृष्ट नांवाच्या भिल्लांच्या राजाकडे चंद्रस्वामींना घेऊन आला.

स्वत:ची सुटका करावी म्हणून चंद्रस्वामींनी त्या राजाची खूप विनवणी केली. 'माझी मुलें तिकडे तहानेने तडफडत असतील. या भयाण जंगलात त्यांची चमत्कारिक अवस्था झाली असेल. म्हणून मला जायला परवानगी द्या.' जायला परवानगी देण्याची गोष्ट दूरच राहिली, उलट राजाने त्यांना धमकी दिली : 'तुझी मुलें भुकेने मरतील ही गोष्ट कदाचित् खरीही असेल परंतु आमची मुलें भुकेने मरताहेत त्याची वाट काय? तुला माहीत आहे कां? देवीने स्वप्नात येऊन असा दृष्टांत दिला आहे कीं एका तेजस्वी ब्राह्मणाचें बलिदान दिलेंस तर पाऊस पडेल! खबरदार इथून पळून जाण्याचा विचार करशील तर!' 'राजा! मी ब्राह्मण आहे. माझें बलिदान करूं नकोस. मला सोडून दिलेंस तर तुला पुण्य मिळेल.' चंद्रस्वामींनी समजावण्याचा प्रयत्न केला.

'अशा प्रकारचा तेजस्वी ब्राह्मण पुन्हा कोठून मिळणार? याला गुहेत घ्या.' राजाने हुकूम फर्मावला.

चंद्रस्वामी गुहेत बसल्या बसल्या प्रभु-स्मरण करूं लागले. 'भगवंता! माझ्या बलिदानाने शेकडो जीव जगणार असतील तर मी मरायला तयार आहे. मी मरणाला भीत नाहीं. मी आजपर्यंत कोणतेंही वाईट काम केलेलें नाहीं; मग मी मरायला काय म्हणून भिऊं? उलट या देहाचा योग्य उपयोग करून मी माझी सारी शक्ति तुझ्यासाठीं खर्च केली आहे. परंतु मीही या संसारातला एक जीव आहे. मीही प्रेमतंतूंनी बांधला गेलो आहे. माझा महीपाल व चंद्रा यांचें काय होईल? संपूर्ण जीवनभर जिने



निष्ठापूर्वक मला साहाय्य केलें त्या देवमतीची काय अवस्था होणार? भगवंता! कोणत्या जन्मातील पापामुळें ही अनर्थ परंपरा माझ्यावर ओढवली आहे? माझी चूक नसेल तर ही शिक्षा कशासाठीं? प्रभो! एकदा तरी माझी व माझ्या मुलांची भेट करव....' असा आक्रोश करता करताच चंद्रस्वामींचा डोळा लागला.

स्वप्नात चंद्रस्वामींना मुलें परत भेटतील असें दैवी आश्वासन मिळालें. भगवंताची लीला खरोखरच अतर्क्य आहे. संपत्ति तोच देतो व आपत्तीही त्याच्यामुळें प्राप्त होतें. संपत्तीच्या शिखरावरून आपत्तीच्या दरीत तोच फेकून देतो अन् सामान्य मानव विचारूंही शकत नाहीं कीं हें असें कां?

भगवंताने चंद्रस्वामींचा आर्त नाद ऐकला. भद्रकालीने राजाला आदेश दिला : 'या पवित्र ब्राह्मणाच्या केसाला जरी धक्का लागला तर याद राख. तुझा निर्वंश होऊन मरशील.' दुसऱ्या दिवशीं राजा चंद्रस्वामींजवळ आला. त्याने त्यांची माफी मागितली व इष्ट दिशेकडे जायला त्यांना परवानगी दिली.

दुपार टळली तरी वडील आले नाहीत. कां बरें आलें नाहीत? त्यांना तहान अगदी असह्य झाली होती. संध्याकाळ झाली तरी बाबा आलें नाहीत. मुलांना वाटलें : परमेश्वराने आपल्यावरचें छत्र हिरावून घेतलें. त्या भयानक जंगलात संध्याकाळच्या वेळीं दोन बालकें एकटी होती. चंद्रा रडूं लागली. 'भाऊ! बाबा केव्हा येणार?' 'रडूं नकोस बाळ! बाबा आता येतील पाणी घेऊन.'

'दादा! मला भीति वाटते ना रे!'

'चंद्रा! भिऊं नकोस. मी आहे ना तुला सोबत.' इतका वेळपर्यंत छोटा असलेला महीपाल प्रौढ झाला. दहा वर्षांचा महीपाल पांच वर्षांच्या चंद्राला आश्वासन देऊं लागला.

'दादा! मी दमले रे!'

'चंद्रा! मी आहे ना! मी तुला उचलून घेईन म्हणजे झालें ना!' प्रसंग माणसाला निर्भय करतो. जबाबदारी माणसाला शहाणा करते. चंद्राला खांद्यावर घेऊन महीपाल चालूं लागला. रस्त्यात एखादें फळ मिळालें तर अगोदर तें तो चंद्राला देई व मगच स्वत: खाई. नेहमी अगोदर खाणारा महीपाल आज स्वत: न खाता अगोदर मला खायला देत आहे याचें तिला मोठें कौतुक वाटलें. गरिबीतच माणुसकीचें दर्शन होत असतें, असें म्हणतात तें खोटें नव्हे.

वडिलांनी शिकविलेली स्तोत्रें म्हणत म्हणत धापा टाकीत ती दोघें मार्गक्रमण करीत होती.

**विवादे विषादे प्रमादे प्रवासे**
**जले चानले पर्वते शत्रुमध्ये**
**अरण्ये शरण्ये सदा मां प्रपाहि**
**गतिस्त्वं गतिस्त्वं त्वमेका भवानि।।**

हे भवानी माते! तुझा एकटीचाच आम्हाला यावेळीं आधार आहे. भगवान् सहस्त्ररश्मीही हळूहळू विश्रांतीसाठीं निघाला. काळोख पडूं लागला. महीपाल मनातून चांगलाच घाबरला होता. पण बाहेरून चंद्राला धीर देत होता: 'घाबरूं नकोस हं!'

'पण दादा! तू तर घाबरलेला दिसतोस.'

'छे! छे! मला अन् भीति! तुला आठवतें कां? बाबा म्हणत असत : पुरुष कधीही कुणाला घाबरत नाहीत. मी तर पुरुष आहे. मला कसली आलीय भीति! रामरक्षा म्हणत दोघेंही अंतर कापीत होती.

इतक्यात लांबून दहा-पंधरा बैलगाड्यांचा एक तांडा येताना दिसला. सार्थधर नावाचा वाणी व्यापार करून आपल्या गावीं चालला होता. त्याने रामरक्षा म्हणत म्हणत जाणाऱ्या त्या बालकांना पाहिलें. त्यांच्या दृष्टीत भीति ओतप्रोत भरलेली होती. इतकी सुंदर मुलें अन् या भयानक जंगलात, अशा या रात्रीच्या वेळीं? त्याच्या मनात त्या मुलांविषयी



आपुलकी निर्माण झाली. तत्काळ त्याने गाडीतून उडी मारली, चंद्राला उचलून घेतलें व महीपालाला विचारलें : 'तुम्ही मुलें इथे एकटी कशी?'

महीपाल म्हणाला : 'आमचे वडील हरवले आहेत.' त्यांची निरागस वृत्ति पाहून सार्थधर अतिशय खूष झाला. त्या सुंदर मुलांना पाहून त्यांच्याविषयी त्याला ममत्व निर्माण झालें होतेंच पण त्यांची मधुरवाणी, निरागस भाव पाहून तर त्याला राहावलें नाहीं. त्याने विचारलें : 'माझ्याबरोबर येणार कां?' मुलांनी 'हो' म्हटलें. भूक व तहान यांनी ग्रासलेल्या त्या बालकांनी आप-पर भावाचा यत्किंचितही विचार केला नाहीं. भगवान् सर्वांचीच व्यवस्था करतो. परंतु आपण मात्र निष्कारण उतावळेपणा करतो. याचाच अर्थ आपली भगवंतावरील श्रद्धा कच्ची!

रस्त्यात त्या दोन्ही बालकांनी त्या सार्थधराचें हृदय जिंकलें. सार्थधर स्वत:ला भाग्यवान् समजूं लागला; नाहीं तर अशा प्रकारची संस्कारी बालकें माझ्या घरीं कशी आली असती? घरी आल्याबरोबर पत्नीला बजावलें : 'ही बालकें संस्कारी आई-बापांची संतती आहे. ही अतिशय संस्कारी आहेत. यांना रत्नासारखी सांभाळ. ही आपलीच बालकें आहेत असें समज.' जणूं सार्थधराचें बोलणें यथार्थ करण्यासाठीं की काय बालकांनी सार्थधराच्या घरातील सारें वातावरण बदलून टाकलें.

अरुणोदयापूर्वी ती बालकें उठत. स्नान करून प्रार्थना करीत. नंतर सूर्यनमस्कार करीत व सार्थधराच्या पत्नीच्या- रत्नप्रभेच्या चरणांना वंदन करीत. त्यांना नेहमी वाटायचें : आपली मुलें आपल्याला प्रणाम करीत नाहीत पण ही परक्याची मुलें आपल्याला वंदन करतात. आपण या सन्मानाला पात्र नाहीं. ती पात्रता येण्यासाठीं ती दोघेंही लवकर उठून महीपाल व चंद्रा यांच्याबरोबर प्रार्थनेला बसूं लागली. दररोज संध्याकाळीं चंद्रा तुळशीवृन्दावनाजवळ तुपाचा दिवा लावी. प्रेमाने 'शुभं करोति कल्याणं' हा श्लोक म्हणे. सार्थधराची मुलगी दागिन्यांचा जेव्हा हट्ट करायची तेव्हा चंद्रा म्हणायची : 'बाळ, दागिन्यांसाठीं कशाला हट्ट करतेस? हाताचें खरें भूषण तर दान आहे.'

**हस्तस्य भूषणं दानं सत्यं कंठस्य भूषणम्**
**श्रोत्रस्य भूषणं शास्त्रं भूषणैः किं प्रयोजनम्।।**

एखादे वेळीं सार्थधर रागावला तर महीपाल मोठ्या प्रेमाने त्याच्याजवळ जाई व म्हणे : 'बाबा! मी एक गोष्ट तुम्हाला सांगू कां? **क्रोधो हतां मनुष्याणाम्!**' अशा प्रकारचा श्लोक म्हणे. सार्थधराला स्वत:ची चूक कळून येई. कधी कधी चंद्रा त्याच्या मांडीवर बसायची व गोड शब्दांनी लडिवाळपणे म्हणायची : 'बाबा तुम्ही रागावलात कां हो? तुम्ही रागावलात तर तुमचेच आयुष्य कमी होईल.' हें ऐकल्यावर सार्थधर खो खो हसूं लागे. तप्त झालेलें वातावरण क्षणार्धात परत शांत होई. सगळीकडे प्रसन्नता विलसूं लागे.

रत्नप्रभा चिडून नोकरांना शिव्या देऊं लागली, कीं चंद्रा धावत धावत जायची व म्हणायची : 'आई! ही वाणी भगवंताने दिलीय ना गं? मग त्या वाणीने असें अमंगल कां बरें बोलावें; असें माझी आई नेहमीं सांगायची.' अशा प्रकारें घरातल्या प्रत्येक व्यक्तीचें अंत:करण त्यांनी जिंकलें. ती दोघें घरातल्या सर्वांचा जीव की प्राण झाली. कालप्रवाहाबरोबर ती हळूहळू वाढूं लागली. त्यांच्या जीवनसौरभाने सर्वांनाच मोहित केलें.

सार्थधराचें वैभवही दिवसेंदिवस वाढत गेलें. एके दिवशीं तारापुरचा प्रधान सार्थधराकडे पाहुणा म्हणून आला. सार्थधराने त्याच्या आदरातिथ्याची सर्व जबाबदारी महीपालावर सोपविली. महीपालाची नम्रता, विनय व संस्कारी वाणी यांनी प्रधान बेहद्द खूष झाला.

प्रधान सार्थधराला म्हणाला, 'आपली इतक्या वर्षांची मैत्री आहे आजपर्यंत तुझ्याजवळ मी कांहींही मागितलें नाहीं परंतु आज मात्र मी तुझ्याजवळ मागत आहे. माझी मागणी पुरी करणार ना?' सार्थधर होकार देत म्हणाला : 'मला तुमची इच्छा पुरी करता आली तर मी स्वत:ला धन्य समजेन.'

'मला पुत्रसुख नाहीं. महीपाल व चंद्राला पितृसुख नाहीं. म्हणून ही दोन्हीही बालकें मला दे. मी त्यांना पितृसुख देईन' प्रधानाची ही



मागणी ऐकून सार्थधर दिङ्मूढ झाला. अशा प्रकारची मागणी प्रधान करील याची त्याला कल्पनाही नव्हती!

सार्थधर म्हणाला : 'ही मुलें संस्कारी आहेत. त्यांनी आमच्या घराचा संपूर्ण नूरच बदलून टाकला आहे. म्हणून मला ती प्राणापेक्षाही प्रिय आहेत. तुमची इच्छा असेल तर मी पंचप्राणही देईन पण या मुलांना द्यायची कल्पना मला स्वप्नातही सहन होणार नाहीं. तुमची इच्छा असेल तर माझ्या साऱ्या संपत्तीचें मी दान करीन, पण ही गोष्ट शक्य नाहीं.'

प्रधानाने रत्नप्रभेला विचारलें : 'वहिनी! या मुलांना मी घेऊन जाऊं कां?' रत्नप्रभा म्हणाली : 'तुम्ही सांगत असाल तर आमच्या मुलांना मी देईन; पण यांना देणें शक्य नाहीं. या मुलांनी आमचें घर सुधारलें आहे. हें घर तेजस्विता व पावित्र्य यांच्या सुगंधाने भरून टाकलें आहे. ही बालकें म्हणजे दोन सजीव रत्नें आहेत. यांना देणें कसें काय शक्य आहे?'

प्रधानाला कल्पनाही नव्हती, कीं या अनाथ बालकांनी संस्कार व चारित्र्य यांनी या घरातलें संपूर्ण वातावरण बदलून टाकलेलें असेल.

सार्थधरालाही अतिशय दु:ख झालें. कारण इतक्या वर्षांची जुनी मैत्री असूनही आज़पर्यंत मित्राने कांहींही मागितलें नाहीं अन् आज मागितलें पण ती मागणी मला नाइलाजाने पुरी करता येत नाहीं. त्याने खूप विचार केला. खरोखरच या बालकांचे आपण ऋणी आहोत. परंतु या बालकांचें भावी आयुष्य उज्ज्वल होत असेल तर आपण आपल्या स्वार्थासाठीं त्याच्या आड कां बरें यावें? जास्तीत जास्त काय होईल? महीपाल माझ्याबरोबर व्यापार करील परंतु प्रधानाजवळ राहिला तर त्याला उत्कृष्ट शिक्षण मिळेल. त्याचें भविष्य उज्ज्वल होईल. अशा प्रकारच्या तेजस्वी ब्राह्मण पुत्राचें जीवन व्यापारात बरबाद करणें इष्ट नव्हे. असा पूर्ण विचार करून जड अंत:करणाने त्याने चंद्रा व महीपाल यांना प्रधानाच्या हवाली करण्याचें कबूल केलें.

सार्थधर व रत्नप्रभा यांना अतिशय दु:ख झालें. सार्थधराचा मुलगा रडत रडत आला व म्हणाला : 'बाबा! वाटेल तें करा पण महीपालाला देऊं नका.' मुलीनेही चंद्रासाठीं आग्रह धरला. रत्नप्रभेला त्यांच्याशिवाय जगणें अशक्य वाटलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळी महीपाल व चंद्रा यांनी सार्थधर व रत्नप्रभा यांना वन्दन केलें. त्या दोघांनीही त्यांना अश्रुपूर्ण नेत्रांनी निरोप दिला. सार्थधर महीपालाला कडकडून भेटला. रत्नप्रभा तर चंद्राला छातीशी धरूनच ओक्साबोक्शी रडूं लागली. मुलें, नोकर-चाकर इतर माणसें तर अवाक् झाली. सर्वांचे डोळे पाणावले. हें दृश्य पाहिल्यावर प्रधान तर स्तिमितच झाला. त्याचेंही हृदय भरून आलें. तो सार्थधराला म्हणाला : 'रडूं नकोस. मी चंद्रा व महीपाल यांच्यावर प्रेम करीन, त्यांना कधीही अंतर देणार नाहीं.'

'तुम्हाला मी कोणत्या शब्दांनी सांगूं? ही बालकें या घराचे प्राण आहेत. या घरातलें मूर्तिमंत चैतन्य आहेत. त्यांच्याशिवाय घर म्हणजे जणूं प्राणहीन शरीर! ही जाणार ह्या कल्पनेने मला कालपासून जेवणही गेलें नाहीं. पूर्वजांच्या पुण्याईमुळें असल्या संस्कारी बालकांचा मला लाभ झाला. अनिकेत अवस्थेत आली पण या घराचें चैतन्य होऊन राहिली.' निरोप देतानाचें तें दृश्य अतिशय भावपूर्ण होतें. सार्थधर गहिवरला व म्हणाला : 'महीपाल! बाळ! आम्हाला विसरून जा! चंद्राची काळजी घे!' इतकें बोलून त्याने तोंड फिरवलें. त्याच्या नेत्रात अश्रू झळकले.

'बाबा! आपल्याला कोणी थोडेंसें पाणी जरी दिलें तरी त्याला आपण विसरता कामा नये अशा प्रकारचें शिक्षण आम्हाला लहानपणापासून मिळालें आहे. मग ज्यांनी इतकी वर्षें आमचें संगोपन केलें, आमच्यासाठीं रक्ताचें पाणी केलें त्या आई-बापांना तुम्ही विसरायला सांगता? ही गोष्ट शक्य आहे कां?' असें म्हणत महीपाल रथात बसला.

रत्नप्रभेच्या रुदनाबरोबर रथाचेंही रुदन सुरू झालें. दोघांनाही घर भकास वाटूं लागलें.



भगवंताची लीला अतर्क्य आहे. कोणावर कोणता प्रसंग केव्हा येईल हें सांगणें कठीण आहे. मानव तर त्याच्या हातातलें खेळणे आहे. कठपुतळ्यांच्या खेळातल्या बाहुलीप्रमाणे तो जसें नाचवील तसें नाचायला पाहिजे. आपण त्या महान् सर्जनहाराच्या हातातली एक एक कठपुतळीच. भगवंताने गीतेमध्ये म्हटलें आहे, **'भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया।'**

प्रधानाकडे आल्यानंतर महीपाल खूप शिकला. आता तो तरुण झाला होता. शारीरिक संपत्तीबरोबर बौद्धिक संपत्तीही त्याने संपादन केली होती. तो आता राज्यशास्त्रातही प्रवीण झाला होता. शस्त्रास्त्रविद्यांतही तो पारंगत झाला. प्रधानाची इच्छा होती. त्याच्यामागें महीपालाने प्रधान व्हावें. म्हणूनच जितक्या प्रकारे शिकवता येईल तितका प्रयत्न प्रधान करीत होता.

तरुण महीपाल ज्यावेळीं बाहेर पडे त्यावेळीं त्याला पाहून लोकांचे नेत्र दिपून जात. त्याचें भव्य, सुंदर, सुदृढ शरीर पाहून रस्त्यात अपरिचित व्यक्तींचेंही त्याच्याकडे लक्ष जाई. डोळ्यात विद्येची झलक चमकत होती. तेजस्विता व शीलसंपन्नता या दोन गोष्टी त्याच्या चेहऱ्यावरून ओसंडत होत्या. त्याच्या बुद्धिमत्तेपुढें आपली बुद्धिमत्ता फिकी आहे असें प्रधानाला वाटे.

एकदा महीपाल आपल्या मित्रांबरोबर वनविहाराला गेला होता. त्याचवेळीं ताराधर्म राजाची कन्या कलावतीही आपल्या मैत्रिणींबरोबर फिरायला निघाली होती. सर्वजण एकत्रच जेवायला बसली. महीपालाजवळ स्वाभिमानाचें तेज होतें, तारुण्याचें तेज होतेंच होतें, प्रतिभा पण विलसत होती. त्याचा तेज:पुंज चेहरा पाहून कलावतीच्या मनात महीपालविषयी आकर्षण निर्माण झालें.

जेवता जेवता चर्चा सुरू झाली. कलावतीने विचारलें : 'राजसत्ता कशाला हवी? स्वयंशासित समाज राहूं शकेल की नाहीं?' 'राजसत्तेवर नियंत्रण असायला हवें. तिने आपल्या मर्यादेचें उल्लंघन करूं नये यासाठीं

नियंत्रणाची आवश्यकता आहे.' महीपालाने उत्तर दिलें. 'शस्त्रास्त्रांची गरज काय? लोकांना सुधारण्यासाठीं अस्त्रांची जरूर आहे कां?' अशा प्रकारच्या अनेक प्रश्नांची चर्चा झाली व त्या सर्व प्रश्नांची महीपालाने सुंदर उत्तरें दिली. राजकन्याही त्याचें शालीन वर्तन पाहून आनंदित झाली. तिने आपलें हृदय मनातल्या मनात त्याला अर्पण केलें. दैवी संपत्तीच्या रक्षणासाठीं मी विवाह करीन व तोही अशा प्रकारच्या व्यक्तीशीच. मग तिने अतिशय विवेकपूर्ण प्रश्न विचारला : 'तुम्ही गृहस्थाश्रम स्वीकाराल त्यावेळीं माझी मदत घ्याल कां?'

'मला आपली मदत घेणें शक्य झालें तर मी स्वत:ला भाग्यवान् समजेन. परंतु आपण राजकन्या आहात. तेव्हा माझ्याशी विवाह करण्याचें साहस करूं नका. मी ध्येयनिष्ठ माणूस आहे. लोकांचें जीवन यशस्वी कसें होईल यासाठीं माझें जीवन आहे; चैनीसाठीं नाहीं. अशा प्रकारच्या विशिष्ट निष्ठेमुळेंच मी आपणाला सुखी करूं शकणार नाहीं.'

'आपण तेजस्वी व बुद्धिमान् आहात पण आपण मला ओळखलें नाहीं. माझी बरोबर परीक्षा आपणाला करता आली नाहीं असें मला वाटतें. मीही ध्येयनिष्ठ जीवन जगायला जन्माला आले आहे. माझी सुद्धा हीच इच्छा आहे. मला आपल्या कार्यात थोडा जरी सहभाग घेता आला तरी मी स्वत:ला धन्य समजेन. मग आपल्या गृहस्थाश्रमात मला सहचारिणी करायला कोणतीही अडचण नाहीं ना?'

ताराधर्म कलावतीसाठीं योग्य वर शोधण्याच्या तयारीत होताच. कलावतीने महीपालाला पसंत केलें आहे असें जेव्हा कळलें तेव्हा त्याला अतिशय आनंद झाला. महीपालापेक्षा आणखी चांगला जावई कोणता मिळणार?

दुसऱ्या दिवशीं गांवातल्या तरुणांची अश्वविद्येची परीक्षा होती. महीपालही अश्वविद्येत प्रवीण होता. त्यानेही त्या स्पर्धेत भाग घ्यायचें ठरविलें. महीपाल अश्वारूढ झाला व बोलता बोलता दिसेनासा झाला. परंतु ऐश्वर्याच्या शिखरावर आरूढ झालेल्या त्याला परमेश्वराने फार काळ



तिथे ठेवलें नाहीं. कारण भगवंताची प्रत्येक कृति हेतुपुर:सरच असते. त्याच्या कृतीचें कारण आपल्याला कसें कळणार? महीपाल खूप दूर गेला. जंगलातून जाता जाता झाडावर बसलेल्या एका जहरी नागाने त्याला दंश केला. नंतर त्याला घरी आणण्यात आलें. विष उतरविण्यासाठीं महान् प्रयत्न सुरू झाले. त्याच्या आजूबाजूला बसलेली मंडळी चिंतातुर झालेली होती. राजवैद्य व हकीम यांचा रात्रंदिवस जागता पहारा होता. परंतु महीपालाचें विष उतरण्याचें लक्षण दिसेना.

चंद्रा महीपालाच्या अंथरुणाजवळ बसून सारखी रडूं लागली. 'दादा! तूच ना रे माझा आधार! मला बहिणीला सोडून तू निघून जाणार! जंगलातून जाताना तूच सांगत होतास, कीं चंद्रा घाबरूं नकोस. मी तुझ्याजवळ आहे.' बेशुद्ध महीपालाजवळ बसून चंद्रा स्वत:चें सांत्वन करीत होती.

सारा गांव चिंताग्रस्त झाला होता. नाना प्रकारचे उपाय केले जात होतें. अशावेळीं एक अपरिचित व्यक्ति प्रधानांचें घर विचारीत विचारीत घरात आली. चेहऱ्यावर प्रवासाचा संपूर्ण शीण दिसत होता. अंगावरचे कपडे फाटलेले व मलिन झालेले होते. दाढी वाढलेली होती. पण डोळ्यांत विशेष प्रकारचें तेज होतें. घरात गडबड काय आहे असें बोलत बोलत त्यांनी महीपाल होता त्या खोलीत प्रवेश केला. पलंगावर बेशुद्ध झालेला महीपाल पडला होता. त्याच्याकडे ती व्यक्ति अनिमेष नेत्रांनी पाहात होती. डोळे अश्रूंनी भरून गेले होते. त्याच्याजवळ एक मुळी होती. ती त्याने उगाळली व नाकाजवळ धरली. त्या मुळीचा प्रभाव कांहीं विलक्षण होता! हळूहळू विष उतरूं लागलें. महीपालाने जणूं आजच प्रथम डोळे उघडले. समोर पाहिलें तो एक वृद्ध पुरुष उभा आहे असें त्याला दिसलें. त्या पुरुषाच्या डोळ्यांत आनंदाश्रू चमकत होते. परंतु ती व्यक्ति कोण हें मात्र महीपालाला ओळखता आलें नाहीं. ही व्यक्ति कोण हें जाणण्याची सर्वांनाच उत्कंठा लागली होती. ती वृद्ध व्यक्ति हळूहळू महीपालाजवळ गेली. तिने मंद आवाजात एक भजनाची ओळ म्हटली. महीपालाने तें भजन ओळखलें. गाणारालाही ओळखलें. 'बाबा!' असें

म्हणत तो पलंगावर एकदम उठून बसला. 'आपण कुठून आलात' असें म्हणत त्याने त्यांचे पाय धरले. दोघांचेही नेत्र अश्रूंनी भरून आले. इतक्यात चंद्राही जवळ आली. त्या दोघांनाही चंद्रस्वामींनी पोटाशी धरलें. त्यांच्या त्या मीलनाचें वर्णन काय करावें?

प्रधान म्हणाला : 'माझ्या मुलाला आपण जीवदान दिलेंत खरोखर मी आपला अत्यंत ऋणी आहे.'

'माझ्या मुलालाच मी जीवदान दिलें आहे.' चंद्रस्वामींनी स्पष्टीकरण केलें, 'याला शोधण्यासाठीं वेडा होऊन मी गांवोगांव फिरत होतो. सर्वच लोक भोगप्रधान झाले आहेत. स्वार्थासाठीं भगवंताचें स्मरण करतात. उत्सवाच्या दिवशीं भजन करून सारी रात जागरणही करतात. परमेश्वराला चांगला चांगला नैवेद्यही दाखवितात परंतु त्या प्रभूविषयीं कोणाच्याही मनात प्रेम नाहीं. त्याच्या कार्यासाठीं कोणाचेंही आंतडें तुटत नाहीं. समाज भोगवादी झालेला असून पैसा हेंच सर्वस्व मानीत आहे. प्रत्येक गांव शुष्क व निस्तेज झालेला आहे. कोणाच्याही मनात कृतज्ञता राहिलेली नाहीं. नीति पार नाहीशी झालेली आहे. त्यामुळें सात्त्विकता, समाधान, सुख यांना लोक पारखे झाले आहेत. हें सर्व पाहून मला अतिशय दुःख होत होतें. अशा वेळीं माझा महीपाल असता तर मी अशा या गांवांचा नूर पालटूं शकलो असतो; अशा तऱ्हेच्या विचारांनी माझें मन भरलेलें असताना अचानक एका योगिनीची व माझी भेट झाली. तिने मला ही मुळी दिली व सांगितलें : ही मुळी घेऊन तारापुरच्या प्रधानाकडे जा. तिथे महीपाल भेटेल. म्हणून मी धावत धावत इथे आलो.' तेजःपुंज महीपालाला पाहून चंद्रस्वामींची तृप्तीच होईना. त्याला वारंवार पाहात रहावें असेंच त्यांना वाटे.

प्रधान म्हणाला : 'आपल्या दर्शनाने मला अतिशय आनंद झाला आहे. परंतु आजपासून मी महीपालाचा पिता नव्हे याचें मला दुःख होत आहे. महीपाल म्हणाला : 'बाबा असें बोलूं नका. तुम्हीही माझें वडीलच आहात.'



**जनिता चोपनेताच यश्च विद्यां प्रयच्छति।**
**अन्नदाता भयत्राता पंचैतेपितरः स्मृताः।।**

ताराधर्म राजाला हें सारें वृत्त कळलें. तो चंद्रस्वामींकडे आला. नमस्कार करून म्हणाला : 'माझ्या या कन्येचा सून म्हणून आपण स्वीकार करावा.'

राजाश्रयापासून दूर राहिलेल्या चंद्रस्वामींजवळ खुद्द राजा येऊन प्रार्थना करूं लागला. याचें कारण महीपाल सुसंस्कृत होता, वीर होता, तेजस्वी होता. जग सुधारण्याची त्याचे ठिकाणीं हिंमत होती.

महीपाल व कलावती यांचा विवाह झाला. पुढें तोच त्या देशाचा राजा झाला व त्याने स्वतःच्या बुद्धीने व कर्तृत्वाने सारा देश सुधारला. भारताचें नंदनवन केलें. लोकांना सुसंस्कृत बनवलें. भारत देशाचा हा महान् अलंकार एके दिवशीं परमेश्वर दर्शनासाठीं निघून गेला.



# त्यागराज

शेकडों वर्षांपूर्वीची ही घटना आहे. रामब्रह्म नावाचा एक संस्कारी ब्राह्मण होता. श्रीरामचंद्र हें त्याचें उपास्य दैवत होतें. वैभवसंपन्न अशा राजा रामाचा तो उपासक असूनही त्याचें राज्य दारिद्र्यातच चालत होतें. परंतु त्याची पत्नी शांता अतिशय सुशील व धार्मिक होती. जन्मजन्मांतरीच्या पुण्यानेच अशी पत्नी मिळत असते. नाहींतर बिचाऱ्या त्या पतीला दररोज शिव्याच खाव्या लागल्या असत्या.

रामब्रह्म अतिशय गरीब होता. कधी कधी तीन-तीन, चार-चार दिवस अन्नाचा एक कणही प्राप्त होत नसे. परंतु हे सर्व ती शांता हसत मुखाने निभावून नेत असे. घरात धान्य असलें तर त्याची पत्नी पतीला अगोदर वाढी व स्वत: उपाशी राही. गुळाचा खडा खाऊन, पाणी पिऊन राही. असा तऱ्हेचे उपास करणें शांतेच्या अगदी अंगवळणी पडलें होतें.

एक दिवस जेवता जेवता रामब्रह्म शांतेला म्हणाला : 'तू मला वाढतेस पण स्वत: मात्र जेवत नाहीस.'

'छे! छे! मी जेवत नाहीं असें कोण म्हणतें?' शांता उत्तरली.

'आज आपण एकत्र जेवायला बसूं.' रामब्रह्माने आग्रह धरला.

दोघांनाही पोटभर पुरेल एवढें शिजवलेलें नव्हतें. धान्य घरात असेल तरच ना ती माउली शिजवणार! दोघेही बरोबर बसली तर पतीला पोटभर वाढता येणार नाहीं ही भीति शांतेला वाटूं लागली. तसेंच पतीला काय उत्तर द्यावें हेही तिला सुचेनासें झालें. 'माझें जेवण तर केव्हाच झालें.' असें शब्द सहज तिच्या तोंडातून निघून गेलें.

ती स्वत: उपाशी राहून पतीला प्रेमाने वाढी. पति आनंदाने जेवतो आहे हें पाहून जिचें पोट भरतें अशा प्रकारची स्त्री फक्त भारत देशातच



पहायला मिळेल. स्वत:चें संपूर्ण अस्तित्व तिने पतीमध्ये विलीन करून टाकलेलें असतें. तिला स्वत:चें असें स्वतंत्र अस्तित्वच नसतें आणि अशाच तऱ्हेने एक जीव दुसऱ्या जीवात ज्यावेळीं विलीन होतो त्याच वेळीं भारतीय संस्कृति पुन्हा उभी राहाते. यासाठीं त्याग व प्रेमाची आवश्यकता आहे. ज्यावेळीं या संस्कृतीचें पुनरुत्थान होईल त्यावेळीं त्यामध्ये स्त्रीचा फार मोठा वाटा असेल.

रामब्रह्माच्या लक्षात आलें : घरात दोघांना पुरण्याएवढें अन्न नाहीं. त्यामुळेंच शांता मला एकट्याला जेवायला वाढीत आहे.

'शांता! तू खोटें बोलतेस. मला टाकून तू जेवणेंच शक्य नाहीं. मी जेवणार व तू उपाशी राहणार हें मला सहन होत नाहीं. म्हणून आजपासून एक दिवस मी जेवणार व एक दिवस तू जेव; असें आपण ठरवूंया. शांता, तुला आठवतें कां? लग्नाच्या वेळेस अग्निदेवाला साक्षी ठेवून आपण प्रतिज्ञा केलेली आहे. धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि नातिचरामि। आज तुला उपाशी ठेवून मी जर जेवलो तर मला पाप लागेल.'

गरिबीतही एक प्रकारची भव्यता असते. गरिबी असते तिथे सर्वसामान्यपणे प्रेम असतें. श्रीमंती आली, कीं प्रेम कमी कमी होऊं लागतें. मग तें पति-पत्नीचें प्रेम असो अथवा भाऊ-बहिणीचें प्रेम असो.

रामब्रह्म व शांता यांचे गरिबीत प्रेमाने दिवस जात होते. त्यांच्या संसार वेलीवर दोन फुलें फुलली, एकाचें नाव जयेश व दुसऱ्याचें नाव रामनाथ.

त्यांच्या जीवनातला पुष्कळसा भाग त्या मुलांचें संगोपन करण्यात व त्यांच्याबरोबर बाललीला करण्यात जाऊं लागला. हळूहळू मुलें मोठी होऊं लागली. पुढें आईबापांच्या असें लक्षात येऊं लागलें कीं ही मुलें बुद्धिमान् आहेत पण यांच्या ठिकाणीं भक्तीचा अभाव आहे.

मुलांचें हें वर्तन पाहून रामब्रह्म व शांता यांना दु:ख झालें. त्या दोघांमध्ये भाव होता, भक्ति होती. असें असताना आपणाला भगवंताने अशा प्रकारची मुलें कां द्यावीत? ही प्रभुकार्यात उपयोगी पडणारी नाहीत.

मोठी होतील, लग्न करतील, वृद्ध होतील व एक दिवस हा लोक सोडून जातील. याला काय जीवन म्हणतात? जन्माला येऊन प्रभुकार्य करता आलें नाहीं, भगवद्भक्तिमय जीवन जगता आलें नाहीं तर या सृष्टीत जन्माला येणें निरर्थक होय. मग मानव व पशु यांत फरक तो काय?

त्यागराज हें त्यांचें आराध्य दैवत होतें. शांता त्यागराजाजवळ जाई व सांगे : भगवंता! तू मला पुष्कळ भाव दिलास पण माझ्याजवळ बुद्धि नाहीं. पैसाही नाहीं, कीं ज्यामुळें मी तुझें कार्य करून जीवन कृतार्थ करूं शकेन. तुझ्या कार्यात कोणता तऱ्हेने उपयोगी होऊं? म्हणून तू मला असा पुत्र दे, कीं जो तुझें काम करील. मी त्याला रक्ताचें पाणी करून वाढवीन. प्रभो! मी ब्राह्मण आहे. मला देण्याचा मोह आहे. मी दुसरें काय बरें देऊं? पण माझ्या रक्ताने वाढविलेला हा मुलगा मी तुझ्या चरणांवर ठेवीन. हा तुझ्या कार्यात उपयोगी व्हावा एवढीच माझी अभिलाषा आहे.

दोघांचीही अशा प्रकारची प्रार्थना चाले. भगवंताने ही प्रार्थना ऐकली. त्यांना पुत्र झाला. त्याचें नांव त्यागराज ठरलें. तो जन्माला आला त्या दिवसापासूनच त्यांच्या कुटुंबाची ऊर्जितावस्था सुरू झाली. कमतरता संपून हळूहळू विपुलता येऊं लागली.

आजपर्यंत मातृवात्सल्याने शांतेने दोन्ही मुलांचें लालनपालन केलें होतें. परंतु त्यागराज तर तिचा प्रसादपुत्र होता. त्याच्या संगोपनात आपण भगवंताची सेवा करीत आहोत असें ती समजे. त्यामुळें बालसंगोपन ही तिची भगवद्भक्ति बनली होती.

त्यागराज मोठा झाला. आठव्या वर्षी त्याचें उपनयन झालें. आता त्याला अध्ययनासाठीं दूर पाठवावें लागणार म्हणून शांता व रामब्रह्म यांना अतिशय दुःख झालें. परंतु तसें केल्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता.

मुलाला अभ्यासासाठीं फार दूर जावें लागणार. स्वतः गरीब. वाहनाची व्यवस्था नाहीं. घोडागाडी तरी कोणाजवळ मागणार? या विचाराने दोघांचीही मनें व्यथित झाली.



रामब्रह्माने त्यागराजाला जवळ बोलावलें. प्रेमाने पाठीवरून हात फिरवीत म्हटलें : 'बाळा! तू खूप खूप अध्ययन कर. मी शिकलो नाहीं ही उणीव तू दूर कर. तू संगीत शीक. त्यामुळें तुझी विद्या लोकांमध्ये जाणें सुलभ होईल. **वेदानां सामवेदोऽस्मि** असें भगवंतानेही गीतेत म्हटलेलें आहे. म्हणून तू संगीताचें अध्ययन कर.'

उद्या त्यागराज तपोवनात जाणार या कल्पनेने आई-बापांना झोप आली नाहीं. या वयात तपोवनात गेला तर थेट पंचविसाव्या वर्षापर्यंत परत येणार नाहीं. आई-बापांना किती दुःख झालें असेल! परंतु मुलावर चांगले संस्कार व्हावेत अशी इच्छा असेल तर हें दुःख सहन केलेंच पाहिजे.

चिमुकल्या कोमल हातांनी माझा त्यागराज कपडे धूत आहे, स्वयंपाक करीत आहे, भांडीही घाशीत आहे, अशा प्रकारचें तपोवनातील मुलाचें चित्र शांतेच्या डोळ्यांसमोर तरळूं लागलें. त्यागराज अंथरुणात झोपलेला होता. त्याच्या शेजारीं बसून शांता त्याच्या केसांवरून नाजूक हात फिरवीत होती. तिचें मातृ-हृदय भरून आलें. स्वतः गरीब असल्यामुळें तपोवनात जायला तिच्याजवळ कांहीं साधनही नव्हतें. कुणास माहीत पंधरा वर्षांनी त्यागराज परत येईल त्यावेळीं मी जीवंत असेन की नाहीं! या विचाराने तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्यातील दोन अश्रू त्यागराजाच्या गालावर पडले. त्यागराज जागा झाला. आईच्या मुखाकडे पाहून म्हणाला, 'आई तू रडतेस? मी जाणार म्हणून तू रडतेस! मग मला शिकायचेंच नाहीं. तुला रडत ठेवून मला शिकायची गरज नाहीं. मला शिकायचें नाहीं!'

पुत्राचें आपल्यावरील प्रेम पाहून शांतेचें हृदय भरून आलें. प्रेमाने त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत म्हणाली : 'बाळा! तू तपोवनात जात आहेस म्हणून मला आनंद होत आहे. त्या आनंदाचे हे अश्रू आहेत. परंतु तू प्रभूचा लाडका व्हावास, सर्वांच्या जिभेवर तुझें नांव खेळावें ही माझी इच्छा आहे. त्या दिवसाची मी वाट पहात होते. ज्या दिवशीं तें मी ऐकेन, त्या दिवशीं मला खरा आनंद होईल. माझे डोळे त्या दिवसाकडे लागलेले आहेत.'

'पण आई! मला तुझ्याजवळ ठेवूनच शिकव ना!' लहानग्या त्यागराजाला आईच्या दु:खाची कल्पना आली होती.

'बाळा! आई-बापांजवळ मुलें शिकत नसतात. त्यांच्या लाडाने मुलें बिघडतात. त्यांचा जीवन-विकास थांबतो. म्हणून गुरूच्या घरीं जायला हवें.' आईने स्वत:च्या ममत्वाची पकड जरा शिथिल केली.

'त्यागराज! बाळा! आपल्याजवळ वाहन नाहीं, हें तुला माहीत आहेच. मी तुला भेटूंही शकणार नाहीं. तपोवनात तुझी चौकशी करायलाही मला येता येणार नाही. परंतु त्याचें दु:ख न करता तू मोठा हो. चांगला हो. शहाणा हो. तुझ्या वडिलांची वृत्ति चांगली आहे. भावही चांगला आहे. परिस्थितीमुळें त्यांना शिक्षण घेता आलें नाहीं. ही गोष्ट प्रभुकार्यात बाधक आहे. तू खूप शीक. गुरुजींचें प्रेम संपादन कर. बाळा! तुझे गुरुजी हेच तुझी आई होत. त्यांना प्रेम देऊन त्यांची सारी कामें करीत जा. माझ्याजवळ जसे हट्ट करतोस तसे त्यांच्याजवळ करूं नकोस.' हें बोलता बोलता शांतेचें हृदय भरून आलें. भावना अनावर झाल्या. त्या अश्रुरूपाने वाहूं लागल्या. तिने आवेगात येऊन त्यागराजाला हृदयाशी कवटाळलें. जणूं त्यागराज आता शेवटचाच भेटतोय. तिला पुन्हा हें रूप पाहायला मिळणार नाहीं.

दुसऱ्या दिवशीं रामप्रहरीं रामब्रह्माने त्यागराजाचा हात धरून त्याला मंदिरात नेलें. त्यागराजाने भगवंताला प्रणाम केला. शेजारी आई उभी होती. हातात तुपाचा दिवा व कुंकवाचा करंडा होता. स्वत:च्या हृदयाच्या तुकड्याकडे ती अनिमेष नेत्रांनी पाहात होती. त्यागराजाने आईला प्रणाम केला. मातृवियोगाच्या कल्पनेने त्याचे डोळे भरून आले. यापुढें आईचे हे लाड, आईचें हें प्रेम मिळणार नाहीं याची त्याला खंत वाटूं लागली. शांतेने त्याला वर उठवलें. कडकडून भेटली. डोळ्यातले अश्रू पदराने पुसले. या शुभप्रसंगीं अश्रूंनी भरलेल्या डोळ्यांनी तिने त्यागराजाला निरोप दिला.

'आई! मी चांगला होईन, शहाणा होईन, दररोज संध्याकाळीं तुझी आठवण करीन. पण आई! तूही माझी आठवण कर हं!' सद्‌गदित अंत:करणाने त्याने आईचा निरोप घेतला. रामब्रह्माने डोळ्यांतली आसवें



उपरण्याच्या सोग्याने पुसली. शेवटीं त्यागराज व रामब्रह्म यांनी शांतेचा निरोप घेतला.

आठ दहा वर्षांच्या वयात बालकाला तपोवनात पाठविण्याची या देशाची परंपरा होती. चौदा-पंधरा वर्षें गुरुगृहीं राहून बालक अभ्यास करी. तपोवनात शिष्याच्या योग्यतेनुसार गुरु विद्या शिकवित असे.

रामब्रह्माची आंतरिक इच्छा होती : त्यागराजाने संगीत शिकावें. पण ही गोष्ट कुलपतींना कशी सांगायची? रामब्रह्माला विश्वास होता : त्यागराजाच्या योग्यतेप्रमाणे गुरुजी त्याला विद्या देतील. तत्कालीन शिक्षण-प्रणालीवर त्याचा पूर्ण विश्वास होता. आजच्या शिक्षणाचा प्रवाह याच्याहून पूर्णत: उलटा आहे. आज समाजाची वित्तशक्ति चुकीच्या मार्गाने उधळली जात आहे. मुलामध्ये बुद्धि नसली तरीही प्रत्येक बाप स्वत:च्या मुलाला विज्ञान शाखेत पाठवीत आहे. अर्थप्रधान समाजात असेंच घडतें. त्यामुळें बापाचा पैसा बिघडतो, मुलाचें वर्ष बिघडतें व महाविद्यालयात जागा अडली गेल्यामुळें लायक विद्यार्थ्यांची संधि काढून घेतली जाते. याच्यामागें ज्या क्षेत्रात अधिक पैसा मिळतो त्याच क्षेत्रात मुलाला पाठवायचें ही मूलभूत कल्पना आहे. त्यामुळें आज शिक्षणाचा चोळामोळा झालेला आहे. जाऊं द्या. रामब्रह्म व त्यागराज तपोवनात आले. त्यांनी कुलपतींना नमस्कार केला. रामब्रह्माने कुलपतींना सांगितलें : 'गुरुदेव! आजपासून हा बालक तुमचाच आहे.'

त्यागराजाला गुरुगृहीं पोचवून परत फिरताना रामब्रह्माने म्हटलें : 'बाळ! गुरूची सेवा करीत जा व खूप विद्या शीक.' रामब्रह्माने जड अंत:करणाने आश्रमातून निरोप घेतला. मुलीला सासरीं पाठवताना जें दु:ख होतें तसेंच दु:ख मुलाला तपोवनात सोडताना त्याला झालें. रामब्रह्म त्यागराजाला तपोवनात सोडून परत फिरला.

त्यागराज हुशार होता. स्वत:च्या प्रतिभेने त्याने सर्व सहाध्यायींची मनें जिंकली. सर्वांशी तो एकरूप झाला. दररोज संध्याकाळीं तो डोंगरावर फिरायला जाई. स्वत:च्या आईची आकृति डोळ्यांसमोर आणून आईने

शिकविलेली स्तोत्रें मधुर कंठाने गाई. डोळ्यांसमोर आई होती. कंठात मधुरिमा होती व भावपूर्ण अंत:करण होतें. त्या संगमातून निघालेले त्याचे आलाप व सूर नव्हते तर एका बालकाचें तें हृदयगान होतें.

एके दिवशीं संध्याकाळीं फिरता फिरता कुलपतींनी त्यागराजाचें हें भावपूर्ण गान ऐकलें. त्यांनी चौकशी केली. त्यागराजाला जवळ बोलावलें. त्याच्या मस्तकावरून हात फिरवून त्याला मूक आशीर्वाद दिले. दुसऱ्या दिवसापासून त्याला संगीताचें शिक्षण मिळूं लागलें.

फी देऊन विद्या घेता येत नाहीं. विद्या प्राप्त करायची असते. हां हां म्हणता त्यागराजाने अनेक विद्या संपादन करायला सुरुवात केली. विद्येबरोबर त्याच्या जीवनात भक्तीही होती. विद्या ही सरस्वती आहे. ही भावना त्याच्या अंत:करणात दृढ झाली होती. तिला विकायची कशी? विद्या ही आई आहे. तिच्या मांडीवर बसून तिच्या मुखाकडे पाहात पाहात जीवनविकास करायचा असतो. विद्या व भावपूर्ण हृदय घेऊन त्यागराज तपोवनातून बाहेर पडला.

आईचा निरोप घेताना जी स्थिति होते तीच स्थिति तपोवनातून गुरूचा निरोप घेताना होते. आज आपलें भावजीवन खलास झालें आहे. आपण सर्व माणसें व्यवहारी झालो आहोत. त्यामुळें अशा प्रकारच्या भावपूर्ण जीवनाची आपल्याला कल्पनाही येणार नाहीं. गुरु-शिष्याचे संबंध पितापुत्रासारखे प्रेमळ असत. भल्या सकाळीं गुरुजी शिष्याच्या मस्तकावरून प्रेमाने हात फिरवीत त्याला उठवीत असत. त्याला विचारीत : 'तुला मोठें व्हायचें आहे ना? मग अजून झोपून कां राहिला आहेस?' अशा प्रकारचें प्रेम आजच्या विद्यार्थ्याला कधी तरी मिळतेंय कां? आज आपल्याला वाटतें : मुलाला शिकायचें असेल तर शिकेल व उठायचें असेल तेव्हा उठेल.

स्वत:च्या तपोवनात आलेल्या विद्यार्थ्याला गुरुजी विद्यार्थी न मानता भगवान् मानीत व त्याच्यावर प्रेम करीत. अशा प्रकारच्या गुरूच्या सान्निध्यात बारा-बारा वर्षे राहिल्यानंतर वियोगाची कल्पना कधी सहन



होईल कां? गुरूचा वियोग ही केवढी दु:सह कल्पना असेल! अशावेळीं भावनेने अंत:करण भरून येणें ही गोष्ट अगदी स्वाभाविक आहे.

त्यागराजाने जड अंत:करणाने गुरूचा निरोप घेतला. त्या दिवशीं रात्री गुरुजींना झोप आली नाहीं. गुरुजींनी कसा तरी मोठ्या कष्टाने त्यागराजाला निरोप दिला.

तरुण त्यागराजाला पाहून शांता व रामब्रह्म यांना अवर्णनीय आनंद झाला. त्याच्या जीवनात विद्या व भक्ति यांचा सुमधुर संगम झालेला होता. रामब्रह्म व शांता यांना आपलें जीवन कृतकृत्य झालें, असें वाटलें. नंतर थोड्याच दिवसात पार्वती नावाच्या सुशील कन्येशी त्याचा विवाह झाला. समाधानी झालेल्या रामब्रह्माने व शांतेने थोड्याच दिवसात इहलोकाचा कायमचा त्याग केला.

परंतु त्यागराजाच्या नशिबीं सांसारिक सुख नव्हतें. थोड्याच वर्षांत पार्वतीही त्यागराजाला सोडून गेली. त्यागराजाला आता कसलेंच बंधन राहिलें नव्हतें. दोन्हीही भाऊ भोगवादी होते. म्हणून त्यांच्याविषयीही त्यागराजाला विशेष आकर्षण नव्हतें. त्यागराजाच्या जीवनात फक्त एकच आकर्षण होतें. भगवद्प्रेमाचें.

पुन्हा त्यागराज गुरूजवळ आला व गुरुजींना प्रणाम करून म्हणाला : 'गुरुजी! तुमचे आशीर्वाद घेऊन मी संसार केला परंतु आता मला संसाराचें कसलेंही बंधन राहिलें नाहीं. आता मला कायमचा आपल्या सेवेसाठीं ठेवून घ्या.'

गुरुजींनी त्याला पुन्हा लग्न करायला सांगितलें. त्याला शास्त्रवचनें दाखविली. सामाजिक दृष्टीनेही अपरिणीत माणसाने समाजात राहाणें बरें नव्हे असें त्याला सांगितलें व त्यातही ज्याला प्रभुकार्य करायचें आहे त्याचें जीवन संशयातीत असायला पाहिजे. जितकें संशयातीत जीवन असेल तितकें काम मोठ्या प्रमाणात होईल. आध्यात्मिक दृष्टीनेही विवाह ही गोष्ट विकारांना किल्ल्यासारखी असते.

गुरुजींच्या आज्ञेप्रमाणे त्यागराजाने कमलांगनेशी दुसरें लग्न केलें परंतु त्याचें संसारात पूर्वीसारखें मन नव्हतें. त्यागराजाजवळ विद्या व भक्ति ही सारी असूनही तो कधीही दरबारात जात नसे. व्यवहारी भावांना हें आवडलें नाहीं. त्यांनी त्याला वेगळा राहायला सांगितलें. त्यागराज आता वेगळा राहूं लागला.

तुला इस्टेटीचा कोणता वाटा हवा असें विचारताच पूजा करीत असलेली रामाची मूर्ति त्याने मागितली.

जयेश म्हणाला : 'मूर्ति हवी असली तर खुशाल घेऊन जा. यात आम्हाला आनंद आहे. आम्हाला संसार करायचा आहे. तेव्हा इस्टेट मात्र आम्हाला हवी.'

भगवान् रामाची मूर्ति व तंबोरा घेऊन पति-पत्नींनी आई-वडिलांचें घर सोडलें. कमलांगना समजली व तीही स्वत:च्या पतीबरोबर साधकाचें जीवन जगूं लागली.

फिरता फिरता दोघेंही योगारूढयोगींच्या आश्रमात आली. त्यांचें पवित्र व भक्तिमय जीवन पाहून दोघांनी त्यांना प्रणाम केला. 'प्रभो! आता भगवंतांचा साक्षात्कार होईल असा मंत्र द्या.'

'तूं रामाचा उपासक आहेस. म्हणून राममंत्राचा एक कोटि जप कर. म्हणजे तुला ईश्वराचा साक्षात्कार होईल.' योगीराजांच्या वचनावर विश्वास ठेवून, त्यांना आदरपूर्वक प्रणाम करून जपयज्ञ करण्याचा त्यागराजाने संकल्प केला.

योगीराजांना त्याचा मनोभाव समजला. त्यांनी त्याला परत बोलावलें व विचारलें : 'मी काय सांगितलें तें कळलें ना?'

'मी रामाचा जप करीन.'

'त्यागराज तू विद्वान् आहेस, बुद्धिमान् आहेस. तुझी प्रज्ञा तेजस्वी आहे. तुला मी जप करायला सांगितला याचा अर्थ एक कोटि जप करण्यापुरता तू मर्यादित घेतलेला दिसतोस. एक कोटि रामनाम याचा



अर्थ एक कोटि लोकांना प्रभुसन्मुख कर. आज माणूस भगवंताला विसरला आहे. भूक लागतें तेव्हा खातो व झोप येते तेव्हा झोपतो. अशा लोकांना ईश्वराभिमुख कर.' त्यागराजाला हें सारें समजलें. योगारूढयोगींच्या सांगण्याप्रमाणे त्याने एक कोटि रामनामाची दीक्षा घेतली.

त्यागराजाच्या जीवनात त्याग होता, भक्ति होती विद्या होती व संगीतही होतें. नव्हतें फक्त कर्म. या कर्माचीही आता सुरुवात झाली.

पति-पत्नी दोघेंही गात गात गांवोगांव फिरूं लागली. प्रभुभक्ति करीत जात होते व लोकांना ईश्वराचें नांव घ्यायला प्रवृत्त करीत होते. भगवंताचें नांव घेत उठा, भगवंताचें नांव घेऊन जेवायला सुरुवात करा. प्रभुस्मरण करून झोपी जा. जीवनातली प्रत्येक कृति भगवंताचें स्मरण करून करा. अशा प्रकारें आईपासून अलग झालेल्या लोकांना त्यागराज भगवंताजवळ नेऊं लागला. एकेचाळीस - बेचाळीसाव्या वर्षी त्यागराजाला वाचासिद्धि प्राप्त झाली. त्याच्या बोलण्याप्रमाणे घडूं लागलें. त्याच्या सांगण्याप्रमाणे व्यक्ति वैभव शिखरावर किंवा दु:खसागरात जाऊं लागली. त्यागराजाला ही सिद्धि मिळवायला चाळीस वर्षे तप करावें लागलें होतें. परंतु त्या सिद्धीचा त्याग करताना दोन क्षणही लागले नाहीत. सद्गदित होऊन त्याने भगवंताला सांगितलें 'प्रभो! तुझी करुणा अपार आहे. मला अशा प्रकारची सिद्धि नको. मला तुझ्या चरणकमलांजवळ स्थान दे ही एकच माझी प्रार्थना आहे.'

एक कोटि लोकांची जीवनें ज्यानी बदलली अशा प्रकारच्या महान् भक्ताने वाचासिद्धि मिळताच भगवंताला ती अर्पण केली. रामचंद्राना वाटलें या माझ्या लाडक्या भक्ताला मी केव्हा भेटेन? त्याला मी केव्हा दृढालिंगन देईन?

त्यागराज भगवान् रामचंद्राच्या मूर्तीत चित्त एकाग्र करून बसला होता. संपूर्ण वृत्ती तदाकार झाल्या होत्या. समाधि लागली होती. प्रभु रामचंद्राचें दर्शन व्हावें अशी तीव्र इच्छा होती. मूर्ति समोर होती पण डोळें उघळून पाहातो तो कोणीही दिसेना.

आर्त वाणीने त्याने भगवंताला हाक मारली : 'प्रभो! तू करुणासागर आहेस. माझ्यावर आजपर्यंत तू करुणेचा वर्षाव करीत आलेला आहेस. पण मीच अभागी! मी तुझ्या करुणेला साथ देऊं शकलो नाहीं. माझी झोपडी प्रभो! तुझ्या चरणरजाने अद्यापीही पुनीत झाली नाहीं. या जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करणारा करुणासागर प्रभु आपण होऊन माझ्या घरीं आला होता. पण मीच त्याला साथ दिली नाहीं. त्यागराजाचें मन विव्हळ झालें.

जणूं त्यागराजाची ही विव्हळता दूर करण्यासाठीं एक अतिशय वृद्ध आगंतुक त्याच्या घरीं आला.

'मी उपाशी आहे. मला थोडें खायला मिळेल कां?' त्या वृद्धाने विचारलें.

'मी आपणाला काय देऊं?' त्यागराजाने नम्रपणे प्रश्न केला.

'मी भावाचा भुकेलेला आहे. तुझा कंठ गोड आहे. कांहीं तरी ऐकून मी कृतार्थ होऊं इच्छितो.'

'नर्तिकेचा कंठही मधुर असतो.' त्यागराज म्हणाला. परंतु वृद्धाच्या आग्रहाला मान देऊन त्यागराजाने भजन म्हणायला सुरुवात केली.

'प्रभो माझ्यासारख्या अभागी जीवाकडे किती प्रेमाने व विश्वासाने तुम्ही आला असाल! पण प्रभो! माझ्या घरीं आल्यानंतर मी तुमची विचारपूस केली नाहीं किंवा बसायला आसनही दिलें नाहीं.' अशा भावाचें भजन तो गाऊं लागला.

जसजसा तो वृद्ध भजन ऐकत होता तसतसें त्यागराजाच्या भजनात प्रेम व भाव वाढत जात होते. भजन संपलें. सद्गदित होऊन त्यागराजाने भगवंताला प्रणाम केला. डोळे उघडून पाहिलें. पण तो वृद्ध केव्हाच अंतर्धान झालेला होता. दुपार झाली, संध्याकाळ झाली तरी त्या वृद्धाचा पत्ता नव्हता. भोजनासाठीं त्याची वाट पाहात पाहात त्यागराज झोपी गेला.



त्याला एक स्वप्न पडलें स्वप्नात नारद आले व म्हणाले : 'वेड्या! ज्याची वीणा ऐकायला लोक आतुर असतात असा मी नारद तुझें संगीत ऐकायला वृद्धाच्या वेषात आलो होतो. तुझें संगीत ऐकून मी कृतार्थ झालो आहे. परंतु त्यागराज! तुझी वाणी तेजस्वी असायला पाहिजे. तुझ्या संगीतात केवळ कारुण्य नाहीं तर माधुर्यही आहे. मला तुला कांहीं तरी दिलें पाहिजे. परंतु भावपूर्ण गाणाराला मी काय देऊं? तुझ्यासारख्या महान् भक्ताला मी काय देऊं?'

नारदजी चिंताक्रांत झाले. शेवटीं त्याला म्हणाले : 'तुला एक स्वरार्णव नावाची पुस्तिका मिळेल. त्यामध्ये स्वराला भाषा देण्यात आलेली असेल.'

त्या पुस्तिकेच्या योगाने त्यागराजाने स्वरशास्त्रात महान क्रांति केली. नवा स्वर, नवा ताल, नवा रंग देऊन, स्वरशास्त्राला एक नवीन दिशा व नवें वळण दिलें.

✓त्यावेळीं शरात्मज नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्याजवळ अमाप संपत्ति होती. ही संपत्ति कशीं व कुठे खर्च करावी या चिंतेत तो पडलेला होता. त्यागराजाची कीर्ति त्याच्या कानीं आली. त्याने त्यागराजाला नम्रतापूर्वक दरबारात येण्याचें निमंत्रण दिलें. त्यागराज म्हणाला : 'राजा मला तुझ्या मानसन्मानाची आवश्यकता नाहीं. मला तुझ्या दरबारात येण्याची आवश्यकता नाहीं. मला प्रभु रामचंद्राचा दरबार हवा, दुसऱ्या कोणाच्या दरबाराची मला गरज नाहीं.'

राजा समजला : हा सामान्य पंडित किंवा भक्त नसून महान् संत आहे. त्याला लौकिक वैभव काय करायचें? परंतु जयेश व रामनाथ यांना हें आवडलें नाहीं. राजाने एवढें आमंत्रण दिलें मग जायला कोणती हरकत होती?

त्यागराज कमलांगनेला म्हणाला : 'आपण खूप प्रवास केला आहे. आपण आता तीर्थयात्रा करायला जाऊंया.' ती पूर्वेकडील व्यंकटेशाच्या मंदिरात आली.

त्यांनी कोट्यवधी लोकांची जीवनें बदलली. रडणारें चेहरे हसरे केले. ज्याचें संगीत ऐकून नारद कृतार्थ झाले, ज्याची भक्ति, विद्वत्ता व तेजस्विता पाहून प्रभु रामचंद्र ज्याला भेटायला आले अशा तऱ्हेचा महान् भक्त व्यंकटेशाच्या मंदिरात आला होता. त्यावेळीं मंदिराच्या पुजाऱ्याने मूर्तीवर पडदा टाकला होता. परंतु त्या पुजाऱ्याला हें कसें कळावें? त्याची महानता व दिव्यता समजण्याची कुवत त्याच्याजवळ कुठे होती?

आर्त वाणीने त्यागराजाने भगवंताला हाक मारली : प्रभो! तुझ्या व माझ्यामध्ये पडदा नाहीं. मग इथे पडदा कां?'

पडदा बाजूला झाला. व्यंकटेशाने त्याला दर्शन दिलें.

प्रभूच्या असीम कृपेने मिळालेलें जीवन त्याने प्रभुचरणीं अर्पित केलें.

ज्यांच्या जीवनातून राम गेलेला होता अशा हजारो लोकांच्या जीवनात परत राम उभा केला. मिळालेली वाचासिद्धि प्रभूला अर्पण केली. त्यागराजाची पत्नी कमलांगनाही शेवटच्या श्वासापर्यंत भक्त त्यागराजाची सेवा करीत राहिली व एक दिवस हा नश्वर देह सोडून निघून गेली.

पौष वद्य पंचमीला हा श्रेष्ठ भक्त, शक्तिशाली भक्त, भावप्रधान भक्त आपली जीवनलीला संपवून प्रभु रामचंद्रचरणीं लीन झाला.

प्रभू रामचंद्रांच्या नावाने किती तरी दगड तरले. आपण त्या महान् भक्ताचें अनुकरण करून आपल्या जीवनपत्थराला भगवंताच्या नांवाने तारण्याचा प्रयत्न करूंया.



# मातृदेवो भव

**मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव।**

आईला देव मानणाऱ्या, पित्याला देव मानणाऱ्या व आचार्यांना देव मानणाऱ्या आपल्या या भव्य भारतीय संस्कृतीचे जेवढे गुणगान गाऊं तेवढे थोडेच आहे. परंतु आजच्या या भौतिकवादाच्या प्रवाहात बुडालेल्या व्यक्तिवादी व भोगवादी बनलेल्या मानवी जीवनात भोगवादी व स्वार्थी विचारांचें तांडवनृत्य जेथे चाललेलें आहे, अशा कराल काळात, या सुंदर व उदात्त विचारांना मानव-जीवनात कोठे स्थान आहे व केवढें स्थान आहे, ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

मातृदेवो भव व पितृदेवो भव हे विचार वेळप्रसंगी बालक-बालिका घोकीतही असतील. संस्कारी कुटुंबें बालकांवर यांचें संस्कार-सिंचनही करीत असतील. परंतु या विचारांना सामाजिक महत्त्व द्यायचें की नाहीं याच्यावरच विचारवंत व तथाकथित सुशिक्षित वर्ग चर्चा करीत बसलेला आहे. बुद्धिवादामध्ये रममाण झालेल्या या लोकांच्या कानांवर बालकासाठीं प्रत्येक क्षणाला आतुर असलेल्या आईच्या हृदयाची धडपड कोठून पोचणार? आईबापांचें प्रेम व जागृत वर्तन यांची कल्पनाही या लोकांना नाहीं असें वाटतें.

**आई म्हणोनी कोणी आईस हाक मारी**
**स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी....**
**चारा मुखीं पिलांच्या चिमणी हळूच देई**
**गोठ्यात वासरांना त्या चाटतात गाई......**
**सांगेल ना म्हणाया आम्हां शुभं करोति....**
**ये रागवावयाही परि येई येई वेगें.....**

आईबद्दलच्या या सुंदर, भव्य व प्रेमळ भावनेचा क्षुद्र भोगात रमणाऱ्या, भोगच ज्यांचें जीवन सर्वस्व अशा मानवांना-जरा स्पष्ट शब्दात सांगायचें झालें तर ज्यांच्यातील मानव नाश पावलेला आहे, असें म्हणावें लागेल अशा, या पशूंना त्या भावनेची कल्पना कोठून येणार?

आजपासून पन्नास-साठ वर्षांपूर्वी घडलेली ही घटना आहे. रत्नागिरी जिल्ह्यात राजापूर नावाचें गांव आहे. त्याच्या जवळील एका लहानशा खेड्यात एक ब्राह्मण राहात होता. जुन्या पद्धतीचें, जवळ जवळ झोपडीवजा त्याचें घर, दोन-चार नारळीची झाडें, पांच-सहा पोफळीची झाडें व एक-दोन आंब्याची झाडें हेंच त्याचें वैभव. एवढ्या संपत्तीवर दोन वेळचें खायला मिळणेंही कठीण होतें.

हा ब्राह्मण आजूबाजूच्या गांवात थोडीफार भिक्षुकी करीत असे. प्रसंगवशात् सत्यनारायणाची कथा सांगायला जात असे; स्वतःच्या लहानशा वाडीचें फारच प्रेमाने जतन करीत असे व या सर्व मिळकतीवर तो आपला योगक्षेम चालवीत असें. आणि त्यावर त्याचें तीन माणसांचें कुटुंब मोठ्या कष्टाने दोन घास अन्न प्राप्त करूं शकत असे.

त्याचा एकुलता एक मुलगा फारच हुशार होता, कुशाग्र बुद्धीचा होता. आई-वडील डोळ्यातील पुतळीसारखे त्याला जपत असत. आई त्याला राजा म्हणत होती. पण त्यांच्या घरात राजाचें वैभव नव्हतें, गरिबी हीच त्यांची दौलत होती. मुलगा चांगला होता. तो मोठा व्हावा, त्याने नाव काढावें हीच आई-बापांची महत्त्वाकांक्षा होती. सर्वसामान्यत: कोणत्या आई-बापांची ही इच्छा असत नाहीं? 'मी शिकलो नाहीं परंतु आपल्या राजाला खूप शिकवूं. खरें की नाहीं?' बाप उत्साहात येऊन स्वतःच्या पत्नीजवळ ही महेच्छा व्यक्त करीत असे.

आईही प्रेमात येऊन म्हणत असें : 'अहो, पहा तर खरें? माझा राजा मोठा कलेक्टर होईल. मग हें दुःखाचें दिवस मागें पडतील. राहायला बंगला, फिरायला मोटार, कामाला नोकर-चाकर.....'



सोनेरी स्वप्नांच्या जगात स्वतःला विसरणाऱ्या व मुलाला लाडात वाढवीत असलेल्या आईला, शहाणा बाप वास्तविक भूमिकेवर आणीत होता : 'आधी त्याला मॅट्रिक तर होऊं दे!'

बाळ राजाचें लाड करता करता ब्राह्मण पति-पत्नी दुःखाचे दिवस हसत खेळत व्यतीत करीत होती. स्वतःच्या लहानशा वाडीला पाणी देता देता बाप राजाला म्हणत असे : 'बाळ! हे वृक्ष तर आपलें जीवन आहेत. त्यांच्याजवळ प्रेमाने बसत जा. तुला ते जीवनाचें गांभीर्य समजावतील. त्यांना पाणी पाजल्याशिवाय तू जेवूं नकोस. कोणास माहीत उद्या माझें डोळे मिटलेंही जातील! तुला आजच सांगून ठेवतो.'

आंब्याकडे बोट दाखवून तो म्हणे : 'बाळ! तुला माहीत आहे : आजपासून तीसेक वर्षांपूर्वी मी जेव्हा तुझ्याएवढा होतो तेव्हा या झाडाची कोय माझ्या वडिलांनी लावली होती. त्या कोयीने दगड फोडून, तिच्या जीवनात येणाऱ्या प्रत्येक संकटाशी सामना करून वृक्षाचें रूप धारण केलेलें आहे. संकटाची पर्वा न करता त्यांच्याशी अविरत लढावें लागतें. म्हणूनच तू आज याच्या या सुंदर विस्ताराच्या छायेखाली आनंद लुटूं शकत आहेस, त्याच्या मधुर फळांनी शांति अनुभवीत आहेस. बाळ, तूही मोठा बनून छायारूप बन! थकलेल्याला विसावा दे, क्षुधार्थाला अन्न दे. परंतु एक गोष्ट नेहमी लक्षात ठेव. मोठा होण्यासाठीं, दुसऱ्याला छायारूप बनण्यासाठीं तुला काळाशी सतत झगडावें लागेल. प्रत्येक क्षणाला नि पावला-पावलाला संकटांशी सामना करावा लागेल. जीवन संग्रामात छाती पुढें करून घाव सहन करावें लागतील.' लहानगा राजा या अल्पशिक्षित पित्याच्या प्रेरणादायी वाणीचें, जीवनाचें मर्म समजावणाऱ्या प्रेमळ वाणीचें, एकचित्ताने श्रवण करीत होता.

पूजेसाठीं जेव्हा आई फुलें वेचायला जात असे तेव्हा कधी कधी राजाही तिच्यासोबत जात असे. खेड्यातील अशिक्षित आई स्वतःच्या लाडांत वाढविलेल्या मुलावर संस्कार-सिंचन करीत असे. स्वतःसारख्या लहान-लहान, कोवळ्या-कोवळ्या कळ्या पाहून राजा त्या तोडायला जात असे. आई त्याला अडवून म्हणत असे : 'बाळ! ही अर्ध-विकसित फुलें

आहेत. त्यांना तोडूं नकोस. अर्ध-विकसित कळ्या तोडल्या तर त्या बरोबर फुलत नाहीत. त्यांना सुगंध येत नाहीं. त्यात प्रफुल्लित सौंदर्य दिसत नाही. त्यांच्यात सौरभ भरल्याशिवाय त्यांना डहाळीपासून दूर करूं नये. राजा बाळ! नेहमी एक गोष्ट लक्षात ठेव. अशी अर्धविकसित कळी तोडल्यावर ती फुलत नाहीं तसें अर्धे-मुर्धे कामही बरोबर फुलत नाहीं; फळत नाहीं. मोठा झाल्यावर तू जें करशील तें संपूर्ण कर; सांगोपांग कर.'

उड्या मारीत राजा जेव्हा सुंदर फुललेली फुलें तोडायला धावत असे तेव्हा आई त्याला समजावीत असे : 'जसें हें झाड फुलांना वाढवतें, फुलवतें, रसमय बनवतें व गंधमय बनवून विश्वंभराच्या पूजेसाठीं तयार करतें तसें आई देखील लहान लहान बालकांना खेळवीत, पालनपोषण करीत, शिक्षण देत मोठी करीत, जगाच्या सेवेसाठीं अर्पण करीत असतें. राजा बाळ! तूही मोठा होऊन असा सुगंधधारी, रसमय, व सुंदर बनशील ना! जगाच्या सेवेला हें जीवन खर्च करशील ना?' अशा प्रकारें आईही राजावर प्रेम करीत, तिच्या लाडिक भाषेत संस्कारांचें, जीवनाचें स्तनपान करीत होती.

गरिबीशी लढता लढता राजाचें प्राथमिक शिक्षण पूर्ण झालें. त्या लहानशा गावात माध्यमिक शिक्षणाची व्यवस्था नव्हती. राजाला पुढें शिकवायचें होतें. पुढें शिकवायचें असेल तर त्याला रत्नागिरीच्या माध्यमिक शाळेत पाठविलें पाहिजे. तेथे पाठवायचें असेल तर पैशाचाही काहीं तरी बंदोबस्त झाला पाहिजे. काय करायचें? गरीब कुटुंबासमोर ही फार मोठी समस्या उभी राहिली.

एका रात्री राजा अंथरुणात झोपलेला होता. पति-पत्नी त्याच्या बाजूला चिंतामग्न बसली होती. पैशांची व्यवस्था कशी करायची ही त्यांच्यासमोरील समस्या होती. परंतु पुत्राकडे दृष्टि जाताच आईचें वात्सल्य उचंबळून आलें. एका क्षणात आईच्या नेत्रांतील चिंता दूर झाली. आपल्या त्या प्रेमळ दृष्टीने तिने राजाला प्रेमाची आंघोळ घातली. झोपलेल्या राजाच्या केसांतून प्रेमळ हात फिरविता फिरविता ब्राह्मण पत्नीने सांगितलें



: 'कांहीं झालें तरी आपण राजाला पुढें शिकविलेंच पाहिजे. फार तर आपण पोटाला पट्टी बांधूं, एक वेळ जेवूं, पै-पैसा वाचवून राजाला शिकवूं; पण त्याला हायस्कूलमध्ये पाठवूं. तुम्ही कांहींही करून रत्नागिरीच्या शाळेत राजाला दाखल करा.' पतीला तिने हें सांगितलें खरें पण पुत्र-वियोगाच्या कल्पनेने आईचें हृदय भरून आलें. तिचे नेत्र ओले झाले. ब्राह्मणालाही तीच इच्छा होती. त्याने मूक संमति दिली. उपाशी राहूं पण मुलाला पुढील शिक्षण देऊं, अशी मनाशी गांठ बांधून ती झोपी गेली.

ब्राह्मणाने बैलगाडीची व्यवस्था केली. थोडे-फार रुपये वाचविले होते ते गांठीला बांधून घेतले व राजाला सोबत घेऊन तो रत्नागिरीला जायला तयार झाला.

'राजा बाळ! सांभाळून रहा हं; आणि खूप खूप शीक!' अश्रूंच्या धारा लागलेल्या नेत्रांनी प्रेमाने वाढविलेल्या जीवाच्या राजाला ती दोघें स्वत:पासून दूर करीत होती. राजा देखील दोन पावलें पुढें गेला नि परत फिरून त्याने आईला मिठी मारली. मुक्यावर मुके घेऊन आईने त्याला आंघोळ घातली. पुन्हा पुन्हा समजावलें व भरल्या अंत:करणाने राजाने आईचा, त्या गांवाचा नि त्याच्या लहानग्या बालसाथीदारांचा निरोप घेतला. बाळ राजाला कुशीत खेचून घेऊन, त्याच्या पाठीवरून हात फिरवित फिरवित, बाप अंधकारमय भविष्यामधून वाट काढण्याचा विचार करीत, भगवंताची आठवण करीत, विघ्नहर्त्याचें स्तवन गात गात गांवापासून अधिकाधिक दूर जात होता.

राजाला हायस्कूलमध्ये दाखल करून बाप मागें फिरला. त्याच्या अंत:करणात अवर्णनीय वेदना होती. ब्राह्मण पति-पत्नी पोटाला पट्टी बांधून, एक वेळ जेवून मुलाच्या शिक्षणासाठीं पैसे पाठवीत होती. मुलगाही हुशार होता. अभ्यासही उत्तम होता.

आपल्या गतीचा क्रम बदलल्याशिवाय काळ अविरत पुढें पुढें चालला होता. मे महिन्याच्या रजेत राजा घरीं आला. आई-वडिलांना

अतिशय आनंद झाला. अकरा महिन्यानंतर प्रथमच घरात गोडधोड रांधलें गेलें. गरिबाच्या घरात रांधण्यासारखें दुसरें असतें तरी काय? उभ्या वर्षात सणासुदीलाही घरात कांहीं मिष्टान्न शिजलें नव्हतें, तें या महिन्यात आई स्वत:च्या मुलाला शिजवून वाढीत होती. हे तीस दिवस आईला एखाद्या पर्वासारखे होते. तिचा राजा परत जाणार होता. पुन्हा तो आईपासून दूर झाला. नंतर तीच बेचैनी व तोच निर्वाहाचा प्रकार. कधी कधी एकदम दोन दोन दिवस निर्जळ उपास घडत होता तर कधी कधी तीन-तीन दिवसही फाके होत होते. परंतु आमचा राजा शिकत आहे, शिकून मोठा कलेक्टर होईल! ही मनोहर स्वप्नें पाहणाऱ्या आईला त्या उपासांचें दु:ख होत नव्हतें.

चार महिन्यानंतर ब्राह्मणपत्नीने एक दिवस आग्रह केला : 'तुम्ही जरा राजाची चौकशी करून या. पैशाच्या अभावामुळें तो बिचारा घाबरत असेल. अनोळखी गांवात तो जाणार कोणाकडे?' ब्राह्मणाचीही इच्छा होती. तो म्हणाला : 'आणं; राजाला भेटून येतो.' सत्यनारायणाच्या पूजेत एक रुपया मिळाला होता. तो कनोटीला बांधला. ब्राह्मणपत्नीनेही राजाला खोबऱ्याचा पाक आवडतो म्हणून पूजेतून आलेल्या श्रीफळाचा नारळीपाक बनवला आणि ब्राह्मणाबरोबर बांधून दिला. सकाळी चार वाजता ब्राह्मणाने घर सोडलें. पंधरा-सोळा मैलांचें अंतर चालायला सहज पांच-सहा तास जाणार होते.

डोक्यावर जुनी लाल पगडी, फाटलेला अंगरखा व पंचा नेसलेल्या गांवठी ब्राह्मणाला पाहून हायस्कूलच्या मुलांना कुतुहल वाटलें. मोठी रजा झालेली होती, सर्व मुलें खेळत होती. कोणी या विचित्र आगंतुकाची मस्करी करीत होता, तर कोणी त्याची उपेक्षा करीत होता. जगाचा नियमच आहे : गरिबाची सर्वच मस्करी करतात. निर्धन हास्यास पात्र बनतो. पण ब्राह्मणाची नजर तर त्याच्या राजाला शोधीत होती. त्याने दुरूनच राजाला पाहिलें. राजाला भेटण्यासाठीं ब्राह्मणाने जवळ जवळ धावच घेतली. हुशार मुलानें स्वत:च्या वडिलांचे मनोभाव ओळखले. त्याला वाटलें आपले वडील इतके गांवठी माणूस आहेत हें विद्यार्थी



ओळखतील तर आपली मस्करी करतील. म्हणून तो बापाचा हात पकडून शाळेपासून दूर एका वृक्षाच्या छायेखाली आला.

वडिलांनी विचारलें : 'मला इकडे कोठे घेऊन जात आहेस? मला तुझी खोली पाहायची आहे. पाहतो तर खरें तू कोठे राहतोस तें?'

'बाबा! तुम्ही एवढ्या दुरून आला आहात, थकला असाल. आंत नाहीं आलात तरी चालेल. शिवाय तेथे यायला सुपरिटेंडेंटसाहेबांची परवानगी घ्यावी लागेल. ही कटकट हवी कशाला?'

बापाला थोडें दु:ख तर झालेंच. परंतु मुलगा पहिला नंबराने पास होत होता, मन लावून अभ्यास करीत होता म्हणून त्याने मनावर घेतलें नाहीं. त्याच्या पत्नीने दिलेला नारळीपाक मुलाला दिला व सांगितलें : 'तुझ्या मित्रांना देऊन खा बाळ! आपण गरीब आहोत हें खरें पण आप्पलपोटी नाहीत. सर्वांना वाटून खा हं!'

एवढ्यात शाळेची घंटा झाली. राजा बापाच्या पायां पडला. बापाने त्याला अलिंगन दिलें. कनोटीचा रुपया काढून दिला व अंतरातून आशीर्वाद देऊन निरोप घेतला. शाळेकडे धावत जाणाऱ्या मुलाला अनिमेष नेत्रांनी तो पहात राहिला. मुलाचा अभ्यास पाहून त्याचें मन प्रसन्न झालें होतें. परंतु त्याच्यात झालेला बदल पाहून, त्याचें वर्तन पाहून न जाणे कां तें, पण त्याचें मन जड जड झालें होतें. त्याचें मन आंतून ओरडत होतें : 'मुलाला सांभाळ, नाहीं तर तो हातातून जाईल.' परंतु विप्रहत्याची आठवण करीत आंतून उठणाऱ्या आवाजाला त्याने दाबून टाकलें.

वर्षे जायला काय वेळ लागतो! राजा आता बालक राहिला नव्हता. तो किशोर बनला होता. त्याच्यात आता यौवन डोकावत होतें. राजा हुशार होता. काळजीपूर्वक अभ्यास करीत होता. मॅट्रिकमध्ये तो पहिल्या क्रमांकाने पास झाला. ब्राह्मणाचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. ब्राह्मण पत्नीचा उत्साह नि आनंद तर अवर्णनीय होता. आता तर त्याला स्कॉलरशिप मिळाली होती. मुलाला अधिक अभ्यासासाठीं मुंबईला

पाठविलें. त्या काळात मुंबईला पाठविणें म्हणजे आजच्या काळात लंडनला जाण्यासारखे होतें.

कॉलेजातही राजाने सुंदर प्रगति केली. प्राध्यापक व विद्यार्थी सर्वांचा लाडका बनला. मुंबईला आल्यावर वडिलांना पहिलें पत्र लिहिलें. स्वत:ची खुशाली लिहिली. दिवाळीच्या सुटीत गांवाला येण्यासाठीं बापाने पत्र लिहिलें पण आर्थिक अडचणींमुळें त्याने गांवाला जायचें टाळलें. परंतु त्या दिवसांत राजा एका श्रीमंताच्या सुंदर मुलीच्या प्रेमात पडला. गांवात गरीब बाप स्वत:च्या मुलाच्या यशासाठीं शंकराला अभिषेक करीत होता व विनंति करीत होता : 'भगवंता! माझ्या राजाला पहिल्या नंबराने पास कर! आई देखील भगवंताला हात जोडून सांगत होती : 'माझ्या राजाला पहिल्या नंबराने पास कर.' व देवाची कृपा भाकत होती. एकामागून एक रजा पुऱ्या होत गेल्या. आर्थिक अडचणीमुळें व परीक्षेसाठीं खूप वाचायचें आहे असें कांहीं तरी कारण पुढें करून राजा घरी जायचें टाळीत होता. मुलीचा श्रीमंत बाप देखील राजाला आपला भावी जावई मानीत होता. श्रीमंत सासऱ्याला खुश राखण्यासाठीं राजा बरीचशी सुटी त्यांच्या घरातच व्यतीत करीत होता.

आई बिचारी 'माझा राजा या रजेत येईल, पुढल्या रजेत अवश्य येईल.' असें मनाला सारखें समजावत होती. मन भरून येई तेव्हां अश्रू गाळून मनाचा भार हलका करीत असे.

राजाची मेहनत व आईबापाची आंतरिक प्रार्थना भगवंताने ऐकली. राजा बी.ए.मध्ये फर्स्ट-क्लास फर्स्ट आला. सर्व युनिव्हर्सिटीमध्ये प्रथम आला. आय.सी.एस. करायचें मनात आलें. मुलीचे वडील त्याला इंग्लंडला पाठविण्यासाठीं व त्याचा सर्व खर्च करण्यासाठीं तयारच होते. परंतु मुलीने व्यावहारिक सूचना केली. 'तू आय.सी.एस. झाल्यानंतर लग्न करणारच आहेस ना? मग लग्न करूनच इंग्लंडला जा ना!'

राजाला वाटलें : आई-वडिलांना एक वेळ भेटून यावें. परंतु वडिलांनी परत यायला दिलें नाहीं तर? आणि या लग्नाला वडिलांनी



परवानगी दिली नाहीं तर? म्हणून तो आई-वडिलांना भेटायला गेला नाहीं. स्वत:बरोबर शिकणाऱ्या त्या युवतीशी त्याने लग्न केलें.

ज्या आई-बापांनी डोळ्यांत प्राण आणून, पोटाला पट्टी बांधून 'मुलगा शिकून सवरून मोठा होईल' हा एकमेव विश्वास बाळगून त्याला शिकविलें, त्या विश्वासाला शिकलेल्या राजाने लाथ मारली. आईच्या या आंतरिक, मूक भावनेला व सतत वात्सल्याने स्रवत राहिलेल्या हृदयाला, तरुण बनलेल्या, सुंदरीच्या मोहात पडलेल्या राजाने पायाखाली तुडवून टाकलें. लग्नासारख्या पवित्र व मंगल प्रसंगात आईबापांचे आशीर्वाद घेण्याच्या भावनेला लाथ मारली.

लंडनला जाण्याचा दिवस जवळ आला. घरीं आई-वडील चातकाच्या दृष्टीने पुत्राच्या आगमनाची वाट पहात होते. 'माझा राजा अवश्य येईल.' असें म्हणणाऱ्या प्रेमळ, भोळ्या आईच्या डोळ्यांतील अश्रू सुकत नव्हते व राजा तर इंग्लंडला जाण्याची तयारी करीत होता.

जायच्या दिवशीं सासरा व पत्नी राजाला निरोप देण्यासाठीं बंदरावर आली. अनेक शुभेच्छा व्यक्त केल्या. आगबोट पाहताच राजाला रत्नागिरी बंदर आठवलें. आपण मुंबईस आलो त्यावेळीं याचप्रमाणें आईवडील त्याला निरोप द्यायला आले होते. त्याला आईची आठवण झाली, आईचें प्रेम आठवलें. बाप व बापाचें वात्सल्य आठवलें. त्यांनी बाळगलेल्या महत्त्वाकांक्षा आणि दिलेली शिकवण यांचा स्मृतिपट एकामागून एक नजरेसमोर तरळूं लागला. एकदा तर त्याला वाटलें : 'धाव घ्यावी व घरी जाऊन आईचे पाय धरावे. वडिलांची क्षमा मागावी.' परंतु दुसरें मन त्याला सांगे : 'पहा ना; कसा उतावीळ बनत आहे. एकदा गांवात गेलास कीं आईच्या प्रेमाला दूर करून मुंबईला येता येणें शक्य नाहीं. तुला आता आय.सी.एस. व्हायचें आहे; तें कसें विसरतो आहेस? तुझ्यासारख्या सुशिक्षिताला ही भावनाप्रधानता शोभत नाहीं. आता तर खूप उशीर झालेला आहे. तिकीट काढून झालें आहे. सोबत घेऊन जायच्या कपड्यालत्त्यांचा बंदोबस्त झालेला आहे व बोट सुटण्याच्या बेतात आहे. आणि त्याने जबरदस्तीने डोळ्यांसमोर येणारा हा स्मृतिपट मोडून, तोडून,

फोडून टाकला. 'आई-वडिलांना पत्र लिहून आशीर्वाद मागून घ्यावा' असा सुज्ञ विचार पुढें आला पण मनात पुन्हा आवाज उठला, 'वडील रागावलें तर? तर आल्यानंतर त्यांची समजूत काढता येईल.' असें ठरवून त्याने आपलें मन बदललें. आपल्या मनाची समजूत घातली.

गांवातील लोक ब्राह्मणाला व त्याच्या पत्नीला म्हणत : 'मुलगा पहिला आला, आता विलायतेला जाणार. आता तरी तोंड गोड करा ना! राजा केव्हा येणार आहे इकडे? जाण्यापूर्वी तरी येईल ना?' बिचारी आई! मुलाची आठवण काढीत, हुंदके देत रडत होती, ब्राह्मण तिला आश्वासन देत होता : 'राजा अवश्य येईल. अग वेडे, सात हजार मैल दूर जायचें आहे. कुणास माहीत राजाला केवढी मोठी तयारी करायची असेल! असेच काहीं मोठें होता येत नाहीं! किती तरी अडचणींना तोंड द्यावें लागतें,' परंतु त्याची खात्री झाली होती : आता मुलगा आपला राहिलेला नाहीं. आपल्या हातून तो सुटलेला आहे. परंतु कोणत्या तोंडाने पत्नीला सांगूं? तरीही त्याच्या तोंडून शब्द निघालेच : 'मला वाटतें : आता मुलगा आपला राहिलेला नाहीं.'

तेवढ्यात राजाचें पत्र आलें : 'मी विलायतेला आय.सी.एस. शिकायला जात आहे. परंतु वेळ अपुरा पडल्यामुळें पत्र लिहूं शकलो नाहीं, त्याची क्षमा करावी.'

पत्र पाहताच आई हरखून गेली. शोकाच्या अश्रूंचें स्थान आनंदाश्रूंनी घेतलें आणि पतीला सांगूं लागली : 'माझ्या मुलाबद्दल तुम्ही खोटी तक्रार करीत होता ना; पहा, आपली आठवण करून त्याने पत्र लिहिलें की नाहीं? माझा राजा तसा नाहीं. मी त्याला बरोबर ओळखतें ना!'

ब्राह्मण शहाणा होता. अंधकाराने भरलेल्या पत्नीच्या हृदयाकाशात एखादा आनंदाचा कवडसा पडला तर तो अंधुक कशाला करा? त्यावर न बोलताच मौन पाळणें शहाणपणाचें, असें ब्राह्मण समजत होता.

या घटनेलाही जवळ जवळ दीड वर्ष लोटलें. राजा अभ्यासात मग्न होता. कधी कधी वेळ काढून सासऱ्याला व पत्नीला पत्र लिहीत होता.



परंतु आई-बापांना जवळ जवळ विसरलाच होता. केव्हा केव्हा त्यांची आठवण आली तरी त्याचें गुन्हेगार मन त्या आठवणीपासून दूर पळत होतें.

राजा विलायतेला गेला त्या दिवसापासून बापाने शंकरावर अभिषेकांची सुरुवात केली होती. राजा बुद्धिमान् होता म्हणून किंवा सततच्या अभिषेकामुळें किंवा दोन्ही कारणांमुळें म्हणा; राजा आय. सी. एस.च्या परीक्षेत पास झाला व हिंदुस्थानात परत आला.

त्या काळात मोजकेंच हिंदुस्थानी आय. सी. एस. होत होतें. त्यांचा खूप मानसन्मान होत असे. वर्तमानपत्रात फोटोही छापून येत असे.

राजाचें गांव म्हणजे लहानसे खेडें. वर्तमानपत्र यायला देखील आठ-दहा दिवस लागत. ब्राह्मण बाजूच्या गांवातून परत येत होता. गांवातील कोणी एकाने त्याला वर्तमानपत्र दाखविलें. त्यात राजाचा फोटो होता. नाशिकला कलेक्टर म्हणून त्याची नेमणूक झाली होती. कोणत्या आईचें मन स्वतःच्या मुलाचा फोटो वर्तमानपत्रात पाहून हरखून जाणार नाहीं! कोणता असा हतभागी पिता असेल जो हा समाचार ऐकून मुलाला शाबासकी द्यायला आतुर होणार नाहीं? बाप समजदार होता. भगवंताला त्याने नमस्कार केला. कारण भगवंताने त्याच्या मुलाला यश दिलेलें होतें. परंतु आईला कळत नव्हतें. हा समाचार ऐकून हसावें की रडावें? स्वतःचा मुलगा कलेक्टर झाला. परंतु मुलगा कलेक्टर झाला हे तिलाच माहीत नाहीं! बापाला वाटलें : भगवंताने माझी महदाकांक्षा पुरी केली. परंतु त्याचें सुख मला दिलें नाहीं. माझा मुलगा आता माझा राहिलेला नाहीं. पण आपलें हें दुःख तो सांगणार कोणाला?

अहो! ज्या गांवात पोलीसपाटीलही नाहीं त्या गांवचा मुलगा कलेक्टर बनला ही केवढी महत् भाग्याची गोष्ट होती! आणि विशेषतः ज्याच्यासाठीं स्वतःच प्रयत्न केलेलें असतात तेव्हा! परंतु मुलाला पत्र लिहिण्यापुरती देखील आमची आठवण आली नाहीं! ज्या आईने माझा मुलगा शिकून मोठा व्हावा म्हणून पोटाला पट्टी बांधून, उपासतापास

सोसून मेहनत घेतली त्या आईची देखील आठवण आली नाहीं! अधिक नाहीं तर आईच्या आशीर्वादाने मी यशस्वी झालो आहे, वडिलांनी उपसलेल्या कष्टांमुळें मी साहेब झालो आहे एवढीही आठवण राहिली नाहीं! बापाला या गोष्टीचें खूप दु:ख झालें.

मुलाला वाटलें : आपली फार मोठी चूक झाली आहे. पत्रात सर्व लिहिलें तर कोणास माहीत बाप काय उत्तर देईल! म्हणून त्याने मौन पाळलें.

ब्राह्मण-पत्नीने पतीला जेवायला वाढता वाढता गोष्ट काढली : 'आपला राजा फार मोठा कलेक्टर झाला आहे ना?'. ब्राह्मण गप्पच होता. 'आता त्याने लग्न केलें असेल. चला; एकदा आपण त्याला भेटून येऊं.' अजूनही ब्राह्मण गप्पच होता. 'आपला राजा वेडा झाला म्हणून काय आपणही वेडें व्हायचें? तो आपल्याला विसरला म्हणून काय आपण त्याला विसरायचें? पुत्र कुपुत्र झाला म्हणून काय आईने कुमाता व्हायचें?'

**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति।** ब्राह्मण - पत्नी पुत्रवात्सल्याच्या आलेल्या उमाळ्याने बोलत होती. तिचें मन पुत्राला पाहाण्यासाठीं आसुसलें होतें.

'राजाच्या आई! तू विसरतेस कसें? आपण पोटाला पट्टी बांधून, थंड पाणी पिऊन क्षुधा शांत केलेली आहे. त्याच्या शिक्षणासाठीं काय काय सहन केलें नाहीं? आज या वयात-ज्या वयात तू राजाच्या पत्नीकडून सेवा करून घ्यायला हवी होती, त्या काळात राजा आपल्याला विसरून गेला आहे. तो कलेक्टर झाला म्हणून काय त्याचें आई-बाप हलकें झालें? आपण त्याचें आई-बाप होण्याची योग्यता गमावून बसलो आहोत कां? राजाला माहीत नाहीं कां; आपण केवढ्या दारिद्र्यात दिवस काढत आहोत? प्रथम राजाचें लालनपालन, शिक्षण व त्याला मोठा करण्याचें ध्येय नजरेसमोर होतें. ते कष्ट, ते दुख, दु:ख वाटत नव्हतें. पण राजाच्या आई! आता हें सहन होत नाहीं. कोणास माहीत; भगवंताने ही शिक्षा कां दिली असेल! आता तो घेऊन गेला असता तर सुटलो



असतो!' ब्राह्मण आता जीवाला उबगला होता. आजवर थांबलेल्या अश्रूंनी रस्ता काढला. लहान बालकाप्रमाणे तो रडूं लागला. ब्राह्मण पत्नीचे डोळेही ओले झाले. पत्नीला पतीचे हे कष्ट सहन झाले नाहीत. पतीला आश्वासन देण्यासाठीं तिच्याजवळ शब्द नव्हते.

एक दिवस, ब्राह्मण भगवान् सवितृनारायणाला अर्घ्य देऊन उभा राहिला. त्यावेळीं ब्राह्मणपत्नी हळूच त्याच्याजवळ काकुळतीने भरलेल्या आवाजात म्हणाली : 'आजपर्यंत मी तुमच्या जवळ कांहींच मागितलें नाहीं. आज मला तुमच्याजवळ मागायचें आहे. माझी खात्री आहे तुम्ही मला नाहीं म्हणणार नाहीं. आपल्या संसाराला आता जवळ जवळ पंचेचाळीस वर्षे झाली असतील. आपला राजा देखील अठ्ठावीस तीस वर्षांचा झाला असेल. एकवेळ मरण्यापूर्वी त्याला पाहण्याची माझी इच्छा आहे. कांहींही करून तुम्ही मला माझ्या राजापर्यंत घेऊन चला. बोलता बोलता तिच्या डोळ्यांत पाणी आलें. 'तुम्ही पुरुष आहात. बाहेर फिरून, कामकाजात मन गुंतवूं शकता. परंतु उठता बसता मला माझा राजाच दिसतो. माझ्या गळ्याची शपथ, कांहींही करून मला त्याच्याकडे घेऊन चला.'

पत्नीची मनापासूनची मागणी ब्राह्मण टाळूं शकला नाहीं. त्याने तिला आश्वासन दिलें : 'तू चिंता करूं नकोस. आपण थोड्याच दिवसांत नाशिकला जाऊं.'

परंतु नाशिकला जायला खर्च फार होता. शिवाय कसें जायचें हा एक प्रश्न होताच. शेवटीं दोघांनीही विचार केला : 'आपलीही खूप दिवसांची इच्छा आहे. नाशिकची यात्रा करूं, गोदावरीत स्नान करूं व उरलेलें आयुष्य त्या तीर्थभूमीत व्यतीत करूं.' त्यांनी स्वत:चें घर विकलें. त्याने जीवनभर छाया दिली होती. त्याला भावपूर्ण प्रणाम केला. वाडीतील झाडें, ज्यांचा प्रेमाने सांभाळ केला होता, जो म्हातारपणातील विसावा होता, ज्यांनी या ना त्या रीतीने हा गरीब संसार जीवंत राखला होता त्यांना त्यांनी कृतज्ञतेने नमस्कार केला. झाडांना पाणी द्यायला शेजाऱ्यास विनवलें व वाडवडिलांचें गांव सोडलें. स्वत:च्या आवश्यक कपड्यांचें

लहानसें गांठोडें बांधलें. दुसरें सोबत घ्यायला या गरीब दांपत्याकडे होतेंच काय?

मुंबईला आली, तेथे गाडीत बसून नाशिकला उतरली. कलेक्टरच्या बंगल्याचा तपास करता करता रखडत रखडत बंगल्याजवळ आली. बंदूक घेऊन पोलीस दरवाजावर पहारा करीत होता. या गांवंढळ दाम्पत्याला पाहून पोलीस हसूं लागला. ब्राह्मणाने पत्नीला थोडी दूर उभी केली व परत मुख्य दरवाजाकडे आला. बंगल्याच्या आवारात पोलीसाने त्याला जाऊ दिलें नाहीं. पोलीसाने तुसड्या भाषेत सांगितलें : 'ए भामट्या! हा कलेक्टरचा बंगला आहे. ही कांहीं धर्मशाळा नाहीं. चल; नीघ इथून!'

ब्राह्मणाचें तेजस्वी रक्त उसळलें. त्याने मोठ्या आवाजात म्हटलें, 'मला आंत जाऊं देणार नाहीस तर दुसऱ्या कोणाला जाऊं देणार आहेस?'

दरवाजावर ही गडबड चालली होती त्यावेळीं कलेक्टर व त्याची पत्नी बॅडमिंटन खेळून येऊन चहा पीत बसली होती. गडबडयुक्त आवाज ऐकताच कलेक्टरने खिडकीतून डोकावून पाहिलें.

त्याने स्वतःच्या बापाला पाहिलें. तो फाटलेले कपडे घातलेला ब्राह्मण पोलिसाला सांगत होता : 'कलेक्टर माझा मुलगा आहे. मी त्याचा बाप आहे.' पोलीसही कंटाळलेला होता. नेहमी सूर्यापेक्षा रेती अधिक तप्त होते. कुत्र्याप्रमाणे लाळ घोटीत साहेबाच्या दयेवर जगणाऱ्या त्या पोलिसाने त्या गरीब ब्राह्मणाला लाथ मारली. 'कधी पाहिला नाहीं तो तू माझ्या मोठ्या साहेबाचा बाप व्हायला आला आहेस.' सगळा राग त्याने त्या ब्राह्मणावर काढला. दोन कोलांट्या खाल्लेल्या ब्राह्मणाची नजर वर पोचली. खिडकीतून डोकावून पाहणाऱ्या स्वतःच्या मुलाला त्याने पाहिलें. बाप-मुलाची दृष्टीला दृष्टि भिडली परंतु मोहवश बनलेल्या मुलाला हिम्मत झाली नाहीं कीं धावत जाऊन बापाचे पाय धरावेत. त्याची माफी मागावी. त्याला वाटलें : माझे वडील एवढे गांवठी आहेत हें लोकांना माहीत झालें तर लोक काय म्हणतील? माझी पत्नी त्यांचा स्वीकार



करील की नाहीं? आणि या विचारांच्या आवेगात त्याने खिडकी बंद केली.

पत्नीने विचारलें : 'काय होतें?'

'कोणी अनोळखी दरवाजावर मला भेटायची इच्छा करीत होता.' असें सांगून वेळ मारून नेली.

बापाला ही लाथ वज्रासमान होती. ती पोलिसाची लाथ नव्हती तर ज्या मुलाला या छातीवर झोपविलें होतें, लाड करून लहानाचा मोठा केला होता त्या मुलाची ही लाथ होती. त्याचा होत असलेला अपमान राजाने खिडकीतून पाहिला पण त्याला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. माझ्या दृष्टीला दृष्टि मिळविली पण मला, त्या..... त्याच्या बापाला त्याने ओळखलेंही नाहीं! धाडकन् खिडकी बंद करून घेतली. भगवंताने मुलाच्या बंगल्यात असा हा अपमान होण्यासाठींच मला जीवंत ठेवलें होतें कां? उपाशी राहून राजाला शिकविलें होतें ते हा दिवस पाहण्यासाठीं? त्याचें मन स्वतःचा अनंतवार धिक्कार करूं लागलें.

वाट पाहणाऱ्या पत्नीने दुरूनच पतीला पाहिलें. गांठोडें घेऊन उभी झाली. समोर येऊन विचारलें : 'माझा राजा भेटला? खुशाल आहे ना?' आणि तिची नजर पतीच्या नेत्रांवर पडली. पतीची नजर अपमानाने लाल झालेली होती. त्याच्या सर्व शरीरातील रक्त डोळ्यांत जमा झालें होतें. शरीर फिक्कें पडलें होतें.

'होय' त्याने तुटक उत्तर दिलें.

'पण तुम्ही असें काय दिसता? तुमची तब्येत ठीक आहे ना?'

आणि पतीने रोखून धरलेला बांध फुटला. घडलेली सर्व दुर्घटना हृदय मोकळें करून त्याने पत्नीला सांगितली. तिला अतिशय दुःख झालें. दोघांची एकच मनोव्यथा होती. भगवंताजवळ एकच तक्रार होती : 'भगवंता! हा दिवस पाहण्यासाठीं का तू आम्हाला जीवंत ठेवलेंस?'

दोघेंही खूप रडली. त्याशिवाय त्यांच्या जीवनात दुसरें आश्वासन तरी कोणतें होतें?

जसजसा दिवस चढत गेला तसतसा ब्राह्मणाचा तापही वाढूं लागला. स्वत:च्या पुत्राला कोणकोणत्या उमेदी उराशीं बाळगून वाढवला होता! आज त्याच्याच बंगल्यात दोन दमडीच्या नोकराने मला लाथ मारली! पुत्राची दृष्टि पडली पण तोही गप्प राहिला. स्वत:च्या बापाला ओळखूनही न ओळखल्यासारखी दृष्टि फिरवली! माझा राजा असा कृतघ्न झाला! हा विचारच त्याला असह्य झाला होता. आणि त्या अपघातामुळें त्याने त्याच रात्री या सृष्टीचा निरोप घेतला.

पति असहाय सोडून निघून गेला, मुलाने तोंड फिरविलें होतें आणि भगवानही उचलून घेऊन जाण्याची विनंति कानावर घेत नाहीं. त्यामुळें ब्राह्मण-पत्नी खूप दु:खी होती. ती जाणार कोठे? काय करणार? ती बावरून गेली होती. तिने वपन केलेलें होतें. डोक्याचें कुंकू पुसलें गेलें होतें. हातातल्या बांगड्या फुटल्या होत्या. दु:खाच्या बोजामुळें दहा वर्षे अगोदर म्हातारी झालेली, शून्यमनस्क बनलेली ती विचार करीत बसली होती. कोठें जायचें तें समजत नव्हतें. घरीं परत जायचें तर तेवढे पैसे जवळ नव्हते व जायचें तर लोकांना तोंड तरी कसें दाखवायचें? भगवान् शंकराच्या या मंदिरात ती बसून राहिली. शेवटीं तिने निर्णय घेतला. गोदावरीत स्नान करायचें व येथे मंदिरात बसून भगवंताचा नामजप करायचा.

जिचा मुलगा संपूर्ण जिल्ह्याचा कलेक्टर म्हणजे राजाच, त्याची आई आज एका मंदिरात कोपऱ्यात बसून असहाय जीवन जगत होती. भूक, तहान, पतिवियोगाच्या दु:खाने तप्त झालेली, पुत्राने उपेक्षिलेली, जवळ पैसा नाहीं, रहायला घर नाहीं, आत्मीयतेने बोलेल अशी एकही व्यक्ति जवळ नाहीं. अशा असहाय स्थितीत एक विधवा स्त्री अनोळखी जागी कसे दिवस कंठीत असेल तें फक्त हें दु:ख देणाऱ्या भगवंतालाच माहीत!

खूप वेळा वाटतें : दयेचा सागर भगवान् इतका निष्ठुर होऊं शकतो का? जो भगवंत न सांगता, न मागता, एवढ्या प्रेमाने माणसांचें,



भूतमात्रांचें रक्षण करतो तो एका असहाय, निराधार विधवा स्त्रीला अशा स्थितीत राखूं शकेल कां? की स्वत:कडे बोलावण्यापूर्वी कसोटी पहात असेल? कोणास माहीत या महान् नटराजाची लीला काय असेल! आजपर्यंत ही लीला कोणाला ज्ञात नाहीं, हा महान् कलाकार स्वत:च्या कलाकृतीमध्ये विविध रंग भरीत बसलेला आहे. कधी सुखाचा गुलाबी रंग, तर कधी दु:खाचा काळा रंग तर कधी दोहोंचें मिश्रण करीत रंगीबेरंगी व तऱ्हेतऱ्हेची रांगोळी काढीत बसला आहे! त्याच्या या कृतींत केव्हा तो या काळ्या रंगाची रेषा ओढील तें अजूनही कोणी जाणूं शकलेला नाहीं!

मानवमात्र, सृष्टीत असलेले भूतमात्र हे सर्व त्या चिद्‌घन शक्तीच्या हातातील खेळणी आहेत. महान् मदारी दोरी ओढून मागेंपुढें करून आपल्याला नाचवित राहिलेला आहे. कधी मांडीवर बसवून लडिवाळपणें हात फिरवेल तर कधी दूर ढकलून गोलांट्याही खायला लावील. कधी दोन वानरांना एकत्र आणील तर कधी दूर पण ढकलून देईल. वानरांना बिचाऱ्यांना बोलण्याचा हक्कही नाहीं कीं 'असें कां?' मानव बिचारा काय बोलणार? आणि बोललाच तर कोणाजवळ? आणि तरीही हा भगवंत दयाळू आहे. आंतील आर्तनाद अवश्य ऐकेल!

खिडकी बंद केल्यानंतर कलेक्टरला खूप पश्चात्ताप झाला. स्वत:च्या या अपराधाबद्दल त्याचें अंतर्मन त्याला फटके मारीत होतें. त्याचें मन त्याला ओरडून सांगत होतें : 'हत् मूर्खा! घराच्या अंगणात आलेल्या बापाला, तुला अलिंगनं द्यायला आलेल्या बापाला तू अशा प्रकारे घालवून दिलेंस? तू एवढा संस्कारी, ब्राह्मणकुळात जन्माला आलेला, तू तुझ्या बापाचे अनंत ऋण विसरलास? आणि तें देखील एवढ्या लवकर? मानव असून तू एवढा कृतघ्न बनलास? तू मानव म्हणवून घ्यायला योग्य नाहीस. तुझ्यापेक्षा कुत्रा देखील बरा. भाकरीचा तुकडा देणाऱ्या धन्यासाठीं रात्रभर जागून राखण करतो.

'एक दिवस तूही गरीब होतास ना! तुझ्या या आई-बापांच्या तोंडचा घास हिरावून घेऊनच तू मोठा झाला आहेस. त्याची तू अशी परतफेड

केलीस? हाच का तुझा मोठेपणा? हेच का तुझे संस्कार? असेंच जर तुझें कलेक्टरपण असेल तर धिक्कार असो तुझा नि तुझ्या कलेक्टरपणाचा.

पण हातातून तीर सुटून गेला होता. आता रस्ता राहिला होता या तीराने घायाळ झालेल्याला घरीं आणून त्यावर इलाज करण्याचा. पण नंतर त्याचें अंतर्मन म्हणे : 'वा रे वा! फार चांगला खेळ! प्रथम घायाळ करायचें, दुःख द्यायचें व नंतर मलमपट्टी करायची! तुझा तेजस्वी पिता मानील कां?' पण त्याचें दुसरें मन म्हणें : 'नाहीं नाहीं! माझे आईबाप अवश्य येतील. कांहीं झालें तरी ते आई-वडीलच आहेत.'

**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति।**

'भगवंता तसें न करो; पण ते तुझ्या तीराचे बळी बनले असतील तर...' आणि या विचाराने तो थरथर कापूं लागला. काय करावें तें त्याला कळेनासें झालें. बावरलेल्या मन:स्थितीत तो खोलीमध्ये येरझारा घालूं लागला.

मानवाच्या जीवनात असाही प्रसंग येतो कीं जेव्हा तो भोग जीवनाला कंटाळतो तेव्हा त्याला भावजीवनाची गरज भासतें. आजपर्यंत कलेक्टरच्या भोग-जीवनात भावजीवनाला स्थान नव्हतें पण आज तो भावजीवनासाठीं, आईबापांच्या प्रेमळ आश्रयासाठीं कातर बनला होता. त्याने बापाला पत्र लिहिलें पण तें परत आलें. आता बापाला कोठे शोधायचें? तो फार दुःखी झाला.

कलेक्टरच्या घरात सर्वच सुख होतें. पण कोणी वडील नव्हतें. त्याला विचारणारा कोणी नव्हता. कलेक्टरची पत्नी गर्भवती झाली म्हणून तिला खास प्रौढ वयाच्या एखाद्या बाईची गरज होती.

ब्राह्मणपत्नी मंदिरात कीर्तन ऐकायला बसली होती. कीर्तन पूर्ण झाल्यावर कांहीं स्त्रिया आपापसात बोलताना तिने ऐकलें : कलेक्टरकडे



मोलकरणीची गरज आहे. कलेक्टरची पत्नी गर्भवती आहे. तेव्हा तिलाही पाहील अशी बाई पाहिजे.

दुसऱ्या दिवशीं सकाळी ती बंगल्यावर पोचली. कलेक्टरची मोटार बंगल्याच्या बाहेर पडत होती. कलेक्टर पत्नीसोबत कोठे तरी बाहेर जात होता. दुरूनच तिने स्वतःच्या मुलाला पाहिलें, तिचें मातृहृदय उचंबळून आलें. धावत जाऊन मुलाला मिठी मारावी असें मनात आलें. पण स्वतःच्या मनावर तिने ताबा मिळविला. डोक्यावरील पदर तिने अधिक खाली ओढला व कलेक्टरच्या पत्नीला म्हटलें :

'मी ऐकलें आहे कीं तुम्हाला मोलकरणीची गरज आहे. मला मोलकरीण म्हणून ठेवाल का?'

स्वतः सासू असूनही, बंगल्याची मालकीण असूनही स्वतःच्या सुनेकडे नोकरीची भीक मागत होती. मानवी जीवनाशी असा क्रूर खेळ खेळताना नियतीला मजा वाटत असेल नाहीं?

आईचें हृदय भरून आलें. ती मनात म्हणाली : 'भगवंता! आता हे दिवस पाहायचें बाकी होते तेही तू दाखविलेस. आता तरी तू खूष झालास ना?' पण तिचें एक मन म्हणत होतें : 'नाहीं, नाहीं! या घरचें पाणी पिणेंही पाप आहे! ज्या दारात माझ्या पतीचा अपमान झाला तेथे मी पाय कसा ठेवूं?' परंतु ते तर आता जग सोडून गेले आहेत व मीही आता किती दिवसांची पाहुणी आहे? शिवाय सुनेला दिवस गेले आहेत. तिच्यासाठीं कोणी घरचें माणूस असेल तर बरें. असें तिने समाधान मानलें व पुन्हा कलेक्टरच्या पत्नीला विनंति केली.

'माझें इथे कोणी नाहीं. मी विधवा आहे. थोड्याच दिवसांपूर्वी माझा नवरा वारला. मी दुःखी आहे. मला नोकरीला ठेवून घ्या.' बोलता बोलता तिचे डोळे पाणावले. नवरा मेल्याचें दुःख तर होतेंच परंतु स्वतःच्या सुनेजवळ नोकरीची भीक मागताना तिचें मन घुसळून निघत होतें. तिने लुगड्याच्या पदराने आपले डोळे पुसले.

कलेक्टरच्या पत्नीनेही दु:खी विधवा समजून तिला मोलकरीण म्हणून ठेवून घेतलें.

ब्राह्मणपत्नी समजत होती ही माझी सून आहे आणि कलेक्टरची पत्नी समजत होती ही माझी मोलकरीण आहे.

मुलगा दूर गेल्यावर खूप वर्षे झाली होती. ती वृद्ध देखील झाली होती. आता तर ती विधवा झाली होती. डोक्यावरील केस काढल्यामुळें ती कुरूप बनली होती. लुगड्याचा पदर कपाळापर्यंत ओढलेला असल्यामुळें कलेक्टर स्वत:च्या आईला ओळखूं शकला नाहीं. जुन्या काळात एक सभ्यता होती. पुरुषवर्ग मोलकरणीच्या संपर्कात कधी येत नसे. मोलकरीण विशेषत: घराच्या मागील भागातच राहात असे. पुरुषवर्ग पुढील भागात राहात असल्याने तशी मर्यादा राखण्यात येत असे.

कलेक्टर स्वत:च्या आईला ओळखूं शकला नव्हता. ती मोलकरीण असल्यामुळें त्याच्या संपर्कातही येत नव्हती. स्वत:च्या आईला त्याने मोलकरीण म्हणून ठेवलें होतें. आईबापांच्या शोधासाठीं तो बेचैन होता. त्याची आई त्याच्याच घरात असून देखील तो तिला शोधूं शकला नव्हता.

ब्राह्मणपत्नीने कलेक्टरच्या पत्नीला प्रेमाने जिंकलें. खूप प्रेमाने जवळ बसवून तिच्या केसांना तेल लावी, मुलीच्या प्रेमाने सांभाळी. गर्भारपणात काय करायचें, काय नाहीं करायचें याचें मोठ्या प्रेमाने मार्गदर्शन करी. तिचें वर्तन इतकें मायाळू होतें, कीं कलेक्टरच्या पत्नीला स्वत:च्या आईची उणीव भासत नव्हती. घरातील लहान-मोठी सर्वच कामें तिने प्रेमाने स्वत:च्या डोक्यावर घेतली होती.

एकामागून एक दिवस जात होते. महिनेही मागें पडूं लागले. ब्राह्मणपत्नी आता केवळ तिच्या मुलाची आई नव्हती. एका नातवाची आजीही होती. अजूनपर्यंत स्वत:च्या राजाला दुरून पाहून समाधान मानीत होती पण आता तर तिचा नातू तिच्याच मांडीवर खेळत होता. त्यात



तिला तिच्या राजाचें दर्शन घडत होतें. मोठ्या प्रेमाने ती नातवाची दृष्ट काढीत होती व चुंबनांनी त्याला आंघोळ घालीत होती.

एक दिवस पति-पत्नी जेवायला बसली होती. जेवता जेवता मोलकरणीच्या पगाराची गोष्ट निघाली. पतीने विचारलें : 'ही मोलकरीण सर्व काम बरोबर करतेय ना?'

'देवाची खरोखर कृपा आहे, कीं आपल्याला इतकी चांगली बाई मिळाली. माझ्यावर तर मुलीसारखें प्रेम करते! घरातील सर्व काम तीच करते. घरातील बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष ठेवते. जणूं स्वत:चें घर आहे अशा तऱ्हेने ती मिसळून गेली आहे. आणि बाळ तर तिच्याशी इतका एकरूप झालेला आहे कीं माझी आठवणही येत नाहीं त्याला. खरोखर भगवंताची अमर्याद कृपा आहे. नाहींतर अशी मोलकरीण आजकाल कोठे मिळते?'

'तर मग तिचा पगार थोडा वाढव ना! दोन चार चांगली लुगडीही विकत घेऊन दे.'

'अहो, हीच तर माझी अडचण आहे. जेव्हा जेव्हा मी पगाराची गोष्ट काढते तेव्हा तेव्हा म्हणते : माझा पगार कोठे जाणार आहे? आणि या समृद्ध घरात मला आणखीन पैशांची गरज काय आहे? माझ्या पाठीवरून हात फिरविते तेव्हा वाटतें : माझी आईच तर हात फिरवित नाहीं ना! आज तिला आल्याला सहा महिने झाले पण पैशाचें नांव काढलें नाहीं.

जगात अजून अशी सज्जन माणसें आहेत याचें कलेक्टरला आश्चर्य वाटलें.

एक दिवस कलेक्टरची पत्नी व मोलकरीण बोलत बसली होती. पत्नीने म्हटलें : 'तुम्ही किती प्रेमळ आहात! आम्हा सर्वांना प्रेम देता! तुम्हालाही एखादा मुलगा असता तर किती चांगलें झालें असतें!'

ब्राह्मणपत्नीचे डोळे भरून आले. ती तिला कसें समजावणार, कीं मी माझ्याच मुलाच्या घरात आहे. डोळ्यात आलेले अश्रू झटकन् तिने पुसले व म्हटले : 'तुम्ही म्हणता तें खरें आहे. पण ही सर्व माझीच मुलें आहेत ना!' या वाक्यात असलेलें सत्य कलेक्टरची पत्नी कोठून समजूं शकणार होती!

'तुमचा मुलगा असता तर किती संस्कारी असता! ज्याला तुमच्यासारखी आई मिळाली असती तो खरोखरच भाग्यशाली ठरला असता!'

ब्राह्मणपत्नी निरुत्तर झाली. गळ्यापर्यंत आलेला हुंदका तिने मोठ्या कष्टाने गिळला.

एक दिवस दुपारी पत्नी क्लबमध्ये गेली होती. कलेक्टरचें डोकें दुखत होतें म्हणून तो नेहमीच्या वेळेपूर्वी घरीं आला होता. त्यावेळीं बाहेर झोपाळ्यावर बसून त्याची आई नातवाला अंगाई गीत ऐकवत होती. कलेक्टरने दुरून तें ऐकलें. त्याला तो आवाज ओळखीचा वाटला. तें अंगाई गीतही ऐकल्यासारखें वाटलें. तेंच अंगाई गीत, तीच कंठातील माधुरी, तेंच प्रेम. त्याला आठवलें : बाळपणात माझी आई हें अंगाई गीत गाऊन मला झोपवीत होती. त्याचें मन बाळपणीचा कोनाकोपरा शोधूं लागलें. त्याला आई आठवली, बाप आठवला. स्वत:चें लहानसें खेडें, त्या खेड्यातील लहानसें घर, लहानशी वाडी, सर्वच त्याच्या मन:चक्षुंसमोर आलें. कलेक्टरने दुरूनच पाहिलें. मोलकरीण आंत निघून गेली पण कलेक्टरच्या अंत:करणात खोल वेदना भरून गेली. त्याला बाप आठवला, बापाशी केलेलें वर्तन आठवलें आणि तो रडूं लागला.

सायंकाळी पत्नी घरी आली त्यावेळीं त्याने विचारलें : 'ही मोलकरीण हें अंगाईगीत कोठे शिकली?'

'हें गीत तर रोज सायंकाळी ती बाळाला ऐकवते. तिच्या आवाजातही काय गोडवा आहे! आणि ती जेव्हा गाऊं लागते तेव्हा



शब्दाशब्दातून तिचें प्रेम ओसंडत असतें. तुम्ही मानणार नाहीं; पण भगवंताने मला आईच दिली आहे.' असें सांगताना कलेक्टरच्या पत्नीचें हृदय भरून आलें. मोलकरणीच्या त्या गोड प्रेमाने ती गुदमरून जात असे. खूप वेळा तिच्या मनात येई : हिला कडकडून भेटावें, प्रेमाने मिठी मारावी. प्रेमाश्रूंनी या माउलीला न्हाऊं घालावें. पण नजरेसमोर मोलकरीण दिसताच ती उठलेल्या स्वत:च्या विचारांना बळेच दाबून टाकीत होती.

दुसऱ्या दिवशीं कलेक्टर क्लबात गेला नाहीं. घरीं येऊन स्वत:च्या खोलीत बसला व मोलकरणीचें गीत ऐकलें. तें ऐकताच त्याला त्याची आई आठवली. त्याने पत्नीला विचारलें : 'तू या मोलकरणीचें नांव विचार, गांव विचार.'

पत्नी म्हणाली : 'मी खूप वेळा विचारलें आहे. ती फक्त एवढेंच सांगते : तुम्ही सर्व माझेच आहात ना! तुम्ही दोन दिवस जेवलात नाहीं त्याचें तिला फारच दु:ख झालें. आचाऱ्याकडून खास नारळ मागवून घेऊन तिने स्वत:च्या हाताने नारळीपाक बनवला आहे.'

कलेक्टर जेवायला बसला. त्याने नारळीपाक खाल्ला. तोच स्वाद होता. जणूं त्याच्या आईनेच तो बनवला होता. खाता खाता त्याचें हृदय भरून आलें. डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. नारळीपाकाच्या प्रत्येक तुकड्याबरोबर त्याला आई आठवत होती. आईचें प्रेम आणि लाड नजरेसमोर तरळत होते.

'तू पुन्हा विचार, तिच्या पतीचें नांव काय होतें, तिचें गांव कोणतें.' कलेक्टरने पत्नीला सूचना केली.

लहानगा बाळ देखील मोलकरणीच्या इतका मायेचा झाला होता कीं तो आई-बापांजवळही जात नव्हता. सर्वांना मोलकरणीने खूपच प्रेम दिलें होतें. कलेक्टरची समस्या वाढली : त्याला सारखी आई-वडिलांची आठवण येत होती.

मानवी जीवनांचे दोन प्रकार असूं शकतात. एक भावजीवन व दुसरें भोगजीवन. कलेक्टरच्या जीवनात दिवसेंदिवस भावजीवन पुष्ट होत होतें. त्याचें अंत:करण आईबापांच्या प्रेमासाठीं झुरत होतें. तो पुन्हा पुन्हा वडिलांना पत्र लिहीत होता परंतु सर्वच पत्रें परत येत होती.

एक दिवस असेंच एक पत्र परत आलें. त्याचें मन खूपच अस्वस्थ झालें. कामकाजात मन लागेनासें झालें. बाबा केवढ्या मोठ्या आशेने माझ्याकडे आले असतील! आणि माझ्याच बंगल्यात त्यांचा धुत्कार झालेला होता. माझ्यासाठीं त्यांनी केवढे आशेचे मनोरे बांधलेलें असतील आणि त्या सर्वांवर मी पाणी फिरविलें! माझा हुद्दा मोठा आहे. पण काय करायचाय? परत आलेलें पत्र त्याने वाचलें. डोळ्यात पाणी भरून आलें. डोळ्यात आलेला अश्रूंना तो दाखविणार तरी कोणाला?

पत्नीने विचारलें : 'पण तुम्ही पोस्टमास्तरला कॉल करून विचारत कां नाहीं?'

'त्या गांवात पोष्ट ऑफिस देखील नाहीं. कोणाला विचारूं? घराला कुलूप आहे. वडील कोठे गेलें असतील कोणास माहीत! त्यांना शोधायचें तरी कोठे.'

'मी बुद्धिमान् आहे, हुशार आहे. पण जीवनाच्या परीक्षेत मी नापास झालो आहे. कलेक्टर होऊनही माझें जीवन फुकट गेलें आहे.'

एक दिवस कलेक्टरने खूप विचार केला. त्याच्या पुढील समस्या सुटण्याचें कांहीं चिह्न दिसेना. त्यामुळें त्याचें डोकें दुखूं लागलें. बेचैनी वाटूं लागली. ऑफिसमधून लवकर घरी आला. पत्नी बाहेर गेलेली होती. नोकराने ब्राह्मणपत्नीला खबर दिली : साहेब आलें आहेत. त्यांचें डोकें खूप दुखत आहे.



मोलकरणीचें मातृहृदय भरून आलें. स्वत: घरात असून मुलाला अशी बेचैनी वाटावी? बाहेर येऊन तिने विचारलें : 'डोकें दाबूं कां?' कलेक्टरही तिच्याशी बोलण्याची संधि शोधीत होता. त्याने 'हो' म्हटलें.

पलंगाच्या मागें उभी राहून ब्राह्मणपत्नी डोकें दाबूं लागली.

'तुमचें गांव कोणतें?' कलेक्टरने विचारलें.

'मी गरीब आहे. गरिबांना कुठलें आलें आहे गांव?'

'पण तुमचें कोणी नात्या-गोत्याचें?'

'नात्याचा फक्त परमेश्वर!'

कलेक्टरला आवाज परिचयाचा वाटला. कपाळावर फिरणाऱ्या हाताने त्याला आश्चर्यजनक शांति मिळत होती. ती मोलकरीण साहेबाचें डोकें दाबीत नव्हती, आई आपल्या मुलाचें डोकें दाबीत होती. डोकें दाबता दाबता आईचे डोळे भरून आले. गंगाजळाप्रमाणे पवित्र असें दोन अश्रू कलेक्टरच्या गालावर ठिपकले. कलेक्टरची खात्री झाली. तो व्याकुळ होऊन उठला व मोलकरणीचे पाय धरले. किती झुरल्यानंतर त्याला आई भेटली होती. अश्रूंचा पूर त्याच्या डोळ्यांतून सांडला. त्या अश्रूंनी आईचे पाय धुतले. आईच्या डोळ्यांतूनही अश्रुधारा वाहात होत्या. एकाच्या नेत्रात पुत्र प्राप्तीचा आनंद होता आणि दुसऱ्याच्या नेत्रात पश्चात्तापाचे अश्रू होते. मुलाला उठवून आईने मोठ्या प्रेमाने अलिंगन दिलें. 'माझा राजा बाळ!' म्हणत ती त्याच्या पाठीवरून हात फिरवूं लागली.

'आई. मी कितीतरी पापी आहे. कृतघ्नी आहे. दारात आलेल्या बापाला मी झिडकारलें. आई मला क्षमा कर!' म्हणत त्याने पुन्हा आईच्या चरणांवर लोळण घेतली. पुन्हा त्याचे डोळे अश्रुधारा वाहवूं लागले.

'पण आई! तुझी ही स्थिति......'

'बाळ! काय सांगूं? घडल्या गोष्टीची आठवण करण्यात कांहींच अर्थ नाहीं! त्या दिवशीं तुझ्या बंगल्यावरून परत फिरल्यावर तुझ्या वडिलांना जोराचा ताप चढला. इथे झालेला अपमान ते सहन करूं शकले नाहीत. त्याच रात्री मला रडत ठेवून, एकटी, असहाय टाकून त्यांनी कायमचा निरोप घेतला.'

बोलता बोलता आईचे डोळे भरून आले. तिला पति-वियोगाचें दु:ख या वेळेला अधिक सलूं लागलें.

'आई! तुझ्या मुलाच्या घरातच तुला मोलकरीण व्हावें लागलें! बापाचा घातकी तर मी बनलोच व तुलाही मोलकरीण म्हणून राबवलें. मी मोठें पातक केलें आहे. हें घोर पातक मी कसें काय धुवूं शकणार? आई! परमेश्वर देखील माझ्या या पापाला क्षमा करणार नाहीं! मला त्याचें प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे.' आणि आईच्या मांडीवर डोकें ठेवून कलेक्टर हुंदके देत रडत होता.

कलेक्टरची पत्नी बाहेरून आली. तिला वस्तुस्थिति कळली. तिनेही आईचे पाय धरले. माफी मागितली. 'आई! तुम्ही माझ्या सासू असाल याची मला कल्पनाच नव्हती. कळत-नकळत माझी कांहीं चूक झाली असेल तर आई! मला क्षमा करा. मी सून असून तुमच्याकडून मोलकरणीसारखें काम घेतलें आहे.' तिचेंही डोळे भरून आले. आईने मुलाला व सुनेला कुशीत घेतलें व प्रेमाश्रूंनी त्यांना न्हाऊं घातलें.

'आई! माझ्या पापाचें प्रक्षालन नाहीं. माझ्या वडिलांचा मी घातकी बनलो. आईला मी मोलकरीण म्हणून घरात ठेवलें. धिक्कार आहे माझ्या



या कलेक्टरपणाला! सत्ता व संपत्तीने मला आंधळा बनवला आहे. मला ही सत्ता नको. मला ही संपत्ति नको. जी संपत्ति माणसाचें भावजीवन नाश करते ती काय कामाची? आई! मी माझ्या कलेक्टरच्या पदाचा राजीनामा देत आहे!'

'पण बाळ.....'

'आई! हें शिक्षणच असें आहे. तें मानवी जीवनच नाश करून टाकतें. हें शिक्षण घेतल्यानंतर सर्व भावजीवन विसरून जातात. भोगजीवनाच्या ओढीसमोर भावजीवनाच्या कल्पनाच नष्ट होतात. माणूस कृतघ्नी बनतो. मी घराघरात जाईन, गांवागांवात फिरेन, मुलांना हें भावजीवन समजावीन. **मातृदेवो भव। पितृदेवो भव।** चे पाठ जीवनात आणायला शिकवीन. हेंच आता मला प्रायश्चित्त.

आणि राजाने कलेक्टरपदाचा राजीनामा दिला. स्वत:चें उरलेलें आयुष्य संस्कृतीच्या या महान् कार्यासाठीं समर्पित केलें.

❑❑❑❑

# ॠतुध्वज

धन्य तो ऋतुध्वज अन् धन्य ती मदालसा! भगवान् सहस्त्ररश्मीच्या प्रतिहारीने नुकतीच ललकारी द्यायला सुरुवात केली होती. आपले सोनेरी किरण पुढें पाठवून चंडप्रतापी सूर्यनारायण आपलें आगमन सूचित करीत होता. अशा त्या सुमंगल समयीं नदीच्या प्रशांत जलात एक तेजःपुंज ऋषि भगवान् सूर्यनारायणाला अर्घ्य देत होता. उषःसूक्ताचें पारायण करीत होता. जवळच असलेल्या एका वृक्षाजवळ उभा असलेला एक अत्यंत चलाख व तेजस्वी घोडा प्रत्येकाचें मन खेचून घेत होता. प्रत्येकाच्या मनात येई, कीं या ऋषीजवळ अशा प्रकारचा अद्भुत घोडा कसा काय? एखाद्या राजदरबारात शोभेल असा हा प्राणी या ब्राह्मणाने कशासाठीं पाळला असेल? हा ब्राह्मण कोण असेल बरें?

गालव हें त्याचें नांव. साठ हजार विद्यार्थी असलेल्या तपोवनाचा तो कुलपति होता. त्याच्या आश्रमात विद्यार्थी व वानप्रस्थी लोक रहात असत. त्याचा आश्रम म्हणजे लाख दोन लाख वस्ती असलेलें छोटेंसें शहरच. संपूर्ण मानव जातीला सुधारणारी, तिला सांस्कृतिक बनविणारी दिव्य आणि तेजस्वी शक्ति आश्रमात निर्माण होत असे. गालवमुनि त्या शक्तीचा केंद्र होता. त्या घोड्याला घेऊन तो शत्रुजित राजाकडे जात होता. रस्त्यात स्नानसंध्या करण्यासाठीं त्याने मुक्काम केलेला होता.

त्याच्या आश्रमाला लागूनच पातालकेतूचें राज्य होतें. तो राक्षस होता. राक्षस म्हणजे मीच रक्षण करणारा आहे असें मानणारा. अशा वृत्तीचे लोक अतींद्रिय शक्तीला मानीत नाहीत; इतकेंच नव्हे तर तिची अवगणना करतात. आम्हीच स्वतः भगवान् असून आम्हीच आमचें रक्षण करतो, असें मानणारा वर्ग म्हणजे राक्षस वर्ग. राक्षस म्हणजे मोठी नखें, दांत व अक्राळविक्राळ रूप असलेले; ही कल्पनाच भ्रांत होय. राक्षस सुंदरही असतात. ते आपल्यासारखेंच जीवन जगतात. परंतु उपभोग हें



त्यांच्या जीवनाचें परम लक्ष्य असतें. वाटेल त्या प्रकारे भोग भोगणें हीच त्यांच्या जीवनाची कृतकृत्यता. पातालकेतु हा अशा राक्षसांपैकी एक राक्षस होता. तो मोठमोठी भाषणें करी. सुंदर राजमहालात राहात असे. परंतु भोग हेंच त्याच्या जीवनाचें लक्ष्य होतें. खा, प्या, मजा करा हेंच त्याच्या जीवनाचें सर्वस्व होतें. ज्यायोगे पैसा मिळेल तेंच शिक्षण घ्यायचें. पैशाने भोग खरेदी करून ऐशआरामात राहायचें व त्या चिद्घन शक्तीची उपेक्षा करावयाची, हें त्याचें जीवन-लक्ष्य होतें. स्वतःलाच सृष्टीचा अधिपति समजून कृमि-कीटकांपेक्षा हीन दर्जाचें जीवन पातालकेतु व त्याचे इतर सहकारी जगत असत.

अशा प्रकारचे राक्षसी वृत्तीचे लोक जवळच राहात असल्यामुळें पातालकेतूच्या राज्यातले तरुण गालवमुनीच्या आश्रमात येऊन अपरिपक्व बुद्धीच्या विद्यार्थ्यांमध्ये अविश्वास निर्माण करीत, भित्र्या विद्यार्थ्यांना धमक्या देत, स्थिर बुद्धीच्या विद्यार्थ्यांना मारीत असत. ऋषि-पत्न्यांकडे वाईट नजरेने पाहात व आश्रमातल्या तरुणांना उपभोगाचे पाठ देत. त्यामुळें आश्रमाचें पवित्र वातावरण भोगवादी व विलासी विचारांनी कलुषित झालें होतें.

प्रत्येक गोष्टीची एकच कसोटी होती. ती ही, कीं ही गोष्ट केल्याने फायदा काय होणार? भगवत्पूजा कां करायची? सूर्य-नारायणाला अर्घ्य कशासाठीं द्यायचें? संध्या कशासाठीं करायची? आम्ही संध्या करीत नाहीं. त्यामुळें आमचें काय नुकसान होतें? संध्या करीत नसूनही आम्हाला जेवायला मिळतेंच, पैसा मिळतोच, आम्ही पास होतोच. असें असताना हा सर्व खटाटोप कशासाठीं? एक दिवस हें जीवन नष्ट होणार परंतु तत्पूर्वी चैन करता येईल तेवढी करून घ्या. पैसा नसला तरी ऋण काढून सण करा. **ऋणं कृत्वा घृतं पिबेत्।**

भोगवादी विचारांचे जंतु पसरायला वेळ लागला नाहीं. हळूहळू आश्रमीय विद्यार्थ्यांचे विचार बदलूं लागले. 'आम्हाला वाटेल तसें आम्ही करूं. तुमचे दिवस आता गेले. तुम्ही जसें आचरण करता तसें आम्ही कशाला करायला हवें?' असें विद्यार्थी म्हणूं लागले.

ही गोष्ट गालवऋषीच्या कानीं पडली. परिस्थिति बिघडून ती आता आटोक्याबाहेर चालली होती. पातालकेतूच्या राज्यातल्या राक्षसी वृत्तीच्या तरुणांना जसजसा समजावण्याचा प्रयत्न केला जाऊं लागला तसतसे ते बेफामच होऊं लागले. नवविचारांच्या या लोंढयाला कसा अडथळा घालावा असा गालव ऋषींच्या समोर प्रश्न उभा राहिला. गालवऋषि सचिंत झाला. यांना शाप द्यावा कां? शापाने समुदायात पसरलेले जंतु नाहीसे होतील. पण तो सामुदायिक अत्याचार ठरेल. आणि शाप शत्रूला जसा बाधक तसा आपणालाही बाधक. मग शापाचा फायदा तो काय?

ती सकाळची वेळ होती. गालवमुनि सचिंत बसला होता. प्रतिकूल प्रसंगातून कसें बाहेर पडावें यासाठीं मार्ग सापडत नव्हता. शेवटी त्याने आर्तपणे भगवंताला शरण जायचें ठरविलें. कारण परमेश्वराशिवाय कोण मदत करणार?

'भगवंता! स्वर्गाचें राज्य सुप्रतिष्ठित राहावें आणि या मृत्युलोकात धर्माचें राज्य टिकावें म्हणून आम्ही तपस्व्यांनी शहर सोडून वनवास स्वीकारला आहे. तपाची सरिता वाहवून लोकांच्या जीवनात दैवी विचारसरणी आणि प्रभूच्या सात्त्विक विचारांचा प्रवाह प्रविष्ट व्हावा यासाठीं रात्रंदिवस रक्ताचें पाणी करतो आहोत. प्रभो! आम्हाला कीर्तीचा मोह नाहीं, अधिकाराची अपेक्षा नाहीं, आम्ही राजाश्रित झालो नाहीत. तुझे विचार लोकांत जावेत यासाठीं केवळ तुझ्या भरवशावर निरपेक्ष प्रयत्न करीत आहोत. असें असूनही राक्षसी विचारसरणी लोकांच्या जीवनात प्रभावी होत आहे. अशा परिस्थितीतून तूच मार्ग दाखव. आम्ही हें घेतलेलें व्रत सोडून द्यावें कां? तुझें कार्य करण्याचें हातीं बांधलेलें कंकण फेकून द्यावें कां?'

हताश होऊन गालवमुनि अशा प्रकारची प्रभुप्रार्थना करीत एका खांबाला टेकून बसला होता. बसल्या बसल्या त्याचा डोळा लागला व तो निद्राधीन झाला. स्वप्नात भगवंताचा आदेश मिळाला. 'तुझा जीवन-व्यवहार बरोबर आहे. राक्षसी विचारसरणी मधून मधून प्रभावी होत असतेच. ही गोष्ट अगदी नैसर्गिक आहे. अशा वेळीं ऋषींची तप:शक्ति,



राजाची दंडशक्ति व धनिकांची धनशक्ति एकत्र करून, राक्षसी विचारांचें समूळ उच्चाटन करता येईल. तू अशा प्रकारच्या राजाचा शोध कर; कीं जो तुला सांस्कृतिक कार्यात मदत करील. तुझ्या अंगणात एक दैवी घोडा उभा राहील. जो राजा या दैवी अश्वावर स्वार होऊं शकेल तोच तुला या कार्यात मदतरूप ठरेल. त्याचा शोध कर आणि हा संकेत सांग.

गालवमुनि डोळे उघडून पहातो तोच त्याला एक अत्यंत सुंदर घोडा दारात उभा असलेला दिसला. त्या काळी राजा शत्रुजित स्वत:चें सात्त्विक व धर्मप्रिय वर्तन आणि संस्कृतिरक्षणाला सदा कटिबद्ध असल्याबद्दल ख्यातनाम होता. त्या घोड्याला घेऊन गालवमुनि शत्रुजित राजाच्या दरबारीं जायला निघाला. गालवमुनि स्वत: पुढें चालत होता व घोडा आपल्या विलक्षण चालीने पाठीमागून हळूहळू चालत जात होता. लोकांना वाटे : हा ब्राह्मण मूर्ख आहे. परंतु गालवमुनि तत्त्वनिष्ठ होता. त्याच्याजवळ जीवनातले उच्च सिद्धांत होते. हा घोडा प्रभूने विशिष्ट दैवी कार्यासाठीं पाठविला आहे. माझ्यासाठीं नव्हे. मी त्याचा उपयोग काय म्हणून करावा? मी त्याच्यावर बसलो तर अनर्थ होईल. धर्माचें किती सूक्ष्म दर्शन हें!

गालवमुनि चालत चालत शत्रुजित राजाच्या दरबारात येऊन पोचला. गालवमुनि हा त्या काळातील एक महान् शक्ति होता. हें शत्रुजित राजाला माहीत होतें. त्याने त्याचें अतिशय सन्मानपूर्वक स्वागत केलें. त्याची यथायोग्य पूजा केली. कुशल विचारलें : 'तुमचें हें कायिक, वाचिक व मानसिक तप पाहून स्वर्गात इंद्रही घाबरत असेल! मुनिश्रेष्ठ! सर्व प्रकारे कुशल आहे ना? तुमच्यां आश्रमातील वृक्ष, वेली व पल्लव कोणी तोडीत नाहीं ना? वृक्षांना गंडस्थळें घासून रानहत्ती तपोवनाला उपद्रव तर देत नाहीत ना? आश्रमीय हरिणांना कोणी त्रास देत नाहीं ना? तुमच्या तपाने, तुमच्या चरण-रजाने पवित्र झालेल्या या तपोवनातील पवित्र जलाला कोणी दूषित तर नाहीं ना करीत? कोणी एखादा उन्मत्त दानव स्वस्थता व स्वर्गीय शांतीचा भंग करून कलह निर्माण करीत नाही ना? ऋषिपत्नी, ऋषिगण आणि सर्व शिष्य यांचें कुशल आहे ना?'

मुनि म्हणाला: 'सांस्कृतिक कार्य करणाऱ्यांच्या मार्गात अडचणी ह्या यायच्याच. असंस्कृत जीवन जर जगायचें असेल तर कोणत्याही प्रकारची अडचण नसतेच. त्यामुळें स्वाभाविकपणे अशाच प्रकारचें जीवन लोकांना आवडतें. 'उशिरा उठा!' याचा प्रचार करावा लागत नाहीं. परंतु 'लवकर उठा' याचा प्रचार करावा लागतो. भगवंताला नमस्कार केल्याशिवाय जेवायला बसा याचा प्रचार करण्याची गरज नाहीं. जेवताना भगवंताला प्रणाम करून जेवा याचा प्रचार करावा लागतो. परंतु आज घरोघरीं असांस्कृतिक, जडवादी, राक्षसी विचारसरणीचा प्रचार होत चालला आहे. आमच्या सरहद्दीला लागूनच पातालकेतूचें राज्य आहे. तो पातालकेतु राक्षस आहे. त्याच्या राज्यातून भगवन्नामाचें उच्चाटन झालें आहे. लोकांना वेदांची कल्पना नाहीं पूर्वजांचें स्मरण नाहीं. उत्कृष्ट शिक्षण किंवा कला कशासाठीं मिळवायची? भाकरीसाठींच ना! राजा! अशा प्रकारच्या राक्षसी विचारसरणीच्या लोकांचें लक्ष दोन गोष्टींवरच असतें. खायला भाकरी व राहायला घर. कुत्र्यालाही या दोन गोष्टींपेक्षा आणखी काय हवें असतें? या विचारानेच माणसाला पशु बनविलें आहे. हजारों वर्षें आपल्या ऋषि-मुनींनी रक्ताचें पाणी करून जी सांस्कृतिक परंपरा उभी केली ती हे राक्षस उन्मत्त होऊन नष्ट करीत आहेत. ते स्वत:ला भगवान् समजत आहेत. पातालकेतु सर्वांनाच सांगतो, कीं 'तुमच्या शेतीसाठीं बैल मी देतो. कालवे बांधून पाणी मी देतो. शेतीसाठीं बीं मी देतो. भाकरी मी देतो. तुमच्या सर्व गरजा मी पुरवितो. मग तुम्हाला भगवंताची गरज काय? **ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी।** अशा वृत्तीचे सर्व राक्षस असतात. तिथे भगवान् नसतो. संस्कृति नसते. सांस्कृतिक परंपरा तोडण्यात लोकांना गौरव वाटतो. प्राचीन दिव्य वाङ्मयाचा अधिक्षेप करण्यात त्यांना बिलकूल वाईट वाटत नाहीं. त्यांच्या शाळांतून, महाविद्यालयांतून अशा प्रकारचें शिक्षण दिलें जातें. नव्या पिढीमध्येही याच भोगवादी विचारसरणीचे अंकुर फुटलेले आहेत. हे उन्मत्त झालेले तरुण आश्रमाचें पावित्र्य नष्ट करीत आहेत. तरुण मुलींना बिघडवीत आहेत. दोन दिवस आश्रमात राहून सहा महिनेपर्यंत घेतलेले परिश्रम धुळीला मिळवीत आहेत. नवीन नवीन प्रलोभनें दाखवून आश्रमीय वातावरण दूषित करीत आहेत. आश्रमातले विद्यार्थी असें म्हणूं लागले आहेत, कीं आम्ही वेळींच अभ्यास कां



करावा? आम्ही वाटेल त्यावेळीं अभ्यास करूं अगर न करूं. सकाळी लवकर उठून अभ्यास आम्हीच कां करावा? आम्ही शिस्तपालन करणार नाहीं. शिस्तीने जीवन जगणें अतिशय कठीण आहे. त्यामुळें आनंदावर विरजण पडतें व जीवन बेचव वाटतें. अशा प्रकारे पवित्र जीवन ज्यावेळीं दूषित होतें त्यावेळीं सांस्कृतिक जीवन जवळ जवळ नष्ट होतें. हे राजा! तू जीवंत असताना अशा प्रकारचा सांस्कृतिक अध:पात व्हावा ही कल्पनाच मला सहन होत नाहीं. तुझें वैभव आणि सत्ता या राक्षसी विचारांना मुकाट्याने सहन करणार काय?'

शत्रुजित सगळें ऐकून घेतल्यावर क्षणभर निश्चेष्ट बनला. दु:ख आणि क्रोधाने भडकून उठून तो गालवमुनीला म्हणाला: 'मुनिवर! आमच्या नसांमध्ये जोवर क्षत्रियवृत्तीचें रक्त सळसळत आहे तोवर आपल्या सांस्कृतिक परंपरेच्या केसालाही कुणी धक्का लावलेला आम्ही सहन करणार नाहीं. पातालकेतूला आता चांगलीच अद्दल घडवली पाहिजे. मुनिवर! आज्ञा करा. मी आपल्या मदतीला कटिबद्ध आहे.'

गालवऋषि म्हणाला: 'राजन्! तुझ्याकडून मी ह्याच उत्तराची अपेक्षा बाळगली होती.' आणि त्यांनी ईश्वरी संकेत व दैवी कार्यासाठीं प्रभूने पाठवलेल्या दिव्य अश्वाची माहिती शत्रुजिताला सांगितली.

त्याप्रसंगी शत्रुजिताचा पुत्र ऋतुध्वज तिथे खास उपस्थित होता. महर्षि गालवांची मनोव्यथा आणि स्वत:च्या पित्याच्या अदम्य उत्साहपूर्ण उद्गाराने उत्तेजित होऊन हा नवतरुण राजपुत्र धीरगंभीर आवाजात वडिलांना सांगूं लागला: 'पिताजी! आजवर तुमच्याकडून आणि गुरुजनांकडून मी जे कांहीं शिक्षण मिळवलें आहे, आपल्या भव्य सांस्कृतिक परंपरेचें आणि धर्माचें रक्षण करण्यासाठीं मी जे कांहीं क्षत्रियसुलभ शस्त्रास्त्रांचें ज्ञान मिळवलें आहे ते सारें या जीवनात सार्थकी लावण्याची नामी संधि आज समोरून चालत आली आहे; असें मला वाटतें. हा दैवी अश्व स्वतेजाने आणि बळकट टापेने मला जसा कांहीं आह्वानच देतो आहे. पिताजी! मला आज्ञा करा. माझे बाहू आता त्या

राक्षसाचा नि:पात करून तपोवनाला मुक्त करण्यासाठीं आतूर झाले आहेत. मुनिवर! मला आशीर्वाद द्या.'

महर्षि गालव ऋतुध्वजाच्या बोलण्याने चकितच झाला. त्याने त्याला मन:पूर्वक आशीर्वाद देऊन दैवी अश्वावर स्वार व्हायला सांगितलें. ऋतुध्वज अगदी सहजगत्या अश्वावर स्वार झाला आणि त्याला पळवूं लागला. म्हणता म्हणता ऋतुध्वज अगदी क्षितिजावर त्या दैवी अश्वाला घेऊन गेला. मागें उरलेल्या धुळीच्या लोटाकडे अनिमेष नजरेने पाहाताना, कृतकृत्यतेच्या भावनेने गालवमुनीचा चेहरा प्रफुल्लित झाला.

शत्रुजित मुनीला म्हणाला, 'गुरुजी! माझा पुत्र ऋतुध्वज शूर आहे, वीर आहे; संस्कृतीवर त्याचें मनापासून प्रेम आहे. पातालकेतु आणि त्याच्या सहकाऱ्यांना कंठस्नान घातल्याशिवाय तो स्वस्थ बसणार नाहीं. आता आपण निश्चिंत रहा.'

ऋतुध्वज खरोखर शूर होता. उत्साही व नव्या दमाचा होता. त्याच्या ठिकाणीं आकाशाला बांधण्याची, हिमालयाचें चूर्ण करण्याची दुर्दम्य शक्ति होती. त्याने गालवमुनीला आश्वासन दिलें : 'गुरुजी! तुम्ही निर्धास्त रहा. मी राक्षसांच्या तावडीतून तपोवनाची सुटका करीन. तुमचा हा दिव्य अश्व पाहून माझें हृदय अत्यंत अधीर झालें आहे.' ऋतुध्वज उत्कृष्ट घोडेस्वार होता व समोरच ज्याला पाहातच स्वार व्हावें असा घोडा उभा असल्यावर मग काय विचारावें?

**अश्वः शस्त्रं शास्त्रं वीणां वाणीं नरश्च नारीच।**
**पुरुषविशेषं प्राप्य भवन्ति योग्यायोग्याश्च।।**

गालवमुनीला त्याचा हेतु पटला. तो म्हणाला : 'हा घोडा तुझ्यासाठींच आहे. भगवंताचें कार्य करण्यासाठीं हा घोडा प्राप्त झालेला आहे. भगवान् तुला यश देईन.' असें म्हणून त्याने तेथून प्रयाण केलें.

ऋतुध्वजाने आल्याबरोबर पातालकेतूला अशी ताकीद दिली, कीं तू किंवा तुझ्या प्रजेपैकीं कोणीही गालवमुनींच्या तपोवनात पाऊल टाकता कामा नये. परंतु उन्मत्त झालेल्या पातालकेतूने त्या आज्ञेचा अवमान केला.



ऋतुध्वजाला हें वृत्त समजलें. त्याने शत्रुजिताची अनुज्ञा घेतली व एकटाच पातालकेतूबरोबर लढायला निघाला. प्रेमळ पित्यानेही आपल्या एकुलत्या एका आणि लाडक्या पुत्राला मृत्यूच्या जबड्यात जायची परवानगी दिली.

ऋतुध्वज अतिशय शौर्याने लढला परंतु पातालकेतु त्याला मिळाला नाहीं; याचें त्याला दु:ख झालें. पातालकेतु पराभूत झाला परंतु स्तंभन विद्येमुळें पाण्यात जाऊन लपून बसला. ऋतुध्वजाने त्याला शोधून काढण्यासाठीं बरीच शिकस्त केली. पण कांहींही उपयोग झाला नाहीं. शेवटी फिरत फिरत एका बागेत विश्रांतीसाठीं थांबला. तिथे घाबरलेल्या दोन सुंदर युवती बोलत असलेल्या त्याने पाहिल्या. त्यांपैकीं एकीचें लावण्य अगदी स्वर्गीय होतें.

ऋतुध्वजाने त्यांना विचारलें : 'हा बगीचा कोणाचा आहे?' त्याच्याजवळ तपाचें तेज होतें. तारुण्याची प्रभा विलसत होती. त्याचें तेजस्वी व अत्यंत प्रभावी स्वरूप पाहून त्यांनी ऋतुध्वजाला विचारलें : 'आपण कोण आहात?'

ऋतुध्वज म्हणाला : 'मी तुम्हाला अगोदर प्रश्न विचारला आहे. तेव्हा तुम्ही अगोदर उत्तर दिलें पाहिजे. नंतर मी तुमच्या प्रश्नाचें उत्तर देईन.' त्यावर त्या स्वर्गीय युवती म्हणाल्या : 'आपणाला सर्व हकीगत सांगताना आम्हाला संकोच वाटत आहे. परंतु आम्ही असें ऐकलें आहे, कीं राजा शत्रुजिताच्या ऋतुध्वज नांवाच्या अतिशय सुंदर व पराक्रमी राजपुत्राने पातालकेतूचा पराभव करून त्याला पळवून लावलें आहे. राक्षसी वृत्तीमुळें झालेल्या शोषणापासून जगाला वाचवायला तो आला आहे. आमचें त्याच्याशी कांहीं काम आहे. आपण त्याला ओळखता काय? तो या बाजूला आला आहे. असें आम्ही ऐकलेलें आहे. तेव्हा कृपा करून आपण ही माहिती सांगावी.'

ऋतुध्वजाने त्यांना आश्वासन दिलें व सांगितलें : 'घाबरूं नका. तुम्ही कोणत्या संकटात आहात तें मला सांगा.'

'ही माझी बहीण आहे. इथून हजारो मैल दूर राहाते. पातालकेतूने तिला पळवून आणली आहे. तिची इच्छा नसताना बळजबरीने तिच्याशी लग्न करण्याची त्याची इच्छा आहे. परंतु त्याच्यासारख्या नराधमाच्या हातीं हा देह ठेवून जीवनवस्त्र दूषित करण्याची तिची इच्छा नाहीं. तेव्हा आपण कोण आहात तें अगोदर सांगा ना!' ती युवती म्हणाली.

'मला लोक ऋतुध्वज म्हणतात.'

'माझें नांव-मदालसा. मी विश्वावसु गंधर्वाची मुलगी' ती लावण्यवती म्हणाली.

तिची बहीण म्हणाली : 'फार चांगलें झालें; आपली भेट झाली. आपला व आमचा शत्रु एकच आहे.'

मदालसा विश्वावसुची सर्वात लाडकी कन्या होती. ती ऋतुध्वजाला म्हणाली : 'आपली कीर्ति ऐकली तेव्हापासूनच माझें हृदय मी आपणाला अर्पण केलें आहे. आज दर्शन झालें हें माझें परमभाग्य होय. माझी आपल्याला एक नम्र विनंति आहे कीं पातालकेतूला मारून आपण माझें पाणिग्रहण करावें.'

ऋतुध्वज म्हणाला : 'ही गोष्ट करण्यात मी खरोखरच स्वत:ला भाग्यशाली समजेन. परंतु पातालकेतु पळून कुठे तरी लपून बसला आहे. त्याला शोधीत शोधीत मी इथपर्यंत आलो आहे.'

मदालसेची बहीण म्हणाली : 'त्याला पकडण्याचा एक मार्ग आहे. पातालकेतु मदालसेसाठीं अगदी वेडा झालेला आहे. तुम्ही मदालसेशी लग्न केलेंत तर सूड उगविण्यासाठीं तो बाहेर येईल.'

परंतु ही युक्ति ऋतुध्वजाला एकदम पटणें जरा कठीण होती. तो विचारात पडला. भारतीय परंपरेप्रमाणे आईवडिलांच्या परवनगीशिवाय लग्न करणें श्रेयस्कर नाहीं आणि ऋतुध्वजाने केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणे जोपर्यंत पातालकेतु मरत नाहीं, तोपर्यंत आई-वडिलांना भेटायचें नाहीं.



ऋतुध्वजाला यात तिसरा मार्ग दिसत नव्हता म्हणून त्याने मदालसेचें गंधर्व-विधीने पाणिग्रहण केलें. ही गोष्ट कळताच द्वेषाने भरलेला पातालकेतु पाण्यातून बाहेर आला. त्याचें व ऋतुध्वजाचें घनघोर युद्ध झालें, या युद्धात शेवटी सत्याचाच विजय झाला. अप्रतिम शौर्य व प्रभुभक्तीचा पाठिंबा या दोन गोष्टींमुळें ऋतुध्वजाने पातालकेतूचा पराभव केला. राक्षसी सत्तेचा अंत झाला. गालवमुनींच्या आश्रमाला राक्षसांच्या त्रासापासून कायमचें मुक्त केलें. आश्रमातील लोकांना भोगवादी व विलासी जीवनापासून दूर राहाण्याचा आदेश दिला व मदालसेसह स्वत:च्या राजधानीकडे जायला निघाला.

शत्रुजिताचा आनंद तर गगनात मावेनासा झाला होता. एकट्याने महान् राक्षसाचा पराभव करून तो राजकुमार परत येत आहे. हें ऐकून संपूर्ण नगर स्वागत करण्यासाठीं अधीर झालेलें होतें. आपल्या भावी राजाला पाहाण्यासाठीं लोक उतावीळ झालेले होते.

मदालसेच्या अलौकिक आणि अप्रतिम तेजाने सर्व लोक स्तिमित झाले. त्या दोघांनीही शत्रुजिताला व राणीला वंदन केलें. राणीने कौतुकाने विचारलें : 'ही तुझ्याबरोबर कोण आली आहे?' ऋतुध्वजाने प्रारंभापासून शेवटपर्यंत घडलेल्या सर्व घटनांचें वृत्त सांगितलें व मदालसेचा परिचय करून दिला. परंतु राणीच्या मनात एक शंका आली, कीं विश्वावसूची ही लाडकी व श्रीमंतीत वाढलेली मुलगी इथे कशी काय राहील?

परंतु मदालसेने राणीची शंका फोल ठरविली. स्वत:च्या गोड स्वभावाने, विवेकी बुद्धि व प्रेमळ वर्तनाने संपूर्ण राजकुटुंबाला तिने आपलेसे केलें. आपल्या गोड वाणीने तिने सर्वांची अंत:करणें जिंकली ती जिथे जिथे जाई तिथे तिथे प्रेम आणि शांतता यांचें साम्राज्य निर्माण करी. ती गोड हाक मारून चूक करणाराचा कानही पकडी व त्याच्यावर प्रेमही करी. हळूहळू संपूर्ण राज्यकारभारात ती खूपच मदत करूं लागली. वेषांतर करून संपूर्ण राज्यात फिरे व सर्व परिस्थिति जाणून घेई. आश्रमात जाई व ऋषिपत्न्यांबरोबर घरोघरी फिरे. स्त्रियांना सात्त्विक जीवन शिकवी. कृतज्ञतेचें शिक्षण देई. ती सांगे : 'भगवंताविषयी कृतज्ञभाव ठेवला नाहीं

तर आईवडिलांविषयीही कृतज्ञबुद्धि राहणार नाहीं आणि असें झालें तर लोकांविषयी आणि समाजाविषयीही कृतज्ञता कशी काय राहाणार? कृतघ्न जीवन हें कुत्र्याच्या जीवनापेक्षाही कनिष्ठ जीवन आहे. केवळ स्वत:चाच स्वार्थ पहायचा, खायचें, प्यायचें, मजा करायची एवढेंच काहीं जीवन नव्हे. समाजात जर स्त्री सुशिक्षित झाली, सुसंस्कृत झाली तरच ती संततीमध्ये संस्कार निर्माण करूं शकेल.' या विचारानेच तिने स्त्री सुधारणेचें कार्य हाती घेतलें. स्त्रियांच्या उद्धाराच्या भगीरथ कार्यात आजच्या ज्ञात इतिहासात तिचें नाव अग्रभागी आहे. अशा तऱ्हेने तिने आपल्या राज्यातील संपूर्ण लोकांना सुसंस्कृत व सुखी केलें. परंतु कोणाला माहीत, कीं विधात्याला हें सुख आणि स्वास्थ्य मंजूर नव्हतें कीं इतर कोणतें कारण असेल. एकाएकी संकटाचे मेघ गोळा झालें.

पातालकेतूचा तालकेतु नावाचा एक भाऊ होता व तोही राक्षसी विचारांचा होता. तो आपल्या भावाच्या पराभवाचा सूड उगविण्याची संधीच पाहात होता. ती संधि त्याला मिळाली. त्याने निश्चय केला, कीं वाटेल ते करून यांच्या सुखी संसारात विघ्न निर्माण करायचें. ऋतुध्वजाला मारून मदालसेला कायमची रडत ठेवण्याचें त्याने ठरविलें. समोर येऊन लढण्याची हिंमत त्याच्याठिकाणीं नव्हतीच. म्हणून त्याने कुटिल नीतीचा अवलंब करण्याचें ठरविलें.

एक दिवस ऋतुध्वज स्वत:च्या राजधानीपासून फार दूर गेलेला होता. तालकेतूने त्याच्या येण्याच्या मार्गात एक झोपडी बांधली व ऋषीचा वेष घेऊन तो तिथे राहूं लागला. राक्षस स्वार्थासाठीं ऋषीही होतात. सात्विकतेच्या नावाखाली लोकांना फसवतही असतात. ऋतुध्वज येतो आहे हें तालकेतूने लांबून पाहिलें व जणु आपण समाधीतच आहोत असें त्याने ढोंग केलें. ऋतुध्वजालाही वाटलें : हा कोणीतरी ऋषि असेल तेव्हा त्याला प्रणाम करून पुढें जायला हवें.

तो घोड्यावरून उतरला. ऋषीला नमस्कार केला व आपण कोण म्हणून विचारलें. तालकेतु म्हणाला : 'मी वीतराग आहे. खूप अध्ययन केलें आहे. पुष्कळ तपश्चर्याही केली आहे. आजपर्यंत मी माझें जीवन



भगवत्कार्यासाठीं व्यतीत केलेलें आहे. आता शेवटची एकच इच्छा उरली आहे, कीं या जर्जर देहाचा त्याग करावयाचा आहे व त्याची सांगता करावयाची आहे.'

ऋतुध्वज म्हणाला: 'महाराज! मग आपण विलंब कां करता?'

'सांगतेसाठीं यज्ञ करायला हवा व यज्ञासाठीं संपत्तीची गरज असते. मी निर्धन ब्राह्मण. यज्ञासाठीं संपत्ति कुठून आणूं? ही गोष्ट तुझ्यासारख्या राजालाच शक्य आहे.'

ऋतुध्वजाने कर्तव्यबुद्धीने प्रेरित होऊन स्वत:च्या गळ्यातील माळा काढून दिली. सांगितलें : 'यावेळीं माझ्याजवळ यापेक्षा दुसरें कांहींही नाहीं. फक्त ही एकच मौल्यवान माला आहे. ही तुम्हाला उपयोगी पडेल आणि यापेक्षा जास्त द्रव्याची गरज लागली तर नंतर मला येऊन भेटा.'

'आपण इकडे कधी येणार?'

एक-दोन महिन्यानंतर.' असें सांगून तो घोड्यावर बसून निघून गेला.

तो जात असताना तालकेतूने त्याच्याकडे वक्रदृष्टीने पाहिलें. त्याला वाटलें : आता हा मासा गळात सांपडणार.



शत्रुजिताची राजधानी शोक सागरात बुडून गेली होती. सगळीकडे स्मशानशांतता पसरली होती. चराचर शोकाच्या प्रावरणाखाली झाकून गेले होते.

शत्रुजित राजा व राणी यांच्यावर तर वज्राघात झालेला होता. एकुलता एक तरुण, देवासारखा राजकुमार सिंहाची शिकार झाला! इतकेंच नव्हे तर त्याच क्षणीं मदालसेनेही पतीचें अनुकरण केलें. एकाएकी पुत्र व सून यांच्या निधनाचें दु:ख! त्या दु:खाने शत्रुजिताची छातीच

दडपली. तो राणीला खोटें खोटें आश्वासन देत होता. नगरवासी अशा प्रकारच्या शूरवीर, संस्कृतीसाठीं मृत्यूलाही मुठीत घेऊन हिंडणाऱ्या अप्रतिम तेजस्वी राजाला मुकले होते. त्याचप्रमाणे मदालसेच्या प्रेमळ मातृत्वालाही ते पारखे झाले होते. नगरात सगळीकडे हाहाकार उठला होता. लोक मदालसेच्या पतिप्रेमाला नतमस्तक होऊन प्रणाम करीत होते.

या घटनेला जास्तीत जास्त पंधरा दिवस झाले असतील. इतक्यात ऋतुध्वजाला येताना लोकांनी लांबून पाहिलें. तोच तेजस्वी प्रेमळ चेहरा. लोकांना अतिशय आश्चर्य वाटलें. त्याच्याकडे विस्मित होऊन सारे पाहूं लागलें. कित्येकांची भीतीने गाळण उडाली. हा खरा ऋतुध्वज की त्याचें भूत!

ऋतुध्वजही घाबरलेल्या अवस्थेत शत्रुजिताकडे गेला. शत्रुजिताला वंदन केलें. शत्रुजितही त्याच्याकडे विस्फारित नेत्रांनी पाहूं लागला. हा आपला ऋतुध्वज की त्याचें भूत? डोळे नीट उघडून पाहिलें. ऋतुध्वजाला तर आश्चर्याचा धक्काच बसला. 'पिताजी! हें काय चालूं आहे. याचा मला अर्थच कळत नाहीं. तुम्ही आणि हे सर्व नगरवासी डोळे फाडफाडून माझ्याकडे असें कां पाहात आहात? आज नगरातील शांतता मला भयंकर वाटत आहे. आपण सर्व कुशल आहात ना?'

शत्रुजित आता सावध झाला होता. त्याने अतिशय प्रेमाने ऋतुध्वजाला आलिंगन दिलें. दोघांच्याही प्रेमसागराला भरती आली. त्याच्या मुखातून वाक्य बाहेर पडलें कीं, 'बाळा! तू जीवंत आहेस कां?'

'परंतु हें सर्व काय चाललें आहे? मला अर्थ उलगडून सांगा ना! माझें निधन केव्हा झालें होतें?'

'बाळ! ही सर्व हकीगत ऐक. तू गेल्यानंतर थोडक्याच दिवसांनी एक ऋषि दरबारात आले व धाय मोकलून रडूं लागले. आम्ही जसजसे त्याचें सांत्वन करूं लागलो तसतसा त्यांचा शोक अनावरच होऊं लागला. त्यांचें खूप समाधान करण्याचा प्रयत्न केला. नंतर ते म्हणाले : 'राजा



राजकुमार ऋतुध्वजाला सिंहाने खाल्लें. मला खूपच राग आला. ही गोष्ट शक्य नाहीं. साक्षात् यम जरी आला तरी त्याच्या एक केसालाही तो धक्का लावूं शकणार नाहीं. तेव्हा ऋषीही संतापून म्हणाले : 'ऋषीच्या शब्दावर इतका अविश्वास? तुझ्या राज्यात इतका अधर्म कां घुसला आहे!' आणि ते हातात पाणी घेऊन शाप द्यायला तयार झाले.

'पण मी मेलो असें तुम्ही सर्वांनी मानलेंच कसें?' ऋतुध्वज आश्चर्याने म्हणाला.

'आम्ही तरी काय करणार! तुमची खात्री होत नसेल तर - तर ही पहा....' असें म्हणून त्या ऋषीने आपल्या करकमलांतून तुझी ही मोत्याची माळ आम्हाला दाखविली.

राजाने ती माळ ऋतुध्वजाला दाखविली. ऋतुध्वजानेही ती आपली माळ ओळखली. त्या ऋषीचेंच हें कारस्थान असलें पाहिजे असें त्याने ओळखलें. आपण त्याला ही माळ देण्यात फार मोठी चूक केली हें आता त्याच्या ध्यानात आलें.

तो म्हणाला : 'आई कुठे? मदालसा कुठे आहे?' हें शब्द ऐकताच शत्रुजिताच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. शोकाने कंठ दाटून आला.

'पिताजी! पिताजी!....' असे म्हणून ऋतुध्वजाने एकदम शत्रुजिताचे हात पकडले. 'काय सांगूं बाळ!..... मदालसा गेली! तिला माझे अनंत प्रणाम! या कुळाच्या कीर्तीवर तिने सोन्याचा कळस चढवला.' ऋतुध्वज अवाक् होऊन हें सारें ऐकत होता. 'तुझ्या मृत्यूची वार्ता ऐकताच तिने प्राण सोडला. केवढें अद्भूत प्रेम! खरोखरच ती स्त्री धन्य, कीं जिने माझें कुळ उज्ज्वल केलें. तिच्या मूर्तीची मी दररोज पूजा करतो.'

ऋतुध्वजाला कांहींही सुचेनासें झालें. आता रडून मन हलकेंही करणें शक्य नव्हतें. स्वत:च्या थोड्याशा चुकीपायी त्याला हा घोर अनर्थ सहन करावा लागला होता. त्याची आता खात्री झाली, कीं कोणा तरी राक्षसाने

हें वैर साधलें असेल. दैव तरी किती क्रूर आहे! अशा प्रकारच्या कर्तव्यनिष्ठ जीवांचें साहचर्य त्याला पहावलें नाहीं!

ऋतुध्वजाला त्या राक्षसाविषयी अतिशय चीड आली. परंतु आता त्याचा कांहींही उपयोग नव्हता सात्विकतेचें ढोंग करून हरामखोर लोक किती भयंकर कृत्य करतात याचा त्याला पुरेपूर अनुभव आला होता. त्याचें राज्यकारभारात लक्ष लागेनासें झालें. तो संसारापासून अलिप्त राहून एकाकी जगूं लागला.

ऋतुध्वजाला झालेला हा शोक त्याच्या नागमित्रांना सहन झाला नाहीं. त्यांनी त्याला खूप समजावण्याचा प्रयत्न केला. पुष्कळ आश्वासनें दिली परंतु ऋतुध्वजाचें शोकसंतप्त मन प्रसन्न होण्याचें लक्षण दिसेना.

नागमित्रांनी त्याला दुसरें लग्न करण्याचा सल्ला दिला परंतु त्याचा निश्चय कायम होता त्याने त्यांना एकच जबाब दिला :

'दुसरें लग्न कर असें सांगणारे तुम्ही माझे खरे मित्रच नव्हेत. माझी एकच पत्नी आणि ती म्हणजे मदालसा. या देहावर वडिलांचा व प्रजेचा हक्क आहे. या देहाची आवश्यकता आहे. म्हणून मी त्याचें रक्षण करीत आहे. वस्तुतः माझ्या जीवनातला संपूर्ण रस नष्ट झालेला आहे. मदालसा हीच माझी प्रेरणा होती, माझें सर्वस्व होती. आता माझा आंतला प्राण गेलेलाच आहे. फक्त हा खोका शिल्लक आहे. कर्तव्यासाठीं तो टिकविण्याचा मी प्रयत्न करीत आहे.'

हें सर्व ऐकल्यावर राणी म्हणाली : 'बाळ! इतर सर्व गोष्टी जरी सोडल्या तरी राजवंश टिकविणें तुझें कर्तव्य आहे व त्यासाठीं तुला लग्न करायला हवें.'

'आई! आता मी हा वंश टिकवावा यासारखा दुसरा कोणताही मूर्खपणा नसेल! आई! मला हें निश्चित माहीत आहे कीं स्मृतिकार सांगतात : अत्यंत प्रभावी रक्त असलेला वंश टिकत नाहीं. आवश्यकतेपेक्षा अतिशय तेजस्वी असें आपलें रक्त आहे. त्यामुळेंच तर



भगवंताने आपणा सर्वांमधून मदालसेला उचलून नेली.' त्याच्यासमोर सर्वप्रकारचे कोटिक्रम लंगडेच पडूं लागले.

ऋतुध्वजाच्या नागमित्रांना त्याचे हे कष्ट पहावेनात. ते आपले वडील नागराज अश्वतराकडे आले व त्यांनी मदालसेला यमापासून परत आणावी अशी त्यांना विनंति केली.

नागराज अश्वतर अतिशय पुण्यशील होता. भगवंताच्या दरबारात त्याचें फार वजन होतें. त्याने मनात आणलें तर मदालसेला तो परतही आणूं शकला असता. परंतु अश्वतर म्हणाला : 'बाळा! हा मृत्युलोक आहे. त्याच्यावर यमाची सत्ता चालते. ज्या लोकीचा चंद्रही क्षयी तिथे पामर मानवांची काय कथा?'

'पिताजी! हें सर्व आपणच सांगत आहात ना? हें दुर्बळाचें तत्त्वज्ञान आहे. संपूर्ण जगावर ऋतुध्वजाचे उपकार आहेत. तुम्ही विसरला असाल; पण ऋतुध्वज व मदालसा यांनीच रक्ताचें पाणी करून नागलोकाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिलेली आहे. नागलोकाची प्रतिष्ठा हें ऋतुध्वजाचें कर्तृत्व आहे. खरोखरच या ऋतुध्वजाचे भगवंतावरही उपकार आहेत असें म्हटलें तर त्यात मुळीच अतिशयोक्ति होणार नाहीं. रात्रंदिवस प्रभुकार्यासाठीं ज्याने पूर्ण आयुष्य खर्च केलें व असें असूनही भगवंताजवळ त्याने कधीही मागितलें नाहीं. स्वतःच्या अत्यंत सुंदर व गुणवती पत्नीला भगवंत घेऊन गेला असतानाही ज्याने भगवंताविरुद्ध तक्रारही केली नाहीं, अशा प्रकारच्या महान् कर्तृत्वशाली व्यक्तीला मदालसा नाहीं कां आणून देणार? पिताजी! पिताजी! आपण दुर्बळाची भाषा बोलत आहात. मदालसेला परत आणणें हें आपलें काम आहे आणि ही शक्ति फक्त तुमच्याच ठिकाणीं आहे. तुम्हाला तिला परत आणावीच लागेल.' अशा प्रकारे पुत्रांनी अतिशय लाडिक स्वरात आग्रह धरला.

त्यांच्या आग्रहाला वश होऊन अश्वतर वीणा घेऊन कैलासाला गेला. वीणेच्या तारा छेडीत छेडीत भक्तिभावपूर्ण स्तवन करायला सुरुवात केली. त्याच्या आलापाने कैलासाचें हृदय द्रवित झालें. मृत्युंजय कैलासपति शंकराने स्वतः त्याच्या गाण्यावर मोहित होऊन दर्शन दिलें.

अश्वतर विनवूं लागला : 'भगवंता! ऋतुध्वजावर अशा प्रकारचा अन्याय कां? त्याच्या पत्नीचें सुख आपण कां हरण केलेंत? त्याचा दिव्य संसार का उद्ध्वस्त केलात? ज्यांनी स्वत:च्या सुखावर पाणी सोडून घरोघरी जाऊन लोकांचे संसार सुधारले, भगवंताचें नाव घरोघर नेलें त्या दांपत्यावर अशा प्रकारचा अन्याय? प्रभो! आपण कृपासिंधु आहात. **कर्तुम् अकर्तुम् अन्यथा कर्तुम् समर्थ** आहात. ऋतुध्वजाचें हें दु:ख आपण दूर केलें नाहीं तर कोण दूर करणार? अश्वतराने भगवान् शंकराची मनोभावे प्रार्थना केली.

भगवान् शंकर म्हणाले : 'मनुष्य प्रारब्धाच्या अधीन आहे. त्याचें प्रारब्धच तसें असेल त्याला मी तरी काय करणार?'

'प्रभो! हे आपण बोलता! प्रारब्ध बदलण्याची शक्ति आपल्यातच आहे. आपण ईश्वर आहात. भगवंता! मी भीक मागत नाहीं. सबंध जीवनभर तप केलें आहे. तपाचें गोड फळ मिळतें म्हणून आपण मदालसा परत दिलीच पाहिजे.'

सकलकामकल्पद्रुम भगवान् भक्ताच्या अधीन आहे. त्याचे लाड, त्याची आर्तता, प्रसंगविशेषी धमकी यांनी तो वश होतो. भगवान् शंकर अश्वतराच्या तेजस्वी वाणीने प्रसन्न झाले व त्यांनी मदालसा परत दिली.

मदालसेला घेऊन अश्वतर नागलोकात परत आला. अश्वतराने ऋतुध्वजाला नागलोकात येण्याचें खास आमंत्रण दिलें. कठोर कर्तव्यनिष्ठेमुळें तो कृश झाला होता. पण केवळ मित्रांच्या आग्रहाखातर ऋतुध्वजाने तें आमंत्रण स्वीकारलें.

नागराजाने त्याचें थाटात स्वागत केलें. त्याच्यासाठीं एका मोठ्या समारंभाची योजना केली. ऋतुध्वज यामुळें अतिशय विस्मित झाला व म्हणाला : 'मला या असल्या गोष्टीत रस राहिलेला नाहीं. मदालसा गेल्यानंतर मी निष्प्राण झालेलो आहे. तुम्ही....' हें शब्द उच्चारतो न उच्चारतो तोच समोरून मदालसा येताना त्याला दिसली. पहिल्यापेक्षा



अनेक पटींनी सुंदर, भव्य आणि दिव्य! तो दिङ्मूढ होऊन मदालसेकडे पाहातच राहिला.

अश्वतराने त्याच्या समाधीचा भंग केला : 'ऋतुध्वजा! आजपर्यंत मदालसा स्त्री होती. परंतु ती आता परमेश्वरी प्रसाद झालेली आहे. तिचा तू स्वीकार कर.'

राजन्! मी आपल्या ऋणाची कशी काय फेड करूं? मला आता दुसरें कांहीं नको. प्रभुचरणीं माझी निरंतर वृत्ति रहावी हीच इच्छा. माझी सर्व शक्ति त्याच्या कामीं खर्च व्हावी असा आशीर्वाद द्या.' असें म्हणून ऋतुध्वज नतमस्तक झाला.

'बाळा! तू धन्य आहेस. तुझें लोकोत्तर कर्तृत्व पाहून जगन्नियंत्या प्रभूनेही आपल्या नियमांचा भंग केलेला आहे. स्वत:च्या **अन्यथा कर्तुम्** सामर्थ्याने मदालसेला प्रसाद म्हणून परत दिलेली आहे. तू खरोखरच धन्य आहेस! ती मदालसाही धन्य होय! तुमचें दांपत्य-जीवनही खरोखर स्तुत्य आहे! यावच्चंद्रदिवाकरौ तुमचा जीवनसुगंध लोकांना प्रभुकार्य करण्याची सतत प्रेरणा देत रहावा अशी माझी त्या परम कृपाळू परमात्म्याजवळ प्रार्थना आहे.'

ऋतुध्वज व मदालसा यांच्या पुनर्मीलनाने या गंधवती पृथ्वीचा सुगंध वर्धिष्णु झाला. लोकांची जीवनें त्यांनी प्रभु-कार्याने दिव्य केली. धन्य तो ऋतुध्वज! धन्य ती मदालसा! धन्य तो अश्वतर!



# नभग

सूर्योदयाचा समय होता. नदी खळखळ वहात होती. नदीच्या कांठावर वटवृक्षाखाली एक तेजस्वी, वयोवृद्ध तपस्वी डोळे बंद करून बसले होते. बालरवीचे सोनेरी किरण त्यांच्या दाढीवर पडले होते. त्या तपस्व्यासमोर एक बावीस तेवीस वर्षांचा तरुण हात जोडून उभा होता. त्या तरुणाचें कमावलेलें शरीर त्याच्या शारीरिक चपलतेची साक्ष देत होतें. त्याच्या तोंडावरून त्याची तेजस्विता, भव्यता, तपश्चर्या व विद्वत्ता यांचें दर्शन होत होतें. नतमस्तक होऊन, गुरुजी डोळे उघडतील आणि आपणास दर्शन देतील, याची तो उभा राहून मोठ्या उत्सुकतेने वाट पहात होता.

ह्या अशा पवित्र वातावरणात दूर अपार्थिव सृष्टीत मग्न झालेले गुरुजी, भगवद्भक्तीत लीन झालेले गुरुजी **'मय्येव मन आधत्स्व....'** अशा प्रकारचें गीता-जीवन जगणारे गुरुजी. जेव्हा डोळे उघडतील तेव्हा त्यांची पवित्र झालेली, परम मांगलिक दृष्टि प्रथम माझ्यावर पडावी; या मनोकामनेने त्या पवित्र क्षणासाठीं तो अधीर झाला होता.

गुरुजींनी डोळे उघडताच त्यांची नजर शिष्यावर पडते न पडते, तोच नतमस्तक झालेल्या नभगाने गुरुजींना श्रद्धापूर्वक वंदन केलें.

'काय नभग, कसें काय?' अतिशय प्रेमाने गुरुजींनी नभगाला विचारलें : नभगाने उत्तर दिलें : 'गुरुजी! मी तुम्हाला पुष्कळ दुःख दिलें! तुम्हाला खूप त्रास दिला! तरी पण तुम्ही वडिलांपेक्षा जास्त प्रेमाने मला वाढवलेंत. आज पंधरा वर्षे होऊन गेली. भाऊ, वडील, आई कोणालाच मी भेटलो नाहीं. जर परवानगी द्याल तर त्यांचें दर्शन घेऊन येईन.'

भारतीय संस्कृतीचें हेंच वैशिष्ट्य आहे. आठव्या वर्षी मुलगा तपोवनात धाडायचा. तेव्हापासून गुरुजी त्याचे पालक-पिता होतात. त्या दिवसापासून घराचे, नात्याचे सर्व संबंध तुटतात. त्या दिवसापासून त्याचा घरच्या लग्नात देखील संबंध नाहीं. सोयर-सुतक पण नाहीं. जेव्हा तो



मुलगा तपोवनातून अभ्यास पूर्ण करून घरीं येईल तेव्हाच जे कोणी कुटुंबीय परलोकी गेले असतील त्यांच्या नांवाने स्नान करायचें. अशाप्रकारे तपोवनातल्या दैवी वातावरणात समाविष्ट झालेलें असमंजस बालक, समंजस, तेजस्वी, विद्वान् होऊन बाहेर पडे.

'गुरुजी! घरच्या माणसांना पाहायची इच्छा झाली आहे. परंतु या माझ्या मातीच्या देहाची सोन्याची मूर्ति तयार करणाऱ्या आपल्यासारख्या महान् शिल्पकाराला सोडून जाण्याची कल्पना सहन होत नाहीं!'

'नभगा, तुझें शिक्षण आता पूर्ण झालें आहे. तू तुझें नांव उज्ज्वल केलें आहेस. तुला बघून माझें मन प्रसन्न झालें आहे. माझें अंतःकरण भरून आलें आहे. पंधरा वर्षांपूर्वी तू आलास तो दिवस अजून मला आठवतो आहे. लहानसा तू, तुझ्या वडिलांचा हात धरून येत होतास. मी याच वृक्षाखाली बसलो होतो. तू धावत आलास, मला नमस्कार केलास! नभगा! तुझ्या वडिलांचें मन भरून आलें होतें. तुला माझ्यावर सोपवून ते परत निघत होते. तें दृश्य अजून मला आठवत आहे. त्या वेळचे तुझ्या वडिलांचे शब्द : 'गुरुजी! हा माझा प्राण तुमच्या चरणांवर अर्पण करायला आलो आहे! माझें नांव उज्ज्वल करील, आमचा कुलदीपक होईल असें याला शिक्षण द्या!' नभगा! तुझ्या वडिलांचा तू फार लाडका आहेस. तुझ्यावर ते अतिशय प्रेम करतात. ते मला सांगत होते : मोठे तिघे अजिबात शिकले नाहीत. पण माझा नभग नक्कीच शिकेल! तुम्ही त्याचा प्रतिपाळ करा. माझा मोठा मुलगा इक्ष्वाकु. त्याला मी म्हटलें : तुला शिकलें पाहिजे. पण त्याला तें पटलें नाहीं. तो म्हणाला : मला कशाकरिता शिकलें पाहिजे? तुमची जहागीर आहे, पैसा आहे. तुम्ही माझ्यासाठीं पुष्कळ मिळवून ठेवलें आहे. मला थोडीच पैसे मिळविण्याकरिता शिकलें पाहिजे? मग मी कशाला शिकूं? ... अरेरे! किती क्षुद्र आणि अधःपतित मनोवृत्ति आहे ही! काय पोट भरण्याकरिताच शिकायचें! शिक्षणाची जीवनात हीच किंमत? पशु, पक्षी, कुत्रा, गाढव सर्वच शिक्षणाशिवाय पोट भरूं शकतात. जीवन जगतात, पण मनुष्याला मात्र पोट भरण्यासाठीं शिक्षण घ्यावें लागतें. तर मग पशूपेक्षा मानव हलका! त्याला पोटाकरिता शिक्षण घ्यावें लागतें..... 'नभगा! समाजातला

मोठा वर्ग असा आहे, कीं जो शिक्षणाचें महत्त्व जाणत नाहीं. सद्‌विचार समजण्याकरिता शिक्षण पाहिजे व शिक्षणाद्वारे आपल्या पूर्वजांची संस्कृति समजून घेता येते. सर्व महर्षींनी संस्कृति उभी केली. तिचें स्थैर्य टिकविण्याकरिता कोणकोणते प्रयोग केले ते जाणून घ्यायला हवे. मानव आणि सृष्टि यांचा संबंध काय? मानव आणि ईश्वर यांचा संबंध कशा प्रकारचा? हें सर्व जाणण्याकरिता शिक्षणाची आवश्यकता आहे. मी कोण? मी कोठून आलो? मला कोठे जायचें आहे? कशा प्रकारे जाऊं शकेन?..... या सर्व प्रश्नांचा विचार करता करता जें मिळतें तें शिक्षण! फक्त पोट भरण्याकरिता शिक्षण ही असंस्कारिता आहे, जंगलीपणा आहे. यासाठींच तुझे वडील तुला इथे घेऊन आले होते. तुझी शिक्षण घेण्याची दृढ इच्छा बघून तुझ्या वडिलांचें हृदय भरून आलें होतें. तुझ्या हिताकडे पाहून तुझा सर्व भार माझ्यावर टाकून तुझे वडील परत गेले.'

गुरुजींच्या गोष्टी ऐकत नभग भूतकाळात मग्न होऊन उभा होता. भरलेल्या अंत:करणाने वडिलांनी दिलेल्या निरोपाची आठवण त्याने मनात घोळवली. वडिलांचे अश्रूंनी भरलेले डोळे त्याने पाहिले. नभगाच्याही डोळ्यांत त्यावेळी अश्रू होते. आज पंधरा वर्षांनी तेच पुनरावर्तन! तशाच प्रकारचा हृदयंगम वियोग! तशाच प्रकारच्या वियोगाचें दु:ख!

गुरुजींच्या डोळ्यांत अश्रू आले. शिष्याचे डोळेही भरून आले. पंधरा वर्षांतील हें प्रेमाचें वातावरण-निसर्गाचें सौंदर्य, तपोवनातील शांति व भव्यता हें सर्व सोडून जायचें होतें. 'नभगा! तुझ्यामुळेंच इथे खरें तपोवन शोभत आहे. इथे तू स्वत: शिकतोस व दुसऱ्यांना शिकवतोस. अशा प्रकारच्या शिक्षणाची पद्धति तू चांगल्या तऱ्हेने आत्मसात् केली आहेस. तू सर्व खेड्यापाड्यात जाऊन लोकांना दिव्य जीवन दिलेंस. सांस्कृतिक जीवन कसें जगावें याचे पाठ दिलेस. तुझें जीवन धन्य आहे! तुझा ब्रह्मचर्याश्रम धन्य आहे!'

'तू जा!' हें सांगत असताना गुरुजींचे डोळे पाण्याने भरून आले. गुरुजी नभगाला 'जा' पण म्हणूं शकत नव्हते आणि ठेवूं पण शकत नव्हते. तसेंच नभग जाऊं पण शकत नव्हता आणि शिक्षण पूर्ण



झाल्यामुळें राहूं पण शकत नव्हता. किती तरी वेळ या अशा मौन मनोव्यथेत निघून गेला. शेवटी गुरुजींनी बोलायला सुरूवात केली.

'तू सर्व शिक्षण पूर्ण करून आज जायला निघाला आहेस. माझ्याकडून तुला कधीं कटु बोललें गेलें असेल तर तें सर्व विसरून जा. मला विसरलास तरी चालेल. परंतु नभगा! जीवनाचे सिद्धांत विसरूं नकोस. ईश्वराला विसरूं नकोस.'

शिष्याचे डोळे अश्रूंनी भरून आले. 'गुरुजी! तुम्ही कधी मला कटु बोललातच नाहीत. मला तुमचें बोलणें सदैवच गोड लागत होतें. मी माझ्या चामडीचे जोडे करून तुमच्या पायात घातले तरी तुमचे पांग फिटणार नाहीं. तुमच्या चरणांजवळ बसून मी जीवनाचे पाठ शिकलो आहे.'

'तुम्ही मला निरतिशय प्रेम दिलेंत. त्याची लक्षांशाइतकीही परतफेड मी करूं शकणार नाहीं. तुम्ही मला जीवनाचें अलौकिक शिक्षण दिलें आहे. तें सर्व जीवनात कसें उतरवूं या विवंचनेत मी आहे!.... एक दिवस गुरुजी! तुम्ही सर्व विद्यार्थ्यांना घेऊन बसला होतात. प्रश्नोत्तरी चालली होती त्याच वेळेला आपल्या राज्याचा राजा इथे आला. परंतु तुम्ही त्यावेळेला राजाकडे लक्ष दिलें नाहीं. तुम्ही शिकविण्यात तल्लीन राहिलात. केवढी तेजस्विता ही! परंतु चार दिवसांनी गांवातील सावकार आला. तुम्ही त्याचें आगतस्वागत केलेंत, कुशल विचारलेंत. तेव्हा मी साधारणत: बारा तेरा वर्षांचा होतो. माझ्या बाल-बुद्धीला या कृतीचें गूढ उकललें नाहीं. तुम्ही एवढ्या मोठ्या राजाचें स्वागत केलें नव्हतेंत आणि सावकाराचें केलेंत. तेव्हा तुम्ही सांगितलें होतें : श्रीमंताच्या वैभवाने दिपून जाणें योग्य नाहीं. त्याचप्रमाणे त्यांचा अपमान न करता योग्य आदरातिथ्य केलें पाहिजें. ही सर्व गेल्या जन्मातील योगभ्रष्ट माणसे आहेत. **शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते....** तुम्ही म्हटलेंत : राजा आला तेव्हा **मी** नित्यकर्म करीत होतो. विद्यार्थ्यांजवळ बसलो होतो. पण जेव्हा **सावकार** आला तेव्हा मी एकटा होतो. रिकामा होतो. आणि म्हणूनच **मी** सावकाराचें स्वागत केलें. या व अशा प्रकारच्या जीवनातल्या कितीतरी

गोष्टी तुम्ही मला समजावून दिल्या आहेत. हें सर्व शिकवणाऱ्या माझ्या गुरुजींना मी विसरूं? गुरुजी! विचारायला धीर होत नाहीं पण पुष्कळ दिवस ज्या दिवसाची वाट पहात होतो, तो दिवस आज आला आहे. आपणाला गुरुदक्षिणा द्यायची आहे. तेव्हा आपल्या चरणांवर काय अर्पू?'

'नभगा! मी तुला ज्ञान दिलें. जीवन-पाठ दिले. त्याप्रमाणे जगून, आचरण करून वागलास म्हणजे मला गुरुदक्षिणा मिळाली असें समज. तू तेजस्वी आहेस. तुझें जीवन सुंदर झालें आहे. तेव्हा तुझ्या जीवनाचा झरा निर्भयपणे अखंड वाहून लोकांना ज्ञान देणारा होवो म्हणजे मी संतोषी होईन! आणि एका बाबतीत खास लक्ष ठेव; तें म्हणजे :

**धैर्यं यस्य पिता क्षमा च जननी शान्तिश्चिरं गेहिनी।**
**सत्यं सूनुरयं दया च भगिनी भ्राता मनः संयमः।।**
**शय्या भूमितलं दिशोऽपि वसनं ज्ञानामृतं भोजनम्।**
**एते यस्य कुटुम्बिनो वद सखे कस्माद्भयं योगिनः।।**

परमेश्वराशी तुला संबंध बांधयचा आहे ना? मग तुला पुष्कळ धीर धरला पाहिजे. जे बिघडले आहेत त्यांच्यावर न रागावता क्षमादृष्टीने बघायला शीक. आज समाज रोगी झाला आहे. तुला या सामाजिक रोगावर औषध द्यायचें आहे. सद्गुणांचा प्रचार करायचा आहे. नभगा! रोगाचा प्रसार लवकर होतो पण सद्गुणांचा प्रचार करावा लागतो. क्षयाच्या माणसाजवळ बसताच लगेच क्षयाचे जंतु आपल्या शरीरात जातात, पण कुठल्याही सशक्त माणसाजवळ (मल्लाजवळ) बसून मनुष्य सशक्त होत नाहीं. सशक्त (मल्ल) होण्याकरिता त्याला मेहनत करून, पौष्टिक खाणेंच खावें लागतें. त्याचप्रमाणे सद्गुण लोकांच्या जीवनात यावेत, समाज सुधारावा याकरिता आटोकाट प्रयत्न करावे लागतात आणि हें करणें म्हणजेच प्रभुकार्य ! म्हणून तें तू कर.'

'गुरुजी! आज सर्वत्र आसुरी वृत्ति वाढली आहे. तिचा नाश करून सात्त्विक विचार प्रस्थापित करणें किती कठीण काम आहे, हें थोड्याशा विचारानंतर लगेच लक्षात येण्यासारखें आहे आणि अशा कामाकरिता



वित्तशक्तीची आवश्यकता आहे, हें काय मला समजत नाहीं? गुरुदक्षिणा द्यावी अशी माझी तीव्र इच्छा आहे. तिचा तुम्ही स्वीकार करावा.'

'बाळ! काम तर चालूच आहे. परमकृपाळू भगवान् तें सांभाळतोच आहे, त्याच्या शक्तीनेच सर्व चालूं आहे.' असें बोलत गुरुजी उभे राहिले आणि 'भगवान् तुला सुखी करील.' असा आशीर्वाद देऊन गुरुजींनी तोंड फिरवलें. शिष्य नतमस्तक झाला आणि जाणाऱ्या गुरुजींकडे अनिमेष नेत्रांनी पहात राहिला.

अश्रुपूर्ण नेत्रांनी नभगाने आश्रमाचा निरोप घेतला. रस्त्यातून चालता चालता गुरुजींनी शिकविलेला भक्तिपाठ त्याच्या डोळ्यांसमोर आला. किती सरळ व सुंदर शिकवण होती गुरुजींची! ईश्वराजवळ चित्त एकाग्र करून बसणें ही आंतरभक्ति आणि घरोघरी, आबालवृद्धांपर्यंत सद्विचार पोचविणें ही बहिर्भक्ति व दोन्ही मिळून प्रभु-कार्य.

हा विचार करता नभग एका आश्रमाजवळ येऊन पोचला. आश्रमातील आचार्य आश्रमात बसले होते. त्यांना वंदन केलें. नभगाच्या चेहऱ्यावरील अप्रतिम तेज पाहून आचार्यांनी विचारलें : 'स्नातका, तुझें नांव काय?' 'माझें नाव नभग' तो म्हणाला . 'काय! तूच तो नभग!'

आचार्यांचें हृदय भरून आलें. त्यांनी प्रेमाने त्याला जवळ घेतलें व ते म्हणाले : 'तू आता इथेच रहा. तुला मी आता माझ्या आश्रमातून जाऊ देणार नाहीं.'

नभगाची कीर्ति व जीवन-सौरभ आधीच तिथे येऊन पोचला होता. आचार्यांनी खूप आग्रहाने व प्रेमाने त्याला आश्रमात ठेवून घेतला.

नभगाने ज्ञान मिळविलें होतें आणि पचवलेंही होतें. रात्री त्याने सुंदर प्रवचन केलें. त्याच्या शब्दाशब्दांतून जीवनाचा साक्षात्कार प्रतिबिंबित होत होता. प्रवचन आटोपताच सर्वजण आपापल्या मार्गाने निघून गेले. तेव्हा नभग पण उठला आणि मुख्य आचार्यांच्या घराकडे निघाला. तिथे वाटेत एका झाडाखाली एक वृद्ध गृहस्थ बसले होते. अनिमेष नेत्रांनी ते

नभगाकडे पहात होते. नभग जवळ येताच ते उठले व धावत येऊन नभगाला त्यांनी आलिंगन दिले. ते म्हणाले : 'बाळ नभगा....' त्यांचे डोळे पाण्याने डबडबले. कंठ दाटून आला.

नभगाने स्वत:च्या वडिलांचा आवाज ओळखला. तो आश्चर्यचकित झाला. 'पिताजी तुम्ही इथे कसे? भाऊ कुठे आहेत? सर्व खुशाल आहेत ना?' अशा प्रकारे त्याने प्रश्नांचा वर्षाव केला.

'काय सांगूं?' दाटलेल्या कंठाने ते बोलूं लागले. तिन्ही मुलगे खुशाल आहेत. पण शेणातील किड्यांसारखें जीवन जगताहेत. बकऱ्यासारखे राहात आहेत. अरेरे! माझे मुलगे आणि उकिरड्यातील किड्यासारखें जीवन जगताहेत! बाळा नभगा, हें काय जीवन आहे? लहानाचे मोठे झाले, लग्न झालें, भोग भोगले, झोपले उठले परत झोपले! हें काय जीवन म्हणायचें? मला स्वत:विषयीच घृणा उत्पन्न झाली. मी घरदार सोडून इथे आश्रमात येऊन राहिलो. प्रभु-भजनात ईश्वरचिंतनात बाकीचे दिवस काढायचे असें मी मनोमन ठरविलें आहे. जेव्हा जेव्हा मी तुझें यशोगान ऐकतो तेव्हा तेव्हा माझी छाती अभिमानाने फुलून येते. तुझी सद्बुद्धि वाढावी, तू व्यापक व्हावेंस या करिता ईश्वराची रोज प्रार्थना करतो आणि आज तर तुझें असें मुंग्ध करणारे प्रवचन ऐकून मी धन्य झालो आहे. धन्य आहे तुझी आई कीं जिच्या पोटी तुझा जन्म झाला. धन्य झालें आपलें कुळ, कीं ज्यामध्ये तुझ्यासारख्या रत्नाचा जन्म झाला.'

**कुलं पवित्रं जननी कृतार्था।**
**वसुंधरा पुण्यवती च येन।।**

प्रमुख आचार्य हें सर्व ऐकत होते. ते त्या वृद्धाला प्रेमाने रागे भरूं लागले : 'तुम्ही मला कधी सांगितलेंत पण नाहीं कीं नभग तुमचा मुलगा आहे. नभगाच्या वडिलांना यापेक्षा किती तरी सन्मानाने आम्हाला ठेवलें पाहिजे होतें.'

तो वृद्ध म्हणाला : 'मी समजून आहे कीं नभगाचे हे गुण, त्याच्या या जीवन-सौरभात माझा कांहींही वाटा नाहीं. तो सर्व भाग त्याच्या



गुरुजींचा आहे. जर हे संस्कार मीच त्याच्यात ओतले असते तर माझे बाकीचे तीन मुलगे असे कां बनले असते? मी फक्त त्याला जन्म द्यायला निमित्त आहे आणि जन्म देण्यामध्ये असें काय कर्तृत्व आहे?'

'तुमची ही निरहंकारिताच त्याच्या पितृत्वाचा मान घ्यायला योग्य आहे. म्हणूनच तुम्ही त्याचे वडील शोभता.'

आचार्यांनी त्यांना वंदन केलें व ते आपल्या कार्याला निघून गेले. ते पिता-पुत्र त्याच झाडाखाली बसले, वडिलांचे पाय धरून नभग रडला. अश्रूंनी त्यांचे पाय धुतले. स्वत:च्या वडिलांची काय ही स्थिति! घराला कंटाळून वडिलांना आश्रमात येऊन रहावें लागावें! या विचाराने तो अस्वस्थ झाला.

तो म्हणाला : 'बाबा! तुमच्या आशीर्वादाने आणि ईश्वराच्या कृपेने मी माझें जीवन सार्थक करण्याचा प्रयत्न करीत आहे. तुम्हाला नमस्कार केल्याशिवाय एकही दिवस जेवलो नाहीं. नित्य-प्रेमाने तुमची मानसपूजा करीत होतो. आज प्रत्यक्ष भेटीचा सुयोग प्राप्त झाला. बाबा! एक गोष्ट विचारूं कां? आपली सांपत्तिक स्थिति चांगली आहे. आपण श्रीमंत आहोत असें मी आजपर्यंत ऐकत आलो आहे. मला आता गुरुजींना गुरुदक्षिणा द्यायची आहे म्हणून विचारतो.'

'पुष्कळ जमीन आहे. पैसा आहे पण तो सर्व सोडून मी विषादाने इथे येऊन राहिलो आहे. तू घरी जा आणि तुझा भाग घेऊन तू गुरुजींना गुरुदक्षिणा दे.'

वडिलांचें सर्व भाषण ऐकून, त्यांना नमस्कार करून नभग म्हणाला 'मी घरी जातो. तुम्हाला नमस्कार करायला लवकर परत येईन.'

नभग गांवाच्या वेशीजवळ आला. जुन्या स्मृतींना उजाळा मिळाला. हेंच तें वडाचें झाड. इथे आम्ही लपंडाव खेळत असूं. नदीच्या पात्रात उड्या मारीत असूं. अशा जुन्या आठवणींची उजळणी करीत तो घरीं आला.'

'ओहोहो! कोण नभग!' सर्वात वडील भाऊ इक्ष्वाकु धावत आला. नभगाला प्रेमाने भेटला. 'काय खुशाल आहेस ना? वाहवा रे बंधो! तू तर फारच प्रसिद्ध झालास! धन्य आहेस तू आणि धन्य आहे आपलें कुटुंब कीं ज्यात जन्मून तू सर्वांना धन्य केलेंस! तू घरी आलास हें फार चांगलें केलेंस.' कुटुंबांतील सर्वांना बोलावून त्याने त्याची ओळख करून दिली. नभग शिकायला गेल्यानंतर त्याच्या कुटुंबात बरीच मोठी वाढ झाली होती. सर्वांनी प्रेमाने गप्पा-गोष्टी केल्या. भोजन झालें. वामकुक्षी करता करता नभग मनातल्या मनात विचार करीत होता, कीं भावांबरोबर आपल्या भागाविषयीं कसा विषय काढावा? इतक्यात बाजूच्या खोलीत वहिनी चर्चा करीत होती, ती त्याने ऐकली. ती आपल्या नवऱ्याला विचारीत होती : 'या लहान भावाचा भाग तुम्ही खाऊन बसला आहात. आता त्याने विचारलें तर तुम्ही काय उत्तर द्याल? तो आपला भाग थोडाच सोडणार आहे!'

भावाने उत्तर दिलें : 'अग, जा, जा! भाग मागणाराचें तोंड तर बघ! तो बुवा झाला आहे बुवा! त्याला काय करायचा आहे भाग? त्याला अस्सा बनवतो! तू नुसती बघत बस.' आणि इक्ष्वाकूने टाळी वाजविली.

नभगाचें अंत:करण फाटून गेलें. त्याला कल्पना नव्हती कीं आपला दादा इतक्या हलक्या मनोवृत्तीचा असेल. त्याचें मन इतक्या विषाने भरलेलें असेल. **मधु तिष्ठति जिह्वाग्रे हृदये तु हलाहलम्।** वडिलांच्या बोलण्यातील खरेपणा त्याच्या अनुभवास आला.

त्याच्या मनात भाऊ-भावजयीविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला. संध्यासमयीं सर्वजण एकत्र बसलें तेव्हा नभगाने स्वत:च्या भागाचा विषय काढला. 'नभगा, चार वर्षांपूर्वी ही सर्व जमीन व्याजाबद्दल दुसऱ्याला दिली आहे.' इक्ष्वाकु म्हणाला.

'दादा, म्हणूनच मी म्हणतो आता माझा भाग दे.'

'नभगा! तू आता पुष्कळ शिकलास, तत्त्ववेत्ता झालास, आदरणीय झालास. आता तुला या सर्व गोष्टींची काय जरूर? याची आमच्यासारख्या क्षुद्र, संसारी, पामर जीवांना जरूरी आहे.' दुसरा भाऊ म्हणाला. इक्ष्वाकूने त्याचें समर्थन केलें.



'आम्ही तुझा भाग आधीच काढून ठेवला आहे. त्यात सौजन्यमूर्ति असे आपले पिताजी तुझ्या वाट्याला आले आहेत. त्यांना तू घे.' तिसऱ्याने उत्तर दिलें.

नभग मनात म्हणाला : हे मला फसवून सर्व घशात घालून बसले आहेत. आता गुरुजींना दक्षिणा काय देऊं? तो विचारात पडला. समोर त्याची वहिनी आली. तिला त्याने विचारलें : 'वहिनी, ही सर्व वाटणी झाली तेव्हा तुम्ही हजर होता ना? मग तुम्ही मध्ये पडून माझी वाटणी कां काढलीत नाहीं?' वहिनी म्हणाली : 'अहो, मी होते म्हणूनच तुमचा भाग काढला गेला. त्यांत तुमचे वृद्ध पिता तुमच्या वाटणीला आले.' नभग समजला. जसे भाऊ तशी भावजय. या घरात अन्न सेवन करणें म्हणजे विष सेवन करण्यासारखें आहे. आता यापुढें एक क्षण देखील इथे थांबणें नाहीं. जिथे भगवंताचा निवास दिसत नाहीं तिथे पिशाच्चें राहतात. मी इथे राहूं कसा?

त्याने आपलें सामान उचललें आणि तो चालूं लागला. समोर धाकटा पुतण्या दिसला. त्याला नभग म्हणाला : 'तू तरी परमेश्वराला विसरूं नकोस. माझा जो हिस्सा या भावांनी गिळंकृत केला आहे तो सर्व ईश्वरासाठीं सांस्कृतिक कामांसाठीं, ऋषि-मुनींसाठीं तू खर्च कर.' आणि रिक्त हस्ताने तो तसाच परत गेला.

नभग आश्रमात आला. वडिलांच्या पायां पडला. वडिलांनी विचारलें : 'तुझा भाग तुला मिळाला ना?'.

'होय बाबा! माझ्या वाटणीला खूप मोठा आणि अमूल्य हिस्सा आला आहे. माझा भाग माझ्या समोरच आहे. माझे बाबा हाच माझा भाग! जे भाऊ दुनियेला फसवतात, वडिलांना फसवतात, भगवंताचा हिस्साही खातात, ते काय लहान भावाला भीतील?'

वडील म्हणाले : 'नभगा! दुःखी होऊं नकोस.'

'नाहीं बाबा! मी मुळीच दुःखी होत नाहीं. भाऊ असे वागले नसतें तर या वृद्धपूजेचें सद्भाग्य मला कुठून लाभलें असतें? माझें गेल्या जन्मीचें पुण्य म्हणून तुमची सेवा करण्याची संधि मला मिळाली.'

'नभगा! तुला अधिक काय सांगूं? प्रत्येक तरुण तारुण्याच्या नशेत हें विसरतो आहे कीं त्याला पण एकदा वृद्ध व्हायचें आहे आणि म्हातारा झाल्यावर त्याची पण तशीच उपेक्षा होणार! नभगा, यामध्ये मुलाचा काय दोष? सर्व समाजच उपयुक्ततावादी बनला आहे. तेव्हा हे तरी त्यातून कसे वेगळे राहतील? बैल शेत नांगरून धान्य पिकवितात पण त्यांच्याने काम करवत नाहींसे होताच आपण त्यांना कसायाला विकतो. इतकें तरी ठीक कीं मला विकायला नाहीं काढलें!'

वडिलांचें सर्व ऐकून नभग म्हणाला : बाबा! आता मी काय करूं? शेती करूं? व्यापार-धंदा करूं की काय करूं? कारण मला गुरुजींना गुरु-दक्षिणा द्यायची आहे.'

'तुला शेती करायची नाहीं आणि धंदा-उद्योग पण करायचा नाहीं. हें करण्याचा तू मनात विचार पण करूं नकोस. ईश्वर तुझी इच्छा पूर्ण करील.'

* * * * *

एके दिवशीं प्रातःकाळी नदी-किनाऱ्यावरील गर्दी पाहून नभगाच्या वडिलांनी एका ब्राह्मणाला विचारलें : 'आज एवढी गर्दी कसली?'

'अरे बाबा, काय करावें? या यज्ञाबद्दल मोठी काळजी उत्पन्न झाली आहे. राजा हा यज्ञ करीत आहे. पण शेवटच्या दिवशीं सर्व ब्राह्मण मंत्र विसरून जातात आणि यज्ञ पुराच होत नाहीं. राजा तर यज्ञ पुरा करण्याची प्रतिज्ञा करून बसला आहे.'



तो यज्ञ नभगाने पुरा केला. राजा संतुष्ट झाला व अपरंपार संपत्ति त्याने नभगाला दक्षिणा म्हणून दिली. नभगाने तो सर्व पैसा गुरुदक्षिणा म्हणून अर्पण केला. आणि प्रतिज्ञा केली, कीं मी जे कांहीं द्रव्य मिळवीन तें सर्व ईश्वराच्या कामाकरता वापरीन. ईश्वराने मला जी बौद्धिक, शारीरिक संपत्ति दिली आहे तिचा मी त्याच्याच कामीं उपयोग करीन.

अशाप्रकारे नभग गुरुभक्तीने, पितृभक्तीने व शिवभक्तीने देवाच्या पंक्तीला जाऊन बसला. नभगाच्या या गुरुभक्तीला व पितृभक्तीला माझे शतशः प्रणाम.

□□□□□

# उत्तम

उत्तानपाद राजाला दोन राण्या होत्या. एकीचें नाव सुरुचि व दुसरीचें नाव सुनीति. सुरुचीच्या मुलाचें नाव उत्तम व सुनीतीच्या मुलाचें ध्रुव.

ध्रुव बालभक्त होता. दैवी जीवन जगणारा तो देव झाला. लोकांच्या हृदयात अढळ स्थान मिळवून त्याने शाश्वत कीर्ति मिळविली. आज ध्रुवाविषयीं आपणा सर्वांना बरीच माहिती आहे. परंतु त्याच्या सावत्र भावाविषयीं - उत्तमाविषयीं आपल्याला फारशी माहिती नाहीं. ध्रुवाचें जीवन अतिशय प्रकाशित झालें व त्या प्रकाशित जीवनापुढें उत्तमाचें जीवन अंधारात राहिलें.

उत्तम एक आदर्श राजा होता. स्वत:चा भाऊ बालभक्त झाला, त्याला अढळपद मिळालें याचा त्याला अभिमान वाटत असे. ध्रुवामुळें आपण मोठें झालो आहोत, असें त्याला वाटत असे. उत्तमाच्या राज्यात सज्जनांना प्रतिष्ठा होती. दुर्जन भीतीने थरथर कापत असत. धर्म तेजस्वी स्वरूपात अस्तित्वात होता. उत्तम स्वत: शूर, कर्तृत्ववान्, धर्मरत आणि प्रजारक्षक होता. संस्कृतीविषयीं त्याला प्रेम होतें व स्वत: संस्कृतीचा प्रचार करीत असे. ईश्वर-कृपेने त्याला सर्व प्रकारची अनुकूलता होती. फक्त त्याची पत्नी बहुला त्याला अनुकूल नव्हती. भगवान् मोठा नाटकी आहे. केव्हा केव्हा लोकांची गंमत करण्याची त्याला लहर येते. संसारात सर्व कांहीं देतो पण एखादी अशी उणीव ठेवतो, कीं त्यामुळें संसार असार वाटतो. कधी पत्नी सुंदर तर पति कुरूप, तर कधी पति सुंदर पण पत्नी कुरूप. कांहीं ठिकाणी दोन्ही अनुरूप असली तर घरात अठरा विश्वें दारिद्र्य! भगवंताची लीला अशी विलक्षण आहे! प्रभूने उत्तमाला सर्व कांहीं दिलें परंतु पत्नी मात्र अनुकूल दिली नाहीं. दोघांचा स्वभाव अगदी एकमेकांच्या विरुद्ध होता. बहुला सुंदर होती, चलाख होती, हुशार होती पण पतीशी तिचें कधीही पटत नसे.



संसारात पति-पत्नींच्यात बेबनाव झाला तर त्या संसाराची धुळधाण होते. तो उद्ध्वस्त होतो. संसार विषवत् वाटतो. पति दमून भागून घरात आल्यावर पत्नीचा चेहरा जर क्रुद्ध झालेला असला, चूल थंड असली तर पतीला दु:ख नाहीं कां होणार? उत्तमाची अशीच अवस्था होती. उत्तम प्रेमाने तिला जितका समजवण्याचा प्रयत्न करी तितकी तितकी बहुला उलटाच अर्थ घेई. तिला त्यामुळेंच उत्तमाचा सहवास नकोसा वाटे. उत्तमाच्या वागण्यात मार्दव दिसलें, कीं तिला वाटायचें : उत्तम स्त्रैण झालेला आहे. उत्तम तिला वारंवार सांगे : 'असें वागणें तुला शोभत नाहीं. तू इतकी संस्कारी असून असें वागणें तुला बरें दिसतें कां?' पण या सर्व उपदेशाचा परिणाम पालथ्या घड्यावर पाणी ओतल्यासारखा होई.

एकदा उत्तमाकडे त्याचे बालपणीचे कांहीं मित्र आले. उत्तमाने त्यांचें मोठ्या थाटामाटात स्वागत करावयाचें ठरविलें. परंतु बहुलेने त्याला साफ नकार दिला. उत्तमाला अतिशय वाईट वाटलें. माझ्या बाळपणीचे माझे मित्र किती प्रेमाने मला भेटायला आलेले आहेत! आणि बहुला त्यांना सामोरा यायला देखील नकार देते आहे! स्वागतासाठीं यायचें तर दूरच राहिलें! या विचाराने उत्तम अतिशय अस्वस्थ झाला. मित्रांचा स्नेह आणि आपुलकी बहुलेला कुठून कळणार? त्याने बहुलेला बोलावण्यासाठीं दासीला धाडलें. पण बहुलेने स्पष्ट नकार कळवला! रोजरोजच्या विरोधाने उत्तम अत्यंत कंटाळून गेला होता. त्यात आजचें बहुलेचें वर्तन पाहून तो पुष्कळ दु:खी झाला. पुन्हा एकवार त्याने बहुलेला बोलावणें पाठवलें पण बहुलेने निरोप धाडला कीं नोकरांना काय तोटा आहे; ते सर्व सांभाळतील. मी कांहीं यायची नाहीं! बहुलेला पुन्हा एकवार बोलावण्याचा प्रयत्न केला पण ती आलीच नाहीं.

उत्तमच्या संयमाचा बांध आता फुटला होता. या विरोधाला आता तो पूर्णपणे कंटाळला होता. दुसऱ्या दिवशीं बहुलेला वनात सोडून देण्याची त्याने प्रधानाला आज्ञा केली.

राजसेवक बहुलेला वनात सोडून आले. कालची राणी आज भिकारीण झाली होती. सुखसमृद्धीत लोळणारी, दासदासींवर अधिकार

गाजविणारी व ऐषआरामात राहणारी बहुलाराणी आज अमावास्येच्या काळ्या कभिन्न रात्री एका झाडाखाली परित्यक्ता बनून बसली होती, एक सामान्य स्त्री झाली होती. माणसाचें उद्या काय होईल हें निश्चितपणे कोणी सांगूं शकेल काय? अहो! श्रीरामाबद्दलही म्हटलें आहे ना —

**जामाता पुरुषोत्तमो भगवती लक्ष्मीः स्वयं कन्यका।**
**दूतो यस्य बभूव कौशिकमुनिः यज्वा वशिष्ठः स्वयम्।**
**दाता श्रीजनकः प्रदानसमये चैकादशस्थाः ग्रहाः**
**किं ब्रूमो भवितव्यतां हतविधे रामोऽपि यातो वनम्।।**

स्त्रीचें यापेक्षा दुःखमय जीवन तें कोणतें असणार? परित्यक्ता म्हणून जीवन कंठणें किती कठीण असेल! परंतु भगवंत खरोखरच इतका दयाळू आहे कीं तो केवळ दुःख देऊन थांबत नाहीं, त्याच्याबरोबर दुःख सहन करण्याची शक्ति सुद्धा देतो. जर अशा प्रकारची शक्ति नसती तर बहुलेला या अवस्थेतील जीवन कंठणें शक्य नव्हतें.

बहुलेला या घटनेमुळें उत्तमाचा अतिशय राग आला. परंतु जसजसे दिवस जाऊं लागले तसतसा तिचा क्रोध कमी कमी होत गेला. दुसऱ्या दिवशीं सकाळी उठली व पहाते तो समोर एक झोपडी! त्या झोपडीत भिल्लाचें एक जोडपें राहात होतें. मोठें आनंदात होतें तें जोडपें. यावेळी बहुला अंतर्मुख झाली होती. तिचें विचारचक्र सुरू झालें. यांच्या जीवनात स्वास्थ्य आहे, आनंद आहे पण राणी असूनही माझ्या संसाराची धुळधाण झाली! मी उत्तमाच्या विचारांशी एकरूप सुद्धा होऊं शकलें नाहीं. आपत्तीत माणसाला साहजिकच भूतकाळाचें स्मरण होतें. भूतकाळातील मधुस्मृती माणसाला सुखवीत असतात. बहुलेला लग्नाचा दिवस आठवला. त्यावेळी घेतलेली प्रतिज्ञा आठवली. स्वतः जिथे दीक्षा घेतली तो गुरूचा आश्रम आठवला. गुरूचें स्मरण झालें. गुरूचें भव्य आणि दिव्य जीवन डोळ्यांसमोर तरळूं लागलें. आश्रमीय ऋषी दुष्टांनाही क्षमा करून त्यांना आपलेंसें करीत असत. पण ते कोठे नि मी कोठे! उत्तम, माझे पति किती उत्कृष्ट आहेत. एखाद्या भाग्यवतीच्या नशिबींच असल्या प्रकारच्या पतीचा लाभ होत असतो. माझ्या हातीं आलेलें रत्न मी मूर्खपणाने



गमावलें त्यांच्या प्रेमाचा मी अव्हेर केला. 'तुम्ही सांगितलेलें मी ऐकणार नाहीं.' असें सांगून उद्धटपणाने मी माझ्या संसाराची होळी केली.

तिथेही बहुलेचा त्याग केल्यानंतर त्या घटनेने उत्तमही अस्वस्थ झाला. दरबारातील जे तोंडपुजे लोक होते ते म्हणाले : 'महाराज! आपण अगदी योग्य केलेंत. राणीसाहेबांना असाच धडा मिळायला हवा होता.' केलें हें योग्य की अयोग्य याचा उत्तम निर्णय करूं शकला नव्हता. दिवसामागून दिवस कसे तरी जात होते. परंतु प्रजापालनात मात्र तो कसूर करीत नव्हता. त्याचे नित्याचे कार्यक्रम बिनचूकपणे पार पाडले जात होते. एके दिवशीं त्या प्रजापालनदक्ष उत्तम राजाकडे एक अग्निहोत्री ब्राह्मण फिर्याद घेऊन आला.

ब्राह्मण - राजा तुझ्या राज्यात संपूर्ण अंधार आहे. तुझा राजदंड दुबळा आहे. त्यामुळें दुर्जनांचें चांगलेंच फावलें आहे. माझा संसार आज भंग पावला आहे. माझी पत्नी एका दुष्टाने पळविली आहे. मला माझी पत्नी परत मिळायला हवी.

उत्तम - महाराज! हें तर माझें कर्तव्य आहे. तुम्ही घाबरूं नका. मी निश्चितच तुमच्या पत्नीला शोधून आणून तुमच्या स्वाधीन करीन. पण तुमची पत्नी कशी आहे? तिला ओळखायची खूण काय?

ब्राह्मण - तिला ओळखणें अगदी सोपें आहे. ती भांडखोर आहे. इतकेंच नव्हे तर माणूस भेटला नाहीं तर वाऱ्याशीही भांडत बसेल, असा तिचा स्वभाव आहे. ती नुसती कुरूप नाहीं; आठ ठिकाणी वाकडी पण आहे. शिवी दिल्याशिवाय तिला बोलताच येत नाहीं.

उत्तम - महाराज! अशा प्रकारची पत्नी तुम्हाला काय सुख देत असेल हो! अशा पत्नीला पळवून नेली म्हणजे तुमची कटकट गेली! फार छान झालें!

ब्राह्मण - पत्नी नाहीं मग माझ्या गृहस्थाश्रमाला अर्थ काय?

उत्तम - मी तुम्हाला दुसरी एखादी छानशी मुलगी दाखवतो व लग्न करून देतो.

ब्राह्मण - राजा! नीतीविरुद्ध, अशा प्रकारचें असंस्कारी जीवन मी जगणार नाहीं. मी ब्राह्मण आहे. माझ्या हातून तरी अशा प्रकारचा अधर्म होणार नाहीं. हें माझें ब्राह्मणाचें जीवन फार तर पन्नास वर्षांचेंच आहे पण शेकडो लोकांना माझ्यानंतरही जगायचें आहे. पन्नास वर्षांपर्यंत परमेश्वराने ही सोबतीण मला दिली. तिला सोडलें तर मी प्रभूच्या दरबारात द्रोही होईन. म्हणून माझ्या हातून असलें अनीतीचें वर्तन होणार नाहीं. माझ्या हातून अनीति घडली तर समाजाच्या संस्कृतीचें काय होईल? आणि माझें पाऊल वेडेंवाकडें पडेलच कसें? दुसरें लग्न करणें ही कल्पनाच मला योग्य वाटत नाहीं. राजा! तुझ्यात सामर्थ्य असेल तर माझी पत्नी मला परत आणून दे. लग्नबंधनाने बद्ध झालेल्या पत्नीला सोडायला मी केव्हाही तयार नाहीं. तू आपल्या पत्नीचा त्याग केला असशील पण मी माझ्या पत्नीचा त्याग करणार नाहीं!

ब्राह्मणाचें हें बोलणें उत्तमच्या मर्मस्थानीं लागलें. स्वत:ही त्याने आपल्या पत्नीचा त्याग केला होता. त्याला संपूर्ण परिस्थितीचें स्मरण झालें. मीही अग्नीसमोर प्रतिज्ञा घेतली होती, कीं आम्ही एकत्र राहूं, एकत्र जीवन घालवूं, एकत्र जीवन समाप्त करूं, कुठे गेली ती माझी प्रतिज्ञा? माझ्या पत्नीचा मीही नाहीं कां त्याग केला? हें मला शोभलें कां? उत्तम अशा प्रकारच्या विचारांनी अस्वस्थ झाला. पण झाल्या गोष्टीला इलाज नव्हता. उत्तमचें डोकें अनेक प्रकारच्या विचारांनी सुन्न झालें. त्याला कांहींही सुचेनासें झालें. पण त्याच क्षणीं उत्तमाला कर्तव्याचें भान झालें. उत्तम घोड्यावर स्वार झाला व ब्राह्मण-पत्नीच्या शोधार्थ निघाला. तक्रारींचें ताबडतोब निवारण करणें, यालाच खरी राज्यव्यवस्था म्हणतात. तुमच्या तक्रारींचा विचार सुरू आहे, असें उत्तर उत्तमाने दिलें नाहीं. त्या काळचे राजे लोकांच्या स्वास्थ्यासाठीं स्वत:चें जीवनही समर्पण करायला मागेंपुढें पाहात नसत.



उत्तम फिरत फिरत एका ऋषीच्या आश्रमाजवळ आला. तरुण व तेजस्वी राजाला पाहून शिष्य आपापसात मधुपर्काची तयारी करण्याविषयीं कुजबुजूं लागले. इतक्यात एका शिष्याने गुरुजींना आंत नेऊन सांगितलें कीं 'हा आपला राजा असला तरी त्याने पत्नीचा त्याग केला आहे. तेव्हा त्याचा सत्कार म्हणजे त्याच्या कृतीचें अनुमोदन नव्हे काय?' ही आंतली खळखळ उत्तमालाही लक्षात आली. तो म्हणाला : 'मला पूजनाची आवश्यकता नाहीं. माझें पूजन झालें तर मला संकोच वाटेल. कारण मी दोषी आहे. मी पूजेला पात्र नाहीं. कारण मी माझ्या पत्नीचा त्याग केलेला आहे. मी भगवंताचा फार मोठा अपराध केलेला आहे. या सन्मानाला मी योग्य नाहीं.'

ऋषींनी उत्तमाचें सांत्वन केलें व त्याला थोडासा ठपकाही दिला. त्याला अतिशय दु:ख झालें. त्याला वाटलें : भगवंताने जी जोडीदारीण मला दिली होती, तिला मी सांभाळून घेऊं शकलो नाहीं. मी माझें कर्तव्य पार पाडलें कां? भगवान् लाखो लोकांना सांभाळून घेतो. लोक परमेश्वराला शिव्या देतात, तरीही प्रेमाने तो सर्वांचें संगोपन करतो, जीवन चालवतो. त्या भगवंताचा मी मुलगा असून मला माझ्या पत्नीलाही सांभाळता येऊं नये कां?

उत्तमाने ऋषींजवळ त्या अग्निहोत्री ब्राह्मणाच्या पत्नीची चौकशी केली. ऋषींनी सांगितलें : 'इथून जवळच बलाक नावाचा राक्षस राहतो. त्याने त्या ब्राह्मणाची पत्नी पळविलेली आहे.'

राक्षसासंबंधी आपल्या अगदी विकृत कल्पना आहेत. मोठमोठ्या दाढी-मिश्या, भयंकर केस व विक्राळ स्वरूप असलेली व्यक्ति म्हणजे राक्षस असें आपण समजतो. पण ही कल्पना चुकीची आहे. राक्षस सुंदर असतो. सुंदर कपडे घालतो व थाटातही राहाणारा असतो. दुर्योधन, रावण वगैरे राक्षस सुंदर होते, बुद्धिमान् होते, तुमच्या आमच्यासारखे माणूस होते. फक्त फरक एवढाच कीं ते भोगवादी होते. 'खा, प्या, मजा करा' या विचारासाठींच ते जगत होते. परंतु आजचे सुशिक्षित लोक पूर्ण विचार न करताच म्हणतात, कीं आपले पूर्वज मूर्ख होते. खाणें, पिणें, मजा

करणें या शिवाय जीवनात दुसरें असतेंच काय; या जगात भगवान् आहेच कुठे? जर ईश्वर नाहींच तर त्याची पूजा तरी कशाला करायला पाहिजे? ऋषींना जीवनातला आनंद तरी कुठे माहीत होता? थोडक्यात म्हणजे राक्षस या शब्दाला गांवठी प्रतिशब्द जर द्यायचा असेल तर तो म्हणजे 'गुंड' हा होय.

उत्तमाने बलाक राक्षसाने पळविलेल्या ब्राह्मण पत्नीच्या शोधार्थ जायचें ठरविलें व तो ज्या ठिकाणीं राहात होता तिथे उत्तम गेला. बलाकाने दुरूनच राजाला पाहिलें व राजाला सामोरा गेला. राजाने पाहिलें तो, त्याच्या आजुबाजूला सुंदर सुंदर स्त्रिया बसल्या होत्या. परंतु या सुंदर स्त्रियांत ब्राह्मण पत्नी मात्र नव्हती.

राजाने बालकाला विचारलें : 'या स्त्रिया कोण आहेत? बलाक म्हणाला : 'या सर्व स्त्रिया माझ्या आहेत. राजा विचारात पडला, कीं इतक्या सुंदर स्त्रिया जवळ असताना कुरूप असलेली ब्राह्मणपत्नी याने कां बरें पळविली? ऋषींनी सांगितलें तें अगदी खरें आहे. हा राक्षस दिसायला सुंदर आहे, आदरातिथ्यही उत्कृष्टपणे करतो पण याने या ब्राह्मणपत्नीला कां बरें पळविलें?

शेवटी खात्री करून घेण्यासाठीं उत्तमाने हळूच बलाकाला विचारलें, कीं 'तू ब्राह्मणपत्नी पळविली आहेस ही गोष्ट खरी काय?'

बलाक : होय, खरी गोष्ट आहे.

उत्तम : कशासाठीं पळविलीस?

बलाक : हा ब्राह्मण आमच्या व्यवसायात अडथळा करतो. हल्ली लोक आम्हाला पूर्वीसारखे भीत नाहीत. कारण हा ब्राह्मण लोकांना ईश्वराच्या गोष्टी सांगतो. लोकांना ईश्वरावर विश्वास ठेवायला सांगतो. त्यामुळें असा परिणाम झाला आहे, कीं लोक आम्हाला भीत नाहीत. इतकेंच नव्हे तर आमच्याशीं सामनाही करतात. यामुळें आमच्या व्यवसायात नुकसान होऊं लागलें आहे. पूर्वी लोक आम्हाला घाबरून आम्हाला खंडणी देत असत पण हल्ली ती लोक देईनासे झाले आहेत.'



एका सुभाषितात असें सांगितले आहे, कीं सज्जनांच्या कृत्यांनी दुष्टांचा स्वार्थ नष्ट होतो. बलाकाची अशीच स्थिति झाली होती. बलाक उत्तमाला म्हणाला : 'हा आमच्या पोटापाण्याचा प्रश्न आहे व यामध्ये हा ब्राह्मण आड येतो. म्हणून त्याच्या पत्नीला मी पळविली आहे. त्याची पत्नी नसल्यामुळें तो यज्ञ करणार नाहीं व त्यामुळें हळू हळू लोक भगवंताला विसरतील व पूर्वीप्रमाणे आम्हाला भ्यायला लागतील. पत्नी पळविण्याचें दुसरें कारण असें, कीं या कृत्यामुळें त्या ब्राह्मण्याची बेअब्रू होईल.'

उत्तमाने बलाकाला खूप समजावलें, कीं अशा प्रकारचें कृत्य करणें बरें नव्हे. मी तुझ्या पोटापाण्याचा प्रश्न सोडवीन. पण तू या ब्राह्मण पत्नीला सोड. भगवंताने आपल्याला ज्या स्थितीत ठेवलें आहे त्या स्थितीत राहिलें पाहिजे. दुसऱ्याची पत्नी अशा प्रकारे पळविणें ठीक नव्हे. हें फार मोठें पाप आहे. या म्हणण्याचा बलाकावर उलटाच परिणाम झाला. तो म्हणाला : 'राजा! तू मला मोठा उपदेश करायला आला आहेस! पूर्वीं उत्तमराजा मोठा प्रात:स्मरणीय व वंदनीय होता. परंतु तोच आज अनीतिमान् झालेला आहे. राजा! स्वत:च्या पत्नीचा तूच त्याग केलास ना? मी अजून माझ्या पत्नीचा तरी त्याग केलेला नाहीं. ईश्वराने ठेवलें तसें रहावें असा उपदेश करणारा तू हाच उपदेश स्वत:ला कां बरें नाहीं करीत?'

उत्तम आंतल्याआंत वरमला. 'ठीक आहे' असें म्हणून तो तेथून निघाला. एका झऱ्याच्या कांठीं येऊन शांतपणे बसला. बसल्या बसल्या मनात विचार आला, कीं माझी पत्नी दुष्ट असली तरी मी कां बरें दुष्ट व्हावें? भगवंताने जी जोडीदारीण मला दिली होती तिच्याबरोबर मला राहता सुद्धा येऊं नये कां? यात माझीच चूक झाली. बहुला यावेळीं

कुठल्या अवस्थेत असेल बरें? प्रभो! माझ्या हातून फार मोठा अपराध घडला. मला माझी बहुला परत आणून दे!

इकडे आत्मनिरीक्षणाने बहुला पण शहाणी झाली होती. आपलीही फार मोठी चूक झाली असें तिलाही वाटूं लागलें होतें. प्रायश्चित्ताच्या आगीत ती सतत जळत होती व दिवसेंदिवस अतिशय शुद्ध होत होती.

उत्तम फिरत फिरत एका वनात आला. त्या वनात दुरूनच वनदेवतेसारखी दिसणारी सुंदर स्त्री त्याने पाहिली. अतिशय सुंदर व अतिशय पवित्र बहुला दोन्ही हातात फुलें घेऊन समोर असलेल्या प्रतिमेला श्रद्धापूर्वक फुलें अर्पण करीत होती. त्या प्रतिमेचें बहुला पूजन करीत होती. उत्तमाने हळूच पाठीमागून येऊन पाहिलें. तो दिङ्मूढ झाला. ती वनदेवता नसून आपली बहुलाच आहे याची त्याला आता पूर्णपणे खात्री झाली होती. बहुलेला आता पश्चात्ताप झाला आहे हें उत्तमाच्याही लक्षात आलें. बहुलेने राजालाही ओळखलें. ताबडतोब उत्तमाचे चरण धरले. उत्तमाने बहुलेला उठविलें. 'बहुले! माझी चूक झाली. तू माझी गुरु आहेस.' बहुला म्हणाली : 'छे! छे! असें बोलून मला लाजवूं नका. चूक माझीच आहे.' दोघांच्याही डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. दोघेंही म्हणूं लागली : 'चूक माझीच आहे.'

इतक्यात आश्रमातले एक ऋषि आले. त्यांनी सांगितलें : 'हीच आमची भारतीय संस्कृति आहे. चूक दुसऱ्याची आहे असें न म्हणता चूक माझी आहे असें समजणें याचेंच नाव संस्कृति होय. भगवंताने जो जोडीदार दिला असेल त्याच्याशी जुळवून घेण्याची कला अवगत झाली पाहिजे. प्रतिकूल व भगवद्विरोधी अशा माणसांनाही भगवंत सांभाळून घेतो मग विचारात थोडीशी प्रतिकूलता आली तर आपल्याला मात्र सांभाळून घेता येत नाहीं यात केवढी दुर्बलता आहे!'

या जगात आजपर्यंत अनेक आईबाप होऊन गेले आहेत व ही जगरहाटी अविरत सुरू आहे. त्यामध्ये जी व्यक्ति मिळाली तो आपला



जोडीदार हा जोडीदार चांगला मिळावा अशी इच्छा असेल तर चांगली कृत्यें कर. मग येत्या जन्मात चांगला जोडीदारही मिळेल. आपण एकमेकांच्या उणीवाच शोधीत असतो. त्यामुळें सोन्यासारखा संसार बिघडून जातो.

आज सर्व माणसे दुसऱ्यांच्या चुका शोधीत आहेत. लोक म्हणतील, कीं 'ब्राह्मण बिघडले म्हणून समाजाचें अध:पतन झालें.' ब्राह्मण म्हणतील : 'अहो! लोकच चांगले नाहीत.' राजा म्हणेल : 'ही प्रजेची चूक आहे.' प्रजेला विचाराल तर प्रजा म्हणेल, की 'राजाची चूक आहे.' शिक्षक म्हणतात : 'विद्यार्थ्यांची चूक आहे.' विद्यार्थी म्हणतात. 'शिक्षकांनी अभ्यासक्रम पुरा केला नाहीं म्हणून आम्ही नापास झालो.' आपणही भगवंताची चूक काढीत असतो कीं 'भगवान् पक्षपाती आहे. आमच्याकडे तो पहातच नाहीं.' अशा तऱ्हेने समाजात लोक दुसऱ्यांच्या चुकाच काढीत असतात व हें जोपर्यंत चालूं राहील तोपर्यंत समाजात सभ्यता, संस्कृति यांचें दर्शन होणार नाहीं.

उत्तमाच्या मनात सतत एकच विचार येत होता, कीं **'धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि नातिचरामि नातिचरामि'** या प्रतिज्ञेचा मी भंग केला. स्वत:ची चूक ओळखून उत्तम भारतातला एक महान् राजा झाला. त्याने स्वत:चा संसार सुधारला व जगाला सुंदर व सांस्कृतिक बनवून त्याला परमार्थाकडे वळविलें.



# नांबि

सुमारे १२०० वर्षापूर्वीची गोष्ट आहे. तामिळनाडूच्या बाजूला एक सुंदर गांव होतें. त्या गांवाकडे पाहिल्यानंतर असें वाटे, कीं भगवंताने आपलें सारें सौंदर्य या गांवातच ओतलें नाहीं ना? समोरच असलेल्या शैलावर बालरवीचें कोवळे किरण विसावत व नंतर उदधीच्या अथांग जलावर तलमशी एक सोनेरी चादर पसरीत. तें दृश्य खरोखरच कोणाचेंही हृदय खेचून घेईल असें असे. मधून मधून उंच उंच उसळणाऱ्या लाटांनी रत्नाकर पर्वताला भेटायलाही येई. शुभ्र रुपेरी वाळूवर त्या लाटा आदळत व पुन्हा परत जात. लाटांचा हा पाठशिवणीचा खेळ सतत चालू असायचा.

ते गांव निसर्गसौंदर्याने पुरेपूर नटलेलें होतें. नारळ व सुपारी यांची झाडें म्हणजे त्या गांवाची नेत्रदीपक शोभा. दर घरासमोर स्वच्छ सारवलेलें अंगण आणि तो मांडव, ते थोडेसे उंच असलेले ओटे, वरच्या कातळावरून घराच्या परसात आणि न्हाणीघरात झेपावणारे छोटे छोटे पाट, व त्यांच्याच आश्रयावर तृप्तीने डोलणाऱ्या नारळी पोफळीच्या बागा! साऱ्या गांवाची रचना कशी आखीव व पद्धतशीर होती! गांवातले लोकही सुखी व संपन्न होते. वृक्षांशी ते गप्पागोष्टी करीत असत. त्यांना प्रेमाने पाणी देत भावासारखें त्यांच्यावर प्रेम करीत. त्यांच्याशी आत्मीयतेचे संबंध प्रस्थापित करीत त्या वृक्षांकडून स्थैर्याचे धडे घेत. समोर असलेल्या शैलमालेजवळून भव्यता शिकत. उसळणाऱ्या सागरापासून जीवनाचें गांभीर्य शिकत. शांततापूर्ण असें स्वत:चें जीवन घालवीत असत. वृक्षही हें लोकांचें प्रेम पाहून त्यांचें पोषण करीत असत.

अशा त्या गांवात एक ब्राह्मण रहात होता. त्या काळच्या दृष्टीने तो सुखी होता. सकाळी उठावें, प्रभूचें नामस्मरण करावें, स्नान-संध्या-पूजा करावी, वृक्षांना पाणी द्यावें, प्रेमाने त्यांचें संगोपन करावें असा



त्याचा दिनक्रम होता. ब्राह्मण अतिशय पवित्र व सुशील होता. ईश्वरकृपेने त्याची पत्नीही त्याला अनुरूप अशीच होती. त्यामुळें त्या ब्राह्मणाला जवळ जवळ प्रतिकूल असें काहीं नव्हतेंच.

**अनुकूलां विमलांगीं कुलजां कुशलां सुशीलसंपन्नाम्।**
**पंचलकारां भार्यां पुरुषः पुण्योदयात् लभते।।**

पत्नी खरोखरच त्या घराचें भूषण होती. त्यामुळें दोघांचा संसार सुखी होता.

त्यांना प्रौढपणीं मुलगा झाला. त्याचें नांव 'नांबि' असें ठेवलें. नांबि लहानपणापासूनच अतिशय सुंदर व आकर्षक होता. तसाच तो चटपटीतही होता. नांबि म्हणजे आई-बापांचें सर्वस्व. तो झोपल्यानंतर आई-बाप त्याच्याकडे सारखे टक लावून पाहात असत.

नांबीला घेऊन ब्राह्मणपत्नी झोपाळ्यावर बसे. त्याला काहीं काहीं शिकवूं लागे. लहानपणीं झोपाळ्यावर बसून आईने दिलेलें ज्ञान आजचा पदवीधरही मिळवूं शकत नाहीं. त्या वयात मुलाची आईवर पूर्ण श्रद्धा असते. आई मनापासून सांगत असते व मूल मनापासून ऐकत असतें. आईने सांगितलें, कीं चिमणी बोलली तर तें मुलाला खरें वाटतें.

ब्राह्मणपत्नीला अनेक सुंदर सुंदर गोष्टी येत होत्या. तसेच तिला शेकडों श्लोकही तोंडपाठ होते. नांबीला ती श्लोक शिकवायची व ते त्याच्यापासून म्हणवून घ्यायची.

वडील सांगायचें : 'बाळ! वृक्षांवर प्रेम केलें पाहिजे. त्यांच्यातही देव असतो. झाडात शक्ति असते. नांबि हें सारें हृदयात साठवीत होता. दररोज संध्याकाळी आई तुळशीजवळ नीरांजन लावी व नांबि वडिलांजवळ बसून पाठ केलेले सर्व श्लोक म्हणे. संध्याकाळचें वातावरण क्लेश व कलह यांच्याऐवजीं श्लोकांनी दुमदुमून जायचें. घरोघरीं असा घोष चालायचा. वडिलांनी म्हणायला सांगायचें व मुलांनी सुरुवात

करायची. संध्याकाळी लक्ष्मी सर्वांच्या घरी येते व त्यावेळीं अशाप्रकारचें वातावरण पाहून प्रसन्न होई.

नांबि अतिशय प्रेमळ होता. आई जेव्हा त्याचे लाड करायची, त्यावेळीं नांबि म्हणे : 'आई! तू मुळीच काळजी करूं नकोस. मी तुझें सारें काम करीन.' पांच वर्षे कुठल्याकुठे निघून गेली. पांचव्या वर्षीच नांबीच्या तेजस्वी बुद्धीचा प्रत्यय येऊं लागला. हुशार मुलांची लौकर मुंज करीत. नांबीच्या वडिलांनी त्याचा उपनयन संस्कार केला. आपण मुलाची मुंज करतो आणि त्यात रग्गड पैसे खर्च करतो. पण 'उपनयन' म्हणजे काय हेंच आपल्याला माहीत नसतें. उपनयन याचा अर्थ मुलाला जीवनाची दीक्षा द्यायची, त्याला ध्येयदृष्टि द्यायची व त्याला शिकायला पाठवायचें.

नांबीलाही पाठशाळेत जायचें होतें. सकाळीं लौकर उठून तीन मैल लांब असलेल्या पाठशाळेत जायचें व अकरा-बारा वाजता परत यायचें. परंतु नांबीला पाठशाळेत जाणें आवडलें नाहीं. त्याला घरातलें वातावरणच जास्त आवडायचें. आईजवळ बसून गोष्टी ऐकाव्या, श्लोक पाठ करावेत, झाडांना पाणी घालावें, खळखळ वहाणाऱ्या पाण्याबरोबर खेळावें, नाचावें, हें सारें सोडून पाठशाळेत जायचें! 'आई! तुझ्याजवळ इतकें उत्कृष्ट शिकायला मिळतें. तसलें पाठशाळेत कोठून मिळणार! एक दिवस तू पिंपळाला प्रदक्षिणा घालीत होतीस व मी शेजारी उभा होतो. त्यावेळीं तू मला प्रदक्षिणा घालायला सांगितलेंस. मी म्हटलें : मला ही सर्व मुलें हसतात. मी नाहीं प्रदक्षिणा घालणार.' त्यावेळीं आई! तू म्हणालीस : 'सत्कृत्याची कधीही लाज वाटता कामा नये. वाईट कृत्य करताना जरूर लाज वाटली पाहिजे.' आई! हें जें तुझ्याजवळून मला शिक्षण मिळालें तें मला दुसऱ्या कोणाजवळून मिळालें असतें?'

ब्राह्मण-पत्नीसमोर मोठा प्रश्न उभा राहिला, कीं या मुलाची समजूत कशी घालायची? आजच्या आईसारखें थोडेंच सांगायचें होतें, कीं शिकला नाहीस तर खाशील काय? त्या काळीं शिक्षण व उपजीविका यांचा कांहींही संबंध नव्हता. नारळी-पोफळींना पाणी देता देता मोठें झालेलें मूल उपजीविकेसाठीं थोडेंच रडणार होतें?



त्या काळात शिक्षण जीवनविकासासाठीं होतें. जीवनात सद्गुण यावेत, आंत असलेल्या सुप्त शक्तीचा विकास व्हावा यासाठीं शिक्षण होतें. आजही इंग्रजीत Education याचा अर्थ (सद्गुणांना) to draw out असा आहे. वेद कशासाठीं म्हणायचे? हा प्रश्नच त्यावेळीं उत्पन्न होत नव्हता. **निष्कारणेन षड्ङ्गो वेदोऽध्येयश्च ज्ञेयश्च।** माझ्या आईवर मी प्रेम कां करावें या प्रश्नाचें कांहीं उत्तर आहे कां? आई माझी आहे म्हणून तिच्यावर प्रेम तसेंच वेद माझे आहेत म्हणून त्यांचें अध्ययन करायला पाहिजे.

नांबीने शाळेत जायला नकार दिला तेव्हा आईने त्याला मांडीवर घेऊन पाठीवरून हात फिरवत सांगितलें : 'बाळ! तुला मी सांगते तें आवडते ना? तासन् तास तू माझ्या गोष्टी ऐकतोस ना? तशीच आकाशात आपली एक मोठी आई आहे. तिचें नांव जगदंबा. तिच्यावर तुझें प्रेम आहे ना? त्या आईलाही कांहीं सांगायचें आहे. ती जें शिक्षण देते त्याचें नांव वेद. तू माझें ऐकतोस ना? तसें त्या आईचेंही ऐकलें पाहिजेस. ते वेद प्रेमाने पाठ केले पाहिजेत. दररोज म्हटले पाहिजेत. वेद कां म्हणायचे असें विचारता कामा नये. तें वेद म्हणायला तुला पाठशाळेत जायला हवें.'

छोटा नांबि निरुत्तर झाला. पाठशाळेत जायला लागला. सकाळी लौकर उठून पाठशाळेत जाई, अकरा वाजता परत येई व जेवून परत जाई. त्या गावात २५-३० उंबरठा होता. नांबीच्या घरासमोर असलेल्या वाडीच्या टोकाला एक जुनें गणपतीचें मंदिर होतें. त्या मंदिरात कुणी जात नसे. फक्त तो ब्राह्मण दररोज सकाळीं त्या देवळात जाई व त्याला नैवेद्य दाखवी. ब्राह्मणाचा दृढ विश्वास होता, कीं हा गणपति विघ्नहर्ता आहे व त्या श्रद्धेनेच ब्राह्मण दररोज न चुकता त्याला नैवेद्य दाखवीत असे.

एकदा त्या ब्राह्मणाला बाहेरगावीं जायचें होतें. जुन्याकाळीं मालक बाहेरगावी जायचा म्हणजे दोन गोष्टी महत्त्वाच्या असत व त्या करायला सांगून बाहेरगावीं जाई. देवपूजा व झाडांना पाणी घालणें ही ती दोन

कामें. आजच्यासारखे कुलूप कोण लावील, घर कोण राखील अशी चर्चा त्याकाळीं चालत नसे. ब्राह्मणाने पत्नीला सांगितलें :'झाडांना तू पाणी घाल व नांबि शाळेतून आला कीं त्याला पूजा व नैवेद्य दाखवायला सांग. नांबीची आता मुंज झालेली आहे. तेव्हा त्याला या गोष्टीची माहिती व्हायलाच पाहिजे.' इतकें सांगून नांबीचे वडील बाहेरगावी निघून गेले. नांबि पाठशाळेत जाई. वेदाध्ययन करी. संथा म्हणे व त्यामुळें भूकही खूप लागे. अकरा केव्हा वाजतात असें त्याला होई. पाठशाळेतून येताना त्याला वाढलेलें ताटच दिसायचें. त्या दिवशीं नांबि धावत धावतच घरीं आला व मोठ्याने ओरडून म्हणाला : 'आई! पान वाढ!'

आई म्हणाली 'आज तुझे वडील बाहेरगावीं गेले आहेत तेव्हा तुला गणपतीची पूजा करायची आहे व त्याला नैवेद्यही दाखवायचा आहे.'

नांबीला वाटलें : 'ही आज कटकट कुठून आली? हातात पूजेचें ताट घेतलें व धावत धावत मंदिराकडे जायला निघाला. वाटेत एका झाडावरची दोन-चार फुलें काढली व ती घेऊन मंदिरात शिरला. लोटाभर पाणी घातलें, फुलें फेकली व नैवेद्याचें भांडें देवासमोर आपटलें. मंत्र येत नव्हते. तंत्र माहीत नव्हतें, आणि त्यातही जेवायला जायची घाई! आपल्या हातातल्या गोष्टी झट्‌दिशी उरकल्या. आता एकच गोष्ट राहिली होती व ती म्हणजे गणपतीने नैवेद्यही लौकर खायला हवा होता. ती गोष्ट त्याच्या हातातील नव्हती. तो अतिशय अधीर झाला. भगवान् नैवेद्य केव्हा खातोय व मी केव्हा जातोय असें त्याला होऊन गेलें होतें. पण दगडाचा गणपति खाईचना! आपली सोंडही हलविना!

नांबि म्हणाला :

'भगवंता! लौकर खा ना! मला अतिशय भूक लागली आहे.' पण भगवान् आपला शांत. परत नांबि म्हणाला : 'भगवंता! मी बालक असल्यामुळें माझ्या हातचा नैवेद्य खात नाहीस कां? वडिलांच्या हातचा नैवेद्य तू दररोज खातोस. कारण माझे वडील दररोज रिकामें ताट घेऊन परत येतात. भगवंता! गणपते! लवकर भोजन कर ना!' वडिलांची युक्ति



मुलाला कुठे माहीत होती? वडील पूजा करून तो प्रसाद गाईला घालून परत येत असत. 'हे भगवंता! तू दयाळू आहेस अशी माझी आई नेहमी मला सांगतें. मग मी इतका भुकेलेला असताना तुला माझी दया कशी येत नाहीं? मला तुझी भाषा येत नाहीं म्हणून कां भगवंता! तू जेवत नाहीस?' परंतु त्या पत्थररूपी भगवंताचें हृदय कांहीं दयार्द्र होईना. शेवटीं नांबि रडत रडत दीनवाणा होऊन भगवंताला म्हणाला : 'भगवंता! तू सोंड हालवून जोपर्यंत जेवत नाहीस तोपर्यंत मी घरी कसा जाऊं? घरी गेल्यावर आई म्हणेल : 'नांबि! तू भगवंताला आवडत नाहीस म्हणून भगवान् तुझ्या हातचें जेवला नसेल. गांवातील मुलें माझी टिंगल करतील : भगवंताने तुझ्याशी गट्टीफू केलीय. भगवंता! आजपर्यंत मी कधीही खोटें जीवन जगलो नाहीं. कधीही चोरी केली नाहीं. रोज आईबापांना नमस्कार करतो. आंघोळ केल्याशिवाय आजपर्यंत जेवलो नाहीं. असें असूनही मी तुला नाहीं कां आवडत! भगवंता! माझे वडील नेहमी सांगतात : लहान मुलांना भूक लागली, कीं त्यांनी ताबडतोब जेवावें. मग तू लौकर जेव ना! तू जेवला नाहीस तर बाहेरचे लोक माझी निंदा करतील. हा माझा अपमान आहे. भगवंता! लवकर जेव ना रे!'

नांबि खूप खूप रडला. परंतु गणपतीची सोंड कांहीं हालेना. नांबि खूप खूप कळवळला. गणपतीच्या पायां पडला. क्षणात पोटावरून हात फिरवी व दुसऱ्या क्षणीं पायावर डोकें ठेवी. शेवटी कंटाळला व म्हणाला : 'भगवंता! तू जर जेवणार नसशील तर मी तुझ्या पायावर डोकें आपटून जीव देईन.' व डोकें आपटायला जाणार इतक्यात आवाज आला : 'बेटा! हें रे काय करतोस? चल मी जेवतो हं.' नांबि वर पाहतो तो खुद्द भगवंत जेवत होतो. त्या बालकाच्या निष्पाप अंतःकरणापुढें, प्रेमापुढें आणि श्रद्धेपुढें शेवटी भगवंतालाही नमावें लागलें.

उघडें व गोरेगोमटें शरीर असलेला, लंगोटी नेसलेला व गळ्यात जानवें असलेला असा तो गणपति होता. त्याच्या कमरेत एक गोफही होता. नांबि अनिमेष नेत्रांनी त्याच्याकडे पहातच राहिला. भगवान् जेवला यात त्याला विशेष कांहींच वाटलें नाहीं. उलट त्याला वाटलें : जसें

वडील दररोज गणपतीला जेवायला लावीत तसें मीही गणपतीला जेवायला लावलें. अद्‌भूत व असंभवित अशी ही घटना नांबीच्या लेखीं अगदी सामान्य गोष्ट होती.

भगवान जेऊं लागला. संपूर्ण ताट स्वच्छ झालें तरी नांबि तेथून उठेचना. भगवंताच्या त्या छोट्या छोट्या डोळ्यांकडे पाहातच राहिला. प्रारंभी नांबीच्या डोळ्यांत आर्तता होती पण आता त्याला भीति वाटायला लागली. तो म्हणाला : 'भगवंता! तुझें ठीक आहे. परंतु तू जेवायला इतका उशीर केलास कीं आता मला पाठशाळेत जायला उशीर होणार व गुरुजी मला मारणार!' भगवंताने त्याला आश्वासन दिलें व सांगितलें : 'नांबि! तुला काळजी करायचें कांहींही कारण नाहीं. तुला कोणीही रागावणार नाहीं.'

पण नांबि तेथून उठेचना. त्याच्या डोळ्यात आशाभाव निर्माण झाला. तो म्हणाला : 'भगवंता! वडील नेहमी म्हणतात, कीं गणपति ही विद्येची देवता आहे. हें जर खरें असेल तर तूच मला विद्या शिकव ना! पाठशाळेतले गुरुजी मोठे रागीट आहेत. त्यांची मला नेहमी फार भीति वाटते. भगवंता! तू आमच्या घरचा आहेस ना? मी तुला दररोज आंघोळ घालीन. तुला नैवेद्य दाखवीन. तू मला विद्या शिकव.'

निष्पाप प्रेमाने प्रभु अंकित झाला. नांबि अतिशय खूष होऊन घरी परत आला. त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला होता. तो त्या आनंदाच्या बेहोषीत होता.

आईने विचारलें : 'इतका उशीर कां झाला?' नांबि हसायला लागला. 'अरे तू हसतोस कां?' नांबि म्हणाला : 'मी आता नाहीं सांगणार तुला. ती एक गुप्त गोष्ट आहे. नंतर तुला सांगेन.' आईला वाटलें : मुलगा कांहीं तरी गंमत करतो आहे झालें व त्यामुळें ती ही गोष्ट विसरली सुद्धा.

दुसऱ्या दिवशीं सकाळी पोथी वगैरे घेऊन नांबि मंदिराकडे जायला निघाला. ब्राह्मणपत्नीला वाटलें : हा कांहीं पाठशाळेचा रस्ता नव्हे. मग



नांबि या रस्त्याने कुठे चालला! घरात वडील नाहीत त्यामुळें मुलगा उनाडक्या करायला तर चालला नसेल ना? म्हणून आई लपत छपत त्याच्या पाठीमागून जाऊं लागली. तिला लांबूनच आवाज ऐकूं आला. त्यात एक आवाज नांबीचा व दुसरा गणपतीचा होता. नांबि प्रश्न विचारीत होता व गणपति उत्तरें देत होता. नांबीच्या हृदयात तो आवाज जात होता व त्याचा एक वेगळाच प्रभाव पडत होता.

आईने भगवंताची प्रासादिक वाणी ऐकली व बाहेर थांबली. उत्सुकता असूनही आंत गेली नाहीं. कदाचित् नांबीच्या अध्ययनात विक्षेप झाला तर! आज तिचें मातृत्व धन्य झालें होतें. तिच्या रोमरोमात हर्ष नाचत होता. **कुलं पवित्रं जननी कृतार्था वसुंधरा पुण्यवती च येन।** अशी तिची आज अवस्था झाली होती. ती हसत हसत तुरुतुरु घरी आली.

दुपारी नांबीचे वडील आले. नांबीची हकीगत विचारली. ती म्हणाली : 'नांबि भगवंताचा आवडता झाला आहे. आपलें कुळ पवित्र झालें.'

'अगं! पण झालें तरी काय? सांगशील तर खरें सगळें वर्तमान!'

'भगवान् गणपति स्वत: नांबीला शिकवतात!'

ब्राह्मण म्हणाला : 'तू मूर्ख तर नाहीस ना? भगवान् कसा शिकवील?'

'हो हो! मी अगदी खरें सांगतेय! मी भगवंताची प्रासादिक वाणी या माझ्या कानांनी ऐकली आहे. परंतु गांवात ही हकीगत कोणाला सांगूं नका. नाहींतर लोक नांबीचा सन्मान करायला लागतील व त्याच्या अध्ययनात त्यामुळें अडथळा येईल.'

पतिपत्नी दुसऱ्या दिवसाची वाट पहात बसली. दुसऱ्या दिवशीं सकाळी आईबापांना वंदन करून, पोथी घेऊन धावत धावत नांबि गणपतीच्या मंदिरात पोचला. अध्ययनाला सुरुवात झाली. गणपतीच्या त्या

बारीक डोळ्यांकडे अनिमेष नेत्रांनी पहात मोठ्या आनंदाने अध्ययन करूं लागला. भगवंत स्वत: प्रेमळ वाणीने जर शिकवीत असेल तर कोणाला आनंद होणार नाहीं?

आई-बापही हळूहळू त्याच्या पाठोपाठ गेले व लांबूनच त्यांनी त्या विघ्नहर्त्या गणपतीची गंभीर व प्रासादिक वाणी ऐकली. त्यांना धन्यता वाटली. आज त्यांच्या जीवनात कृतकृत्यता ओसंडून वाहात होती. त्यांनी एका लोकोत्तर जीवाला जन्म दिला होता, कीं ज्याने भगवंतालाही मनुष्य वाणीने बोलायला लावलें.

दोघेही अतिशय धर्मनिष्ठ होती. खिडकीतून पाहाण्याची आपली इच्छा त्यानी आवरली. प्राचीन काळातील माणसें परमेश्वरावर पूर्ण विश्वास ठेवीत असत. पूर्वजन्मांतील संस्कारांवर त्यांना पूर्ण श्रद्धा होती. त्यांना वाटलें : आपलीही योग्यता वाढेल त्यावेळीं भगवंत आपल्याशीही बोलेल. आपली योग्यता नसताना भगवंताजवळ जाऊन बोलणें योग्य नव्हे. म्हणून खिडकीतून न डोकावताच ह्या प्रासादिक वाणीचा प्रसाद घेऊन पतिपत्नी परत फिरली. खरोखर त्यांचा संयम व निष्ठा अवर्णनीय होती.

आईबापांनी अशी खूणगांठ बांधली, कीं ही गोष्ट कोणाजवळही बोलायची नाहीं; नाहींतर आपल्या मुलाचें शिक्षण अर्धवटच राहील व पुढील जन्मातील लाभही हातचा गमवावा लागेल.

नांबीने खूप अध्ययन केलें. त्याच्याजवळ विलक्षण बुद्धि होती. साक्षात् गणपतीजवळून त्याने लोकोत्तर विद्या संपादन केलेली होती. गणपतीने दिलेल्या ज्ञानाचें त्याने सदावर्त घातलें व स्वत:चें जीवन व्यतीत करूं लागला.

त्या काळीं अभयकुलशेखर या नावाचा चौल देशाचा एक राजा होता. तो अतिशय सात्त्विक होता. आपलें राज्य भक्तिमय व्हावें अशी त्याची उत्कट इच्छा होती. स्वत:च्या राज्यात शिवमाहात्म्य वाढावें यासाठीं त्याने खूप प्रयत्न केलें. परंतु त्याला हवा तसा संतोष मिळत नव्हता.



एके दिवशीं त्याच्या आजोबांनी त्याला स्वप्नात दृष्टान्त देऊन सांगितलें : एके ठिकाणीं शिवमाहात्म्याचें एक पुस्तक आहे. तें घेऊन तू भगवन्नामाचा प्रचार कर.'

मोठ्या आशेने राजा तिथे गेला. खूप तपासानंतर असें कळलें : तें पुस्तक वाळवीने खाल्लेलें आहे. राजा अतिशय निराश झाला व शिवमंदिरात गेला. भगवंताजवळ खूप रडला. 'भगवंता! आता तूच रस्ता सांग. मी काय करावें याचें मार्गदर्शन कर. हें शिवमाहात्म्य वाळवीने खाल्लेलें आहे. माझ्या प्रजेला मला भक्तीकडे घेऊन जायचें आहे. अशा प्रकारचें हें वाङ्मय मी कोठून आणूं?' रडत असतानाच त्याला झोप लागली. झोपेत त्याला दृष्टान्त झाला कीं 'अमुक अमुक गावी जा. विद्येचां अवतार असलेला नांबि तुझी इच्छा पूर्ण करील.'

नांबि त्याच गांवात रहात होता. आता तो मोठा झालेला होता व त्याने गृहस्थाश्रमाचाही स्वीकार केलेला होता. समाधान व प्रेम यांनी त्याचें जीवन व्यतीत होत होतें. उच्च विचार घरोघरीं नेत होता. स्वत:च्या प्रज्वलित झालेल्या जीवनज्योतीने दुसऱ्यांच्या जीवनज्योती प्रज्वलित करीत होता.

शोधत शोधत अभयकुलशेखर नांबीच्या गावीं आला. त्यावेळीं लोकांना कळलें कीं नांबि इतका महान् आहे. राजाने नांबीला वंदन केलें व सांगितलें : 'भगवान् शंकराचा असा आदेश आहे, कीं तुम्हीच याप्रमाणे शिवपुराण लिहूं शकाल.'

नांबीने लेखणी घेतली व लिहावयास सुरुवात केली. मेघातून जलधारा वहावी तशी त्या लेखणीतून ज्ञानधारा वाहूं लागली. शंकरावर अत्यंत प्रासादिक वाणीत त्याने अकरा काव्यखंड लिहिले. वेदांच्या खोल विहिरीतून ज्ञानवारि शेंदून काढून त्याने तें सर्वांसाठीं खुलें केलें. ज्यायोगे सामान्य माणूसही जीवनाचे सिद्धांत समजून घेऊन स्वत:चें जीवन तेजोमय बनवूं शकेल. जीवनविकास साधूं शकेल. त्याच्या बुद्धीत विद्या व हृदयात भाव होता. त्याने अद्भुत दैवी लेखन केलें व तत्कालीन समाज सुधारला.

लोकांना दैवी बनविलें आणि एके दिवशीं हा तेजस्वी तारा प्रभूच्या तेजात विलीन झाला. नांबि हें एक रत्न होतें. त्याने ही भूमि धन्य केली.

आजही नांबीला नमस्कार केल्यानंतरच कथा सांगण्याची तामिळनाडूमध्ये प्रथा आहे. त्याला नमस्कार केल्याशिवाय पुस्तक उघडलें जात नाहीं. लोकांच्या मनात नांबि बद्दल आजही इतकें प्रेम आहे, इतकी श्रद्धा आहे.

त्याने ज्ञानाचें सदावर्त घातलें व संपूर्ण तामिळनाडु सुधारला. नांबीने या देशात जन्माला आलेल्या हजारों लोकांना जीवन कसें जगावें हें शिकविलें. अशा या भूमीत आपला जन्म झाला ही गोष्ट महद्भाग्याची होय. आपणही आपलें अंत:करण निष्पाप ठेवलें, प्रभुकार्य केलें तर आपल्याशीही भगवंत बोलेल.

महान् प्रभुभक्त, लोकोत्तर ज्ञानी, विघ्नहर्त्या गणपतीचा लाडका शिष्य असलेल्या आपल्या पूर्वज नांबीला अनंत प्रणाम.



# संत एकनाथ

जेव्हा जेव्हा समाज खरी भक्ति टाकतो, भक्तीमध्ये मूर्खपणा घुसतो, भक्तीमधील तेज निघून जातें, भक्तीमधला ज्ञानाचा पाया नाहीसा होतो तेव्हा तेव्हा या जगात कुणीतरी महान् व्यक्ति अवतार घेते व तेजस्वी, ज्ञाननिष्ठ भक्तिपरंपरा उभी करते.

आजपासून सहाशें वर्षांपूर्वीं असाच एक काळ आला होता. समाजातून तेजस्वी व दिव्य भक्ति नाहीशी झाली होती. त्यावेळीं आपल्या भारत देशात एका महान् युगपुरुषाचा जन्म झाला. अर्वाचीन याज्ञवल्क्य समजावे अशा तऱ्हेचें तेजस्वी, दिव्य व भक्तिमय जीवन त्या महापुरुषाचें होतें.

गोदावरी तटावर पैठण गावीं राहाणाऱ्या भानुदासाच्या कुटुंबात या महापुरुषाचा जन्म झाला. भानुदास संत होता, परम भगवद्भक्त होता. त्याच्या अंत:करणात एकच इच्छा होती : त्याच्या कुटुंबात असा मुलगा जन्माला यावा, कीं भगवंताला त्याने स्वत:जवळ बोलवावें. भगवद्भक्ति करून देवाजवळ जाणारे खूप जीव झाले आहेत. परंतु परम कारुणिक जगत्पिता परमात्म्याला स्वत:च्या घरीं बोलावणारा जीव विरळाच! दोन चार पिढ्यांच्या तपाचें मोल घेऊन का होईना, ती महान् चिद्घन शक्ति स्वत:च्या कुटुंबात जन्माला यावी अशी भानुदासाची फार इच्छा होती.

भानुदासाची ही इच्छा त्याचा पुत्र चक्रपाणि याने सांभाळली. पितृ-इच्छेप्रमाणे त्याने जीवन-विकास साधला, भक्ति पुष्ट केली. या चक्रपाणीचा पुत्र सूर्यपाणि. यानेही आपल्या जीवनात आजोबांच्या वृत्तीचें स्वागत केलें.

एक दिवस सकाळी नेहमीप्रमाणे सहस्ररश्मि भगवान् सूर्यनारायण स्वत:च्या कर्मयोगाची तयारी करीत होता. अरुणाने गुलाल फेकून भगवान् सूर्यनारायणाच्या आगमनाची ग्वाही दिलेली होती. अशा त्या मंगल

प्रात:काळी सूर्यपाणीच्या घरीं साक्षात् सूर्याचा अंश असा तेजस्वी बालक जन्माला आला. चक्रपाणि आजोबा झाला. त्याला वाटलें : भानुदासांनंतरच्या या तिसऱ्या पिढीत त्यांची इच्छा पूर्ण होईल. जी इच्छा तीन पिढ्यांचा वारसा घेऊन पुढें चालत आली आहे, ती इच्छा हा नवजात बालक पुरी करील. असा त्याचा अंतरात्मा म्हणत होता.

नातवाचें मुख पाहून चक्रपाणि कृतार्थ झाला. या बालकाचें नांव एकनाथ ठेवलें.

कर्माची गति गहन असते. भगवंताला स्वत:च त्याचा पार लागत नाहीं. **'न जाने जानकीनाथ सबेरे क्या होगा।'** मग सामान्य माणसाची काय कथा? एकनाथ साधारणत: वर्षा-दीडवर्षाचा झाला व त्याची आई मरण पावली. एकनाथासारख्या महान् विभूतीला पृथ्वीतलावर आणण्याचें आपलें काम पूर्ण करून ती निघून गेली.

चक्रपाणीवर त्याचा आघात झाला. एवढ्या बालवयातच एकनाथ मातृसुखाला पारखा झाला! जीवनात ज्याला आई नाहीं, तो त्रिभुवनाचा स्वामी असला तरी पण कंगालच! ही लोकोक्ति त्याला आठवली. त्याचें हृदय हादरलें. ज्याला आई नाहीं, त्या मुलाच्या जीवनाचा विकास कसा होणार? एकनाथाच्या आजीला देखील खूप दु:ख झालें. तिला वाटलें : हा मुलगा मोठा होईल, शाळेत जाईल, दुसऱ्या मुलांकडून त्याला समजेल, कीं त्याला आई नाहीं व शाळेतून आल्यावर आपल्याला विचारील, 'माझी आई कुठेय?' त्यावेळीं त्याला काय सांगूं?

एक वर्षापूर्वी ज्या घरात पुत्रजन्माचा आनंद नांदत होता तेंच घर एक वर्षानंतर आज शोकाने आच्छादलें गेलें! चक्रपाणीला वाटलें : 'माझ्या वडिलांची इच्छा पूर्ण होणार नाहीं. त्रिभुवनपतीला खाली आणण्याची शक्ति या बालकात असती तर या वयात हा पोरका झाला नसता! जशी प्रभूची इच्छा!' असें म्हणून त्याने समाधान मानलें.

सूर्यपाणीचें सांत्वन करताना तो म्हणाला : 'बेटा! आजपासून या मुलाची आई सुद्धा तूच आहेस. आई व बाप, दोघांचें कर्तव्य तुलाच



पुरें करावें लागणार. तू लौकिक काम नाहीं केलेंस तरी चालेल परंतु एकनाथाला आईच्या प्रेमापासून वंचित राखूं नकोस.'

एकनाथाच्या बाललीलांनी घरचें वातावरण प्रफुल्लित राहात असे. दिवसामागून दिवस गेले. एक दिवस रात्रीं सर्वजण शेकोटीपाशी बसले होते. सूर्यपाणीची प्रकृति ठीक नव्हती म्हणून तो खाटेवर झोपला होता. कडाक्याच्या थंडीत आजीच्या कुशीत लपून बसलेला पांच वर्षांचा एकनाथ लाडात येऊन आजोबांना सांगत होता : 'आजोबा! गोष्ट सांगा ना! आज गोष्ट कां सांगत नाहीं?'

चक्रपाणीने गोष्ट सांगायला सुरुवात केली. चार पांच मिनिटें झाली असतील गोष्ट सुरू केल्यावर, आणि ती गोष्ट तिथेच अडकली. कळलें नाहीं काय झालें! एकनाथाचे सानुले निर्दोष नेत्र आजूबाजूला चमत्कारिक नजरेने पाहूं लागले. आजोबा शेकोटीपासून उठून सूर्यपाणीजवळ गेले. मागोमाग एकनाथाला खाली ठेवून आजीही गेली. गोष्ट एकाएकी बंद पडली होती. आजोबा-आजी अकस्मात् रडूं लागली होती. एकनाथाला कल्पना देखील नव्हती, कीं मोठी माणसें त्याच्याप्रमाणे रडत असतील! आजोबा-आजीच्या रडण्याचें त्याला आश्चर्य वाटलें. थोड्याच वेळात उघड्या डोक्याने एकामागून एक माणसें गोळा झाली. लहानगा एकनाथ हें सारें पाहून चकित होत होता. त्याने आजोबांना जरा हालवून म्हटलें : 'आजोबा! गोष्ट सांगा ना!'

आजोबांचे पाणावलेले नेत्र आता ओघळूं लागले. त्यांनी वात्सल्याने एकनाथाला मांडीवर घेतलें आणि म्हटलें : 'बाळ! कुठली गोष्ट सांगूं? इथे जीवन-कथाच बंद पडलीय!'

'पण आजोबा, आज हे सारे लोक बोडक्याने आपल्या घरीं कां आले आहेत? तुम्ही व आजी रडता कां?'

'काय सांगूं, बाळ! आज तुझा बाप सुद्धा आम्हाला सोडून चालला!'

'आजोबा! कोणी आपल्या घरातून बाहेर जाऊं लागला कीं रडायचें असतें? मग त्या दिवशीं मामा आपल्या गावीं गेलें त्यावेळीं कोणी रडलें नाहीं तें?' निर्दोष बालकाला मृत्यूची कल्पनाच नव्हती. त्याच्या या सरळ साध्या प्रश्नाने तिथे जमा झालेल्या लोकांच्याही नेत्रांत अश्रू तरारले.

'बाळा! तुझा बाप कुठे गेला तें तुला कसें समजावूं? कोणत्या ना कोणत्या दिवशीं सर्वांनाच तिथे जायचें आहे, ही सत्य गोष्ट आहे.' चक्रपाणि बालमनाची समजूत काढण्याचा निरर्थक प्रयत्न करीत होता.

'मग आजोबा! मला देखील एक दिवस तिथे जावें लागणार आहे ना? मग बाबा तिथे भेटतील. बाबा भेटल्यावर किती मजा येईल नाहीं!' एकनाथाच्या या शब्दांनी चक्रपाणीचें नेत्र पुन्हा पाणावले. आजीने तर हुंदका दिला. एकनाथाला कुशीत ओढलें व आपल्या साडीच्या पदराने त्याचें तोंड झाकलें. जणू नाथाला तिच्या पुढ्यातून कोणी तरी घेऊन जाईल अशी तिला भीति वाटली. त्याच्या तोंडावर हात ठेवीत ती म्हणाली : 'बाळा! असें अभद्र बोलूं नकोस. भगवंत तुला शतायुषी करो!'

'बाळ! तुझ्यावर सूर्यपाणीचें फार प्रेम होतें. कळत नाहीं, तुला सोडून एकाएकी तो कां निघून गेला!'

'आजोबा! बाबांचें खरेच माझ्यावर फार प्रेम होतें. रोज खांद्यावर बसवून मला गोदावरीत स्नानाला नेत असत. पण आजोबा, खरें सांगूं कां? बाबांपेक्षा तुमचेंच माझ्यावर अधिक प्रेम आहे.' असें म्हणून एकनाथाने लाडात येऊन स्वतःच्या चिमुकल्या हातांनी आजोबांचे गाल दाबले.

पुष्कळ वेळा भगवंत लहान मुलांच्या मुखाने सूचक बोलतो. एकनाथाचें शब्द ऐकून, त्याचें बोल संकेत समजून वृद्ध आजोबा -आजीने एकनाथाला सुसंस्कृत बनविण्यासाठीं कंबर कसली. स्वतःची उरलीसुरली सर्व शक्ति वापरून ती एकनाथाचें लालन-पालन करण्यात तल्लीन झाली. त्याच्यावर उत्तम संस्कार व्हावेत म्हणून चांगल्या चांगल्या, दिव्य गोष्टी



आजी त्याला सांगे. त्याच्या जीवनात भक्ति वाढावी, तेजस्विता फुलावी म्हणून ती सतत जागृत राही, त्याच्यावर संस्कारसिंचन करी. मांडीवर बसवून, मोठ्या प्रेमाने माथ्यावरून हात फिरवीत म्हणे : 'नाथा! एक गोष्ट नेहमी ध्यानात ठेव; आपलें जीवन भगवंताला आवडेल असें बनवलें पाहिजे.'

एकनाथाला अगदी बाळपणापासून त्याची आजी जवळ घेऊन 'रामकृष्ण हरि, वासुदेव हरि' म्हणत असे. नाथ देखील आपल्या बोबड्या भाषेत 'लामकृष्ण हाली वासुदेव हाली' बोले. आजी एकटक त्याला पहात राही. त्याच्या निर्दोष भोळ्या मुखाकृतीमध्ये तिला सूर्यपाणि दिसे. तिचें नेत्र भरून येत.

ते पाहून एकनाथ म्हणे : 'आजी, तू रडतेस? आजोबा मला रोज शिकवितात : रडणारा मुलगा देवाला आवडत नाहीं. तुला माहीत आहे आजी, देवाने जग हसण्यासाठीं बनवलें आहे, रडण्यासाठीं नव्हे.' नाथाची ही जाणीवपूर्ण शिकवण ऐकून आजी झटपट आपलें अश्रू पुशीत असे.

आजी जेव्हा एकनाथाला 'मातृदेवो भव' म्हणायला सांगे तेव्हा एकनाथ पटकन् विचारी : 'आजी! माझी आई नाहीं. मग मी कोणाला नमस्कार करूं?'

आजी त्याला प्रेमाने उचलून मांडीवर घेई व म्हणे : 'नाथा, तू मला नमस्कार कर म्हणजे तुझ्या आईला पोचेल. मी तुझी आजी पण आहे व आई देखील आहे. आपली वैदिक संस्कृति सर्वांची आई आहे. एके काळीं आपली संस्कृति विश्वमान्यता पावली होती. तीच संस्कृति आज कोपऱ्यात बसून रडत आहे. तिला, नेहमी नमस्कार कर. तिचें स्मरण कर, तिला कधीही विसरूं नकोस.'

चक्रपाणि त्याला 'पितृदेवो भव' म्हणायला शिकवी. त्यावेळीं एकनाथ विचारी : 'आजोबा! माझें बाबा कुठे आहेत. मी कोणाला नमस्कार करूं?'

आजोबा म्हणत : 'नाथा, तू मला नमस्कार कर.'

एकनाथ तत्काळ जबाब देई : 'तुम्ही माझे आजोबा आहात.'

हें ऐकून चक्रपाणीचें नेत्र पाण्याने भरून येत. त्याला सूर्यपाणीची आठवण येई. एकनाथाच्या नकळत तो आपले अश्रू पुशी व त्याला समजावी : 'नाथा! आकाशातला बाप तोच सर्वांचा बाप. त्याला तू कधी विसरूं नकोस. आज लोक त्याला विसरले आहेत. आज कांहीं लोक त्याची आठवणही करतात पण दीन, दुर्बल व लाचार बनून. तू मात्र तेजस्वी राहून त्याची सेवा कर. मग भलें तू आम्हाला विसरलास तरी चालेल.'

याप्रमाणे घरातच एकनाथावर आजोबा-आजीने संस्कार बिंबवले. आजी म्हणे : 'संस्कृतीला विसरूं नकोस. ती घराघरांत घेऊन जा.' आजोबा सांगत : 'वाटेल तसें जीवन जगूं नकोस. तेजस्वी जीवन जग. झोपडी झोपडीत भगवंताचा दिव्य संदेश घेऊन जा.'

त्याकाळीं भारतावर मोंगलांचें फार प्रबळ वर्चस्व होतें. जुन्या काळची तपोवन पद्धति लुप्तप्राय झाली होती. चक्रपाणि विचार करीत होता. एकनाथाला उत्तमांत उत्तम शिक्षण कसें मिळेल?

सहाव्या वर्षीं एकनाथाची मुंज झाली. त्याला शिकविण्यासाठीं घरीं एक विद्वान् पंडित येई. हा पंडित एकनाथाला शास्त्रीय सिद्धांत शिकवीत असे. एकनाथाला शिकविताना अनेक वेळा तो विचारात पडत असे. नाथाची प्रज्ञा इतकी जबरदस्त होती, कीं जे सिद्धांत तो पंडित त्याला शिकवत असे तें सर्व तो टिपकागदाप्रमाणे टिपून घेत असे. जो जो विषय शिकवी तो तो विषय तो ताबडतोब पाठ म्हणून दाखवी. केव्हा केव्हा तर गुरुजींना वाटे : 'आपण एकदा शिकविलेला विषय पुन्हा तर शिकवीत नाहीं ना?' केव्हा केव्हा एकनाथ जे प्रश्न विचारी त्याची उत्तरें देणें गुरुजींना कठीण जात असे.



एकनाथ चौदा-पंधरा वर्षांचा झाला असेल. एके सकाळी एकनाथ व चक्रपाणि घराच्या ओट्यावर बसले होते. समोरून एकनाथाचे गुरुजी आले. त्यांना प्रणाम करून एकनाथ आंत निघून गेला. एकनाथाची लहानगी मूर्ति प्रसन्नपणे निरखून, गुरुजी म्हणाले : 'चक्रपाणिजी! मी एकनाथाला शिकवतो, तो केवळ पोट भरण्यासाठीं नव्हे....'

चक्रपाणीला गुरुजींच्या म्हणण्याचें आश्चर्य वाटलें. तो पटकन् म्हणाला : 'नाथाच्या हातून कांहीं मूर्खपणा घडला कां? असें आपण वांकडें कां बरें बोलता?'

'नाथाच्या हातून मूर्खपणा! छे! नाहीं नाहीं! ही तर **न भूतो न भविष्यति** गोष्ट आहे. तुमचा एकनाथ म्हणजे विवेक व विनय यांचा संगम आहे! प्रज्ञा व नम्रता यांचा त्याच्या जीवनात समन्वय झालेला आहे.'

'मग तुम्ही असें कां बोलता?'

'खरें सांगूं कां? तुमच्या या नाथाला शिकविण्यासारखें माझ्याकडे कांहींच शिल्लक राहिलेलें नाहीं.'

जुन्या काळची माणसें किती प्रांजळ व प्रामाणिक होती! गुरुजींची ही नम्रता पाहून एकनाथ धावत आला. त्याने गुरुजींना नमस्कार केला. गुरुजींची नम्रता पाहून त्याचे नेत्र कृतज्ञतेने भरून आले. शास्त्रीजीनी दोन्ही हात पकडून त्याला उभा केला. पाठीवरून प्रेमाने हात फिरविला व म्हटलें : 'नाथा! मी अनेक शास्त्रें शिकलो आहे. परंतु तुला शिकवायला माझ्याकडे कांहीं बाकी नाहीं. तू खात्री बाळग. तुला कोणी तरी दैवी गुरु भेटेल. तो तुझें जीवन सोन्याचें बनवील.'

गुरुजींनी त्याच्या डोक्यावर हात ठेवला. प्रेमाने आशीर्वाद दिला व भारावलेल्या अंत:करणाने त्यांनी निरोप घेतला.

एकनाथाची प्रज्ञा जबरदस्त होती. कोणत्याही विषयाची पकड तो अर्ध्या क्षणात घेत होता. नम्रता व विवेक यांचा तो आदर्श होता. त्याची

वृत्ति अतिशय समाधानी होती. कोणत्याही गोष्टीबद्दल कधीही त्याने हट्ट धरला नव्हता. आजी जें देईल, जें वाढील तें खायचा. त्याच्या आजोबा-आजीची हीच व्यथा होती. मुलाचा हट्ट पुरा करण्यात एक वेगळ्याच प्रकारचा आनंद असतो. पण मुलगा हट्टच धरीत नसेल तर तो आनंद संसारात कुठून बरें मिळेल?

एकनाथ कधीच हट्ट करीत नसे. तो आजोबा-आजीजवळ कांहींच मागत नसे. त्यामुळें आजोबा-आजीला या भरल्या घरात कांहीं उणें उणें वाटत होतें. एकनाथाने एकदा तरी हट्ट धरावा याची ती उत्सुकतेने वाट पाहात असत.

एकनाथासमोरही एक अजब प्रश्न उभा होता. चौदा वर्षांच्या लहानशा वयात तो सर्व शिकून मोकळा झाला होता. शिकायला आता कांहीं बाकीच नव्हतें व वय तर इतकें लहान होतें, कीं दुसऱ्या कुणाला तो शिकवूंही शकत नव्हता. त्यामुळें पुढें काय करावें या त्याच्या प्रश्नाचें निराकरण होत नव्हतें.

त्याच्या गांवच्या बाहेर एक शंकराचें मंदिर होतें. रोज सकाळीं तो तिथे जायचा. नदी किनारीं बसायचा. पक्षांचा मधुर कलरव ऐकायचा आणि दोन-चार तास सैर-सपाटा करून तो घराकडे परत फिरायचा.

पण असें हें किती दिवस चालणार? तो बुचकळ्यात पडला. त्याच्या समोर फार मोठी समस्या निर्माण झाली. आता करायचें काय? आपला प्रश्न विचारायचा कोणाला?

एक दिवस तो शिवालयाच्या गाभाऱ्यात जाऊन बसला. शिवलिंगावर मस्तक ठेवून रडला. 'भगवंता! तुझ्याजवळ पुष्कळ लोक स्वत:च्या समस्या घेऊन आले असतील. त्यात माझी समस्या कांहीं विचित्रच आहे. प्रभो! तू माझी ही समस्या समजून घे. मी लहान आहे त्यामुळें शिकवूं शकत नाहीं आणि गुरुजी म्हणतात : शिकण्यासारखें मला कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. भगवंता! माझी ही अगदी केविलवाणी स्थिति आहे. तू मला रस्ता दाखव. तू मला ज्ञान दे.'



भगवान् शंकर म्हणजे ज्ञान स्वरूप. त्यांची मूर्ति म्हणजे ज्ञानाचें प्रतीक! त्यांच्या डोक्यातून ज्ञानगंगा वाहाते. शुभ्र बर्फाच्छादित पर्वताच्या बैठकीवर तो बसला आहे. ज्याची बैठक उंच, त्याच्या जीवनाची बैठक उंच व भव्य असते, ज्याचें जीवन बर्फासारखें शुभ्र असतें तो गुरु होऊं शकतो. सुशीलतेता चंद्र ज्याने डोक्यावर धारण केला आहे. काम, क्रोध, लोभ वगैरे जहरी सर्पांना निर्विष बनवून निर्भयतेने ज्याने गळ्यात धारण केले आहेत, भस्माला जो वैभव समजतो, स्मशानात ज्याचें वास्तव्य आहे, असा तो ज्ञानराणा शंकर- जो भूतपिशाच्चांना जवळ घेतो तो आपणाला स्वत:जवळ घेणार नाहीं? असें त्याच्या मनात विचारचक्र चाललें होतें.

एकनाथाची भगवंताजवळ एकच मागणी होती : 'भगवंता! आता तू मला शिकव. जीवनात ज्याने दुसऱ्याकडे कधी व कांहींही मागितलें नाहीं तो एकनाथ आज काकुळतीला येऊन भगवंताकडे मागणी करीत करीत होता! भगवंताने शिकवावें म्हणून हट्ट धरून बसला होता! त्याचें अंत:करण भरून आलें. डोळ्यांतून टपटप् पडणाऱ्या अश्रूंनी शिवलिंगावर अभिषेक झाला. भगवंताला एकनाथाची करुणा आली. गाभाऱ्यात घुमत असलेला आवाज त्याच्या कानीं आला : 'एकनाथा! तुला गुरु पाहिजे ना! मग तू देवगिरि पर्वतावर जा. तिथल्या जनार्दनस्वामींना तू आपला गुरु बनव.'

भगवंताचा हा आवाज ऐकून एकनाथ खूष झाला. पण दुसऱ्याच क्षणीं त्याचें वदन म्लान झालें. शेकडों मैल दूर देवगिरि पर्वत आहे. त्याकाळीं आजच्यासारखी वाहनें अथवा दुसरें कांहीं साधन नव्हतें. सारा पायीं प्रवास होता आणि आजोबा-आजीची माया तोडून जायचें होतें.

त्याला देवाने मार्गदर्शन केलें म्हणून आनंद झाला. परंतु आजोबा-आजीला सोडण्याचा विचार येताच त्याचें मन उद्विग्न झालें. त्याचें मन द्विधा बनलें.

एक मन म्हणे : 'भल्या माणसा! प्रत्यक्ष शंकराने मार्गदर्शन केल्यावर आजोबा-आजीची कसली चिंता करतोस?' त्यावेळीं दुसरें मन

सांगे : 'गोष्ट खरी आहे पण आजोबा-आजीला सोडून कसें जायचें? त्यांच्या प्रेमावर वृद्धापकाळीं आघात करणें ठीक नव्हे. मीच तर त्यांचें सर्वस्व आहे, मग मीच जर गेलो तर त्यांना काय वाटेल?'

ममता मायेत पाडीत होती. ज्ञान व जीवनविकासाची अभिलाषा म्हणत होती: 'पळून जा!'

मोठ्या माणसांच्या जीवनात नेहमी असले नाजुक प्रसंग येतात. मन द्विधा होतें. अर्जुनासमोर असाच नाजुक प्रश्न होता : 'लढूं की न लढूं!'

रोजच्याप्रमाणे एकनाथ घरी परत आला. त्याचें मन अगदी खिन्न होतें. चेहरा उद्विग्न बनला होता. आजीला वाटलें : हा मुलगा रोज हसत, नाचत घरी येतो. आज असें काय झालें? कधी नाहीं तो आजच असा गप्प कां? रडणारांना हसवणारा हा मुलगा स्वत: कां रडतोय?

आजीने विचारलें : 'नाथ! बाळा डोकें दुखतें कां तुझें? प्रकृति ठीक आहे ना?'

'मला कांहीं होत नाहीं; आजी!' असें म्हणून एकनाथ गप्प राहिला. जेवायला बसला तो सुद्धा गप्पच. जेवल्यानंतरही त्याचें मौन तसेंच. आजीने अंथरून दिलेल्या अंथरुणावर तो तोंड फिरवून चुपचाप झोपी गेला.

झोपता झोपता त्याचें मन एकच विचार करीत होतें. इथून जाऊं कसा? माझ्याबरोबर कोण येईल? आजोबा-आजीचें कसें होईल? या विचारांनी त्याला झोप येत नव्हती. डोळे मिटून चुपचाप तो अंथरुणात पडून राहिला.

चक्रपाणि घरी आला तेव्हा आजी म्हणाली : 'पहा तर खरें; नाथाला काय झालेंय तें! कधी नव्हे तो आज चेहरा अगदी उतरलेला दिसतोय. काय झालें कळत नाहीं. व्यवस्थित जेवला सुद्धा नाहीं. रोजच्याप्रमाणे हसून-खेळून बोलत नाहीं.' म्हणता म्हणता कांहीं अशुभ शंकांनी तिचे डोळे भरून आले.



चक्रपाणि म्हणाला : 'आपण अतिशय लाडात व प्रेमात एकनाथाला लहानाचा मोठा करीत आहोत. तो सगुण भगवंत आहे अशी दृष्टि ठेवून आपण त्याला वाढवीत आहोत. परंतु जग थोडेंच असें मानणार! कुणी तरी म्हटलें असेल : आई ती आई व आजी ती आजी! आई-बापांची सर आजीला थोडीच येणार! त्यामुळें त्याचें मन उद्विग्न झालें असेल. तू काळजी करूं नकोस. सकाळीं झोपून उठला कीं रोजच्याप्रमाणे हसूं लागेल.'

पण एकनाथाच्या डोळ्यांना झोप शिवली नाहीं. त्याचें मन मोकाट सुटलें होतें. काय करावें याचा निर्णय तें घेऊं शकत नव्हतें. माया-ममता त्याच्या जाण्याआड येत होती. त्याचा घराचा ओढा वाढवीत होती व ज्ञानपिपासा त्याला घराबाहेर खेचत होती.

ज्याने आजोबा-आजीच्या आंतरिक प्रेमाचा अनुभव घेतला असेल त्यालाच कळेल, कीं हे नाजूक प्रेमतंतु तोडणें किती मुष्किल आहे! शेवटी त्या हो-नामध्ये एकनाथाच्या ज्ञानपिपासेने ममतेवर विजय मिळविला. तो चांदण्या रात्रीं आजोबांजवळ गेला. अंत:करणापासून त्याने झोपलेल्या आजोबांना नमस्कार केला. न सांगता जातोय म्हणून मनापासून त्यांची माफी मागितली. आजोबा-आजी झोपलेली आहेत तोपर्यंत या घरातून बाहेर जाणें शक्य आहे. ती जागी असताना त्यांच्या डोळ्यांना डोंळा भिडविणें किंवा त्यांचा निरोप घेणें एकनाथला अशक्य वाटत होतें.

तो हळुवार पावलांनी आजीच्या अंथरुणाजवळ गेला. आजीला नमस्कार केला. त्याचें अंत:करण भरून आलें. त्याने भगवंताला प्रार्थना केली : 'भगवंता! तू मला शक्ति दे! माझी दुसरी कांहींच इच्छा नाहीं. माहीत नाहीं, मी केव्हा परत येईन! परंतु भगवंता! जेव्हा मी माघारी येईन तेव्हा मला माझी आजोबा-आजी भेटावीत, असें कर.'

अश्रू पुशीत तो घराबाहेर पडला. गोठ्यात येऊन गाईच्या पायां पडला. प्रेमाने तिच्या शरीरावरून हात फिरवीत तो म्हणाला : 'उद्यापासून तुला गवत घालायला मी नाहीं. पाणी पाजायला देखील नाहीं. मला क्षमा

कर.' आणि तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. अश्रूंच्या रूपाने त्याचें अंत:करण वाहून चाललें होतें.

आजोबा-आजीचा प्रेमतंतु तोडून तो चालूं पडला.....

चक्रपाणीने सकाळी उठून पाहिलें एकनाथ अंथरुणात नव्हता. वाडीत गेला असेल असें समजून त्याने आपल्या लहानशा वाडीत तपास केला. नाथ तिथे नव्हता. कधी कधी शंका समाधानासाठीं तो गुरुगृहीं जात असे. म्हणून तिथे तपास केला. एकनाथ तिथे पण नव्हता. शिवालयातही एकनाथाचा पत्ता लागला नाहीं.

सर्व ठिकाणीं तपास केला पण एकनाथाचा मागमूस नाहीं. सर्वजण जमा झाले. आजीच्या डोळ्यातून श्रावण-भाद्रपदातील सरी वाहूं लागल्या. रडता रडता ती म्हणत होती : 'नाथा! बाळा, तुला जायचेंच होतें तर तुझ्या म्हाताऱ्या आजोबा-आजीला सांगून कां गेला नाहीस?'

चक्रपाणि हताश झाला. त्याच्या सर्व मनीषांवर पाणी फिरलें होतें. जणूं त्याचें चैतन्यच हरवलें होतें. 'बाळा! कधी नाहीं तो आजच असा अविवेकी कां बनलास! सांगून तरी जायचें होतें. बाळ! तुला कुठून माहीत असणार? नातू म्हणून नव्हे, तर साक्षात् बाळकृष्ण समजून तुला लहानाचा मोठा करीत आहोत. अशा रीतीने जाताना आमची थोडी सुद्धा माया आडवी नाहीं आली?.... काय करणार! देवाला आवडेल तें खरें!' असें समजून त्याने समाधान मानलें. भिजलेले डोळे पुसले. मनाचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला.

एकनाथाची आजी चक्रपाणीला म्हणाली : 'नाथ गेला! आता कोणासाठीं जगायचें? आजपर्यंत त्याला समोर पाहात दिवस घालवीत होतो. आता आपण देहत्याग करावा. या घरात माझ्याने रहावत नाहीं. नाथ नसलेलें हें घर खायला येतेंय.' बोलता बोलता ती रडूं लागली.

'तुझें म्हणणें खरें आहे. पण जरा विचार करशील की नाहीं? एकनाथ आज बाहेर गेला आहे. त्याला वाटेल त्यावेळीं तो परत येईल. केवढ्या मोठ्या आशेने तो आपल्याला भेटायला येणार! त्यावेळी आपण त्याला दिसलो नाहीं तर त्याला किती दु:ख होईल! त्याला दु:ख होता कामा नये यासाठीं आपण जगलें पाहिजे. त्याच्या मनावर आघात न व्हावा यासाठीं आपण जगलें पाहिजे.'



चक्रपाणि स्वत:च्या वृद्ध पत्नीचें समाधान करीत होता. त्याच्या एका डोळ्यात कृतकृत्यतेचे अश्रू तरळत होते तर दुसऱ्या डोळ्यात वियोगाचें दु:ख सामावलें होतें. एकाच वेळीं, एकसाथ कृतकृत्यतेचे आणि वियोगाचे अश्रू फक्त महापुरुषांच्या नेत्रांतच दिसूं शकतात.

....जनार्दनस्वामी देवगिरि पर्वतावर रहात होते. ते श्रीमंत, संत, शूर व ज्ञानी होते. आपली अशी भ्रामक समजूत आहे कीं संत श्रीमंत होऊंच शकत नाहीं. आपल्या दृष्टीने संत म्हणजे झोपडीत राहाणारा, लंगोटी नेसून फिरणारा, बिचारा, बापडा असला पाहिजे. परंतु ही वैदिक धारणा नव्हे. भारतीय संस्कृतीमध्ये संत दीन, दुबळा, बिचारा, बापडा होऊंच शकत नाहीं. याज्ञवल्क्यांच्या घरीं लक्षाधीश हिशोब लिहायला होते. वसिष्ठ साठ-साठ हजार विद्यार्थ्यांचें तपोवन चालवीत होते.

विदुराला लोक कंगाल म्हणतात. हें अनैतिहासिक आहे. विदुर तत्कालीन भारताचा मुख्यप्रधान होता. त्याला खायची पंचाईत होती असें म्हणणें किती हास्यास्पद आहे! त्याने स्वत:च्या अक्कलहुशारीने धृतराष्ट्राने रचलेल्या षड्यंत्रातून पांडवांचा बचाव केला होता.

सर्वसामान्यपणे आपल्याकडे जेव्हा मोठा माणूस जेवायला येतो तेव्हा आपण म्हणतो : आज या गरिबाची झोपडी पावन झाली. याचा अर्थ असा नव्हे कीं आपण झोपडीत राहातो. त्याचप्रमाणें जेवणामध्ये पांच-सात मिष्टान्न बनवूनही आपण म्हणतो : 'भाकरी खायला चला.' अलौकिक महापुरुष आपल्या घरीं येतात त्यावेळीं असें बोलणें ही एक प्रकारची नम्रता आहे. त्याचप्रमाणें विदुराने भगवान् श्रीकृष्णाला तसें म्हटलें याचा अर्थ असा नव्हे, कीं विदुर कंगाल होता.

जनार्दनस्वामींचें जीवन लोकोत्तर होतें. ते मूळ चाळीसगांवचे वतनी. आश्वलायनसूत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. ते खऱ्या अर्थानें महान् होते. स्वत:च्या कर्तृत्वाने ते देवगिरीचे अधिपति बनले. देवगिरि परगण्याची सारी व्यवस्था ते पहात असत. न्यायदान करीत असत. त्यांचें वर्तन अतिशय शुद्ध, न्यायी आणि सौजन्यपूर्ण होतें. त्यांचा जीवन सौरभच असा होता कीं राजा देखील त्यांचा शब्द प्रमाण मानत असे. बादशहा त्यांना गुरु समजत असे. जनार्दनस्वामींच्या रूपात गडावर जणूं क्षात्रतेज आणि ब्रह्मतेज मूर्तिमंत नाचत होतें! सर्वसामान्यपणे आपल्यामध्ये महान् माणसाकरिता एक विचित्र समजूत असते. महान् माणूस गवतावर झोपतो, नाक दाबून बसतो, लंगोटी नेसून फिरतो, लक्ष्मी व पैसा यांच्यापासून दूर पळतो वगैरे. परंतु भारतीय संस्कृति तर लक्ष्मीची पूजा करते. लक्ष्मीला नारायणाच्या जोडीला बसविते. म्हणून महान् तो कीं जो लक्ष्मी पाहून पळत नाहीं, प्रलोभनांना डगमगत नाहीं. भवसागरात तुफानें व वावटळी उडाल्या तरी स्वत:ची जीवननौका बरोबर निश्चित दिशेला हाकारूं शकतो. जनार्दनस्वामींचें अशा तऱ्हेचें महान् जीवन होतें. त्यांची खुमारी कांहीं औरच! रोज चित्तएकाग्र करून भगवंताचा पावन स्पर्श अनुभवणें, आर्त लोकांना साहाय्य करून त्यांची आर्तता दूर करणें, रडणाऱ्या लोकांना हसतें नाचतें बनण्यासाठीं प्रेरणा देऊन जीवनातील सोसाट्याच्या वाऱ्यासोबत लढायला शिकविणें व बहुजन समाजाला ईश्वराभिमुख बनविणें हें आपलें परम कर्तव्य आहे, असें ते समजत.

ते राज्याधिकारी होते तसेच परमार्थी पण होते. ते शूर होते तसेच ज्ञानी सुद्धा होते. ते राजमान्य होते, लोकमान्य होते व ईशमान्य देखील होते.

कित्येक लोक राजमान्य असतात पण लोकमान्य नसतात. कित्येक राजमान्य व लोकमान्य असले तरी ईशमान्य नसतात. **सहस्राणाम् कश्चित्।** - लाखोंमध्ये कोणी एखादाच असा असतो, कीं जो ईशमान्य, लोकमान्य व राजमान्य असतो. जनार्दनस्वामी त्यांच्यापैकी एक होते. शेकडों लोक त्यांच्याजवळ येत. प्रत्येकाची अलग-अलग अडचण असे.



त्या प्रत्येकाच्या अडचणीचें ते समाधान करीत, प्रत्येकाला प्रेमाने धीर देत व लोकांची हृदयें जिंकीत.

भगवंताने दिलेल्या आदेशानुसार स्वत:च्या गुरूबद्दलचा विचार करीत मोठ्या उत्साहाने एकनाथ आपला बिकट रस्ता कापीत कापीत पुढें पुढें चालला होता. चक्रपाणीने त्याला फुलासारखें जपलें होतें. इतकें चालण्याची आणि इतक्या संकटांची त्याला सवयच कुठे होती? दुपारच्या उन्हाने तो सुकोमल बालक घामाने 'पाणी पाणी' होई, पाय पोळून निघत. काटे कुटे बोचल्याने पाय रक्तबंबाळ झाले होते. तर शिशिर ऋतूतल्या त्या रात्रींत अंग जखडून जाई. तरीही सद्गुरु मिलाप साधण्याचा त्याचा निश्चय अढळ होता. कठोर साधनेशिवाय ध्येयसिद्धि प्राप्त होत नाहीं ही आजोबांनी सांगितलेली गोष्ट त्याच्या मनाला धीर देत असे. गुरूचें काल्पनिक चित्र नजरेसमोर उभें करून तो त्यांना मनोमन नमस्कार करीत होता. अशा रीतीने मजल दरमजल करीत एक दिवस तो देवगिरि पर्वतावर येऊन पोचला.

दुरूनच जनार्दनस्वामींनी एकनाथाला त्यांच्याजवळ येताना पाहिलें. त्याच्या अंगांतील मळलेले कपडे व शरीरावर चढलेली धूळ साक्ष देत होती, कीं तो फारच दुरून आलेला असावा. एकनाथाने जनार्दनस्वामींना पाहिलें. त्यांना पाहाताच त्याला वाटलें : हा कोणी तरी चिरपरिचित चेहरा आहे. जन्मजन्मांतरीची ही ओळख तर नसेल ना! तो अनिमेष नेत्रांनी जनार्दनस्वामींना पाहात राहिला. तो स्वत:ला विसरला. जनार्दनस्वामींचा डोळ्याला डोळा भिडताच तो स्वत:च्या अशा या वर्तनाबद्दल शरमिंदा झाला. एकनाथाने त्यांना नमस्कार केला. जनार्दनस्वामींनी उठून त्याला स्वत:जवळ घेतलें त्यांच्या नेत्रांत करुणा उभी राहिली. त्यांच्या या सहज स्पर्शानें एकनाथाचें अंगन् अंग पुलकित झालें. त्याला स्वत:चें जीवन धन्य वाटूं लागलें.

'तू इथे कशासाठीं आलास?' जनार्दनस्वामींनी विचारलें. परंतु प्रश्नाकडे एकनाथाचें लक्ष नव्हतें. तो अनिमेष नेत्रांनी त्या महान् संताचें

दर्शन करीत होता. कारुण्य, वात्सल्य व ममता यांचा हा साक्षात् अवतार पाहून तो बोलायचें विसरून गेला.

कोणाच्या जीवनात फक्त ज्ञान असतें, कोणाच्या जीवनात फक्त भक्तीच असते तर कोणाच्या जीवनात फक्त कर्मच असतें. पण जनार्दन स्वामींच्या जीवनात ह्यांचा त्रिवेणीसंगम होता.

जनार्दनस्वामींनी एकनाथाला हालवून त्याला त्याच्या विचारतंद्रीतून जागृत केलें. मग विचारलें : 'तू इथे कशासाठीं आला आहेस?'

एकनाथाने जनार्दनस्वामींना नमस्कार करून म्हटलें : 'प्रभु! मी आपल्या जवळ रहायला आलो आहे. माझें शिष्यत्व आपण स्वीकारावें.'

'माझा शिष्य व्हायला तुला कोणी सांगितलें?' जनार्दनस्वामींनी विचारलें.

'आमच्या गांवच्या बाहेर एक भगवान् शंकराचें मंदिर आहे. त्या मंदिरातील शिवलिंगाने मला आदेश दिलेला आहे. म्हणून मी आपणाकडे आलोय.' एकनाथ म्हणाला.

'शिवलिंग कधी बोलत असेल!' म्हणत जनार्दस्वामींनी एकनाथाची उपेक्षा केली.

जनार्दनस्वामींकडे यायला निघाल्यापासून एकनाथाला आजोबा-आजींची आठवण येत होती. परंतु देवगिरीवर आल्यानंतर, जनार्दनस्वामींचें दर्शन केल्यावर तो तें सारें विसरून गेला. आता एकनाथ जनार्दनस्वामींजवळ राहूं लागला.

जनार्दनस्वामी कसे राहातात, काय करतात वगैरे सर्व तो पाही. माहीत न झालें तर हळूच कोणाला तरी विचारी. त्यांचें जीवन वाचीत व तपाशीत तो जीवनाचे पाठ घेत होता. पण एक गोष्ट त्याला सतत बोचत होती : गुरुजींनी जाणूनबुजून आपल्याला दूर कां ठेवलें आहे? आपलें शिष्यत्व त्यांनी कबूल कां केलें नाहीं?



हळूहळू तो गुरूचें कार्य समजूं लागला. त्यांचें काम करण्याची संधि मिळताच तो झट्कन् तें काम पुरें करूं लागला. थोड्याच दिवसांत जनार्दनस्वामींची सारीच कामें त्याने हस्तगत केली.

एक दिवस एकनाथ हिशोब करीत बसला होता. पण हिशोब बरोबर जुळत नव्हता. हिशोबांत एक पैची चूक येत होती. ती शोधण्यासाठीं तो इतका एकाग्र झाला होता, कीं किती रात्र निघून गेली, याचें त्याला भान उरलें नाहीं.

सरत्या रात्रीपर्यंत एकनाथाच्या खोलीत दिवा जळत असलेला पाहून जनार्दनस्वामी कुतूहलाने पाहाण्यासाठीं आले. एकनाथ काय करीत असेल? त्यांच्या मनात प्रश्न उठला. त्यांनी पाहिलें : एकनाथ एकाग्र बनून हिशोब करीत होता. तेवढ्यात त्याने अचानक टाळी वाजविली आणि म्हणाला : 'मिळाली!'

'तुला मिळवायचें होतें तें कधीच मिळालेंय, एकनाथा!' म्हणत गुरुजी गालात हसले. एकनाथाची ती कार्यनिष्ठा पाहून ते प्रसन्न झाले होते. व्यवहारी दृष्टीने पाहाता एकनाथाने एका पैची चूक शोधून काढण्यासाठीं आठ आण्याचें तेल जाळलें होतें.

गुरुजींचा आवाज ऐकताच एकनाथ चमकला. तो म्हणाला : 'ही फक्त पैची चूक मिळाली आहे!'

'बाकीही मिळतील! फक्त एका पैची चूक मिळवण्यासाठीं तू इतका झटलास तितक्याच उत्कटतेने तू प्रभु मिळवण्यासाठीं झटलास तर आनंदाचा सागरच सापडेल.' जनार्दनस्वामींनी त्याला आश्वासन दिलें.

जनार्दनस्वामींनी त्याला मिठी मारून असीम प्रेमळ शब्दात सांगितलें 'आता सूर्योदय होण्याला थोडाच अवधि बाकी आहे. त्याचप्रमाणे तुझी अक्षुण्ण भक्ति लवकरच तुला परमेश्वरी साक्षात्कार करवेल.' त्या दिवशी उगवत्या सूर्यनारायणाच्या साक्षीने जनार्दनस्वामींनी मस्तकावर प्रेमळ व पवित्र हात ठेवून एकनाथाला अनुग्रहित केलें.

त्या दिवसापासून नाथाने गुरुसेवेची कमाल मर्यादाही ओलांडली. जनार्दनस्वामी त्याला साक्षात् परब्रह्म वाटत. गुरुसेवेमध्ये त्याचें 'मी'पण खलास होताच त्याच्यात सर्वात्मभाव जागृत झाला. गुरुसेवेसाठीं हा देह झिजवून सर्वस्वाचा होम करण्याची इच्छा जागृत झाली. जणूं भगवंताने त्याची ती इच्छा जाणली आणि लवकरच त्याला तशी संधि लाभली.

दर गुरुवारी स्वामी सगळा कारभार सोडून पर्वतावर एकान्त स्थळीं जाऊन ईशचिंतनात तल्लीन होऊन बसत असत. त्यांचें तें स्थळ अतिशय पवित्र होतें. तेथील निसर्ग रमणीय व मनोहारी होता. तिथे येऊन ते निर्गुण ईश्वराच्या स्पर्शाने पावन होत असत. त्यांच्याशिवाय त्या पवित्र जागीं दुसरा कोणी जात नसे.

एक दिवस जनार्दनस्वामी नेहमीप्रमाणें चित्त एकाग्र करण्यासाठीं त्यांच्या नेहमीच्या जागीं गेले होते. शत्रुपक्षाने या संधीचा फायदा घेऊन त्यांच्या दुर्गावर हल्ला केला. जनार्दनस्वामी दुर्गावर नाहीत याचा त्यांनी फायदा घेतला.

गुरुकार्य करण्याची ती अमोल संधि होती. एकनाथाने ती वाया जाऊ दिली नाहीं. शौर्याने लढाई केली व परक्या शत्रूचा पराभव केला.

परक्या शत्रूचा पराभव केला म्हणून शुक्रवारी बादशहा मोठा नजराणा घेऊन जनार्दनस्वामींना भेट देण्यासाठीं आला. अनपेक्षित घडलेल्या या घटनेची जनार्दनस्वामीना खबर नव्हती. तिथे जमलेल्या लोकांपाशी चौकशी करता समजलें : परक्यांना पराभूत करण्यासाठीं दाखविलेली वीरता एकनाथाची होती. नाथाचें शौर्य पाहून परका शत्रु पळून गेलेला होता. तें ऐकून जनार्दनस्वामींनी एकनाथाला म्हटलें : 'शाबास बाळ! तुझ्यामुळें आज आपल्या दुर्गाचें रक्षण झालें!'

'प्रभो! मी एक सामान्य दगड! एवढ्या मोठ्या शत्रूचा पराभव करण्याची शक्ति माझ्यात कुठून येणार! ही आपलीच शक्ति होती. मी निमित्त ठरलो झालें!'



हेंच तें जीवनाचें कौशल्य. एकनाथाने एवढा मोठा पराक्रम केला पण त्याबद्दल चुकूनही बढाई मारली नाहीं. जीवनातील ही एक महान् कला आहे. आपण कार्य करतो भगवत् शक्तीने; पण गर्व मिरवतो, आपण केलें म्हणून! भगवंताच्या हातचें हत्यार बनणें आपणास आवडत नाहीं! एकनाथ गुरूच्या हातचें हत्यार बनला. तो व्यवहारकुशल, चतुर, शूर, ज्ञानी, भक्त, स्थितप्रज्ञ जनार्दनस्वामींबरोबर राहून कृतकृत्य झाला.

सर्वसामान्यपणे आध्यात्मिक गुरु मिळणें कठीण असतें. जसा गुरु महान व अधिकारी, तसाच शिष्यसुद्धा महान्, अधिकारी असला पाहिजे.

जनार्दनस्वामींना असला महान् व अधिकारी शिष्य मिळताच त्यांचें हृदय भरून आलें. त्यांनी एकनाथाला म्हटलें : 'नाथा! तू मला खरा अधिकारी शिष्य मिळाला आहेस. तुला पाहताच मला आनंदाचें भरतें येतें!' आपल्या जीवनात ज्यांनी शिष्य म्हणून कुणाला जवळ केलें नव्हतें त्या जनार्दनस्वामींनी त्याला शिष्य बनवलें होतें. त्यामुळें त्याचें अंत:करण पुलकित झालें होतें. जीवनातील कृतकृत्यता तो अनुभवीत होता. ज्या क्षणाची चातकदृष्टीने एकनाथ वाट पहात होता तो क्षण आज त्याच्यासमोर उभा होता.

जनार्दनस्वामींनी म्हटलें : 'चल माझ्या बरोबर. आज तुझें जीवन सफल होईल.'

जनार्दनस्वामींनी त्याला सोबत घेतलें व ते आपल्या एकांत स्थळीं आलें. जनार्दनस्वामींच्या या तीन मैलांच्या एकान्त जागेत कोणीही जात नसे. जिथे भगवंताचा पवित्र स्पर्श होणार ती जागा किती पवित्र असली पाहिजे! क्षुद्र श्वासोच्छ्वासापासूनही ती दूर असली पाहिजे. म्हणून तिथे जायला सर्वांना मनाई होती.

एकनाथाला घेऊन जनार्दनस्वामी तिथे आले. एकनाथाला अलौकिक आनंद झाला. गुरूचें अंत:करण त्या दैवी मस्तीत मिसळून गेलें. दोघे गप्पागोष्टी करीत फिरत होते. तेवढ्यात एक अवलिया (मुसलमान साधु) जवळ आला व त्याने पाणी मागितलें.

जनार्दनस्वामींनी त्याला एका प्याल्यातून पाणी दिलें. तो थोडें पाणी प्यायला व निघून गेला. बाकी राहिलेलें पाणी जनार्दनस्वामी स्वत: प्यायले, एकनाथाने विचारलें : 'गुरुजी, तुम्ही उष्टें पाणी प्यालात?'

गुरुजी म्हणालें : 'नाथा, तुला मी सांगून ठेवलें होतें ना, कीं लक्ष ठेव, कुठल्या रूपात भगवंत येईल समजणार नाहीं.'

एकनाथाला खूप दु:ख झालें. साक्षात् भगवान्, कालोऽस्मि लोकक्षयकृत प्रवृत्त: आला, माझ्याजवळ उभा राहिला, पाणी मागितलें पण मला पामराला ओळख पटली नाहीं.

'भगवंता! मी इतका दुर्दैवी! इतका अभागी! तू माझ्यासाठीं आलास व मीच तुला ओळखलें नाहीं.'

एकनाथ खिन्न झाला. अगदी जवळ येऊन गेलेल्या दत्तप्रभूला आपण ओळखूं शकलो नाहीं. याचें त्याला अतीव दु:ख झालें. गुरुदेवांसोबत तो चालूं लागला.

थोड्या अंतरावर गेल्यावर स्वामी उभे राहिले. तिथे सहस्त्रलिंग सरोवर होतें. त्या सरोवराच्या समोर एक विशाल वटवृक्ष आपल्या शेकडों फांद्या व पारंब्यांनी विस्तारला होता. त्या वटवृक्षाच्या पायथ्याशी एक शुभ्रवर्णी स्फटिकशिळा होती. वृक्षाच्या घनदाट विस्तारामुळें ती स्फटिकशिळा सदैव सावलीमध्येच राही. वडाच्या आधाराने फुललेल्या लतावेली नेहमी त्या स्फटिकशिळेवर विविधरंगी फुलांची पखरण करीत असत. असें नितांत रमणीय स्थळ नाथाने आज प्रथमच पाहिलें. त्या रमणीयतेच्या मोहिनीने नाथ प्रसन्न चित्ताने खाली बसला. त्याच्या मस्तकावरून स्वामींनी प्रेमाने हात फिरवला आणि दूर झाले. तल्लीनतेमध्येच नाथाची भावसमाधि लागली. मन:चक्षु खोलले तेव्हा त्या स्फटिकशिळेवर दत्तात्रेयांची तेजोमय मूर्ति उभी होती. त्या कांतीने दशदिशा प्रकाशित झाल्या होत्या. मूर्तीच्या अंगावर दिव्य अलंकार शोभत होते. हातांत आयुधें होती. मस्तिष्कावर जटा, गळ्यात रुद्राक्षांच्या माळा, कपाळीं केशरी चंदन, सतेज नेत्र, कमानदार भ्रुकुटि, आरक्त अधरोष्ठ!



सद्गुरूच्या कृपेने त्याला साक्षात् दत्तप्रभूंचें दर्शन घडलें. दत्तप्रभूंच्या दर्शनानंतर एकनाथाला काय वाटलें असेल त्याचें शब्दात वर्णन कसें होईल? अंगावर रोमांच आणि चित्त आनंद सागरात चिंब.....

तेवढ्यात स्वामींच्या प्रेमळ स्पर्शाने नाथाची समाधि सुटली. नाथाची सुकुमार बालमूर्ति पाहून जनार्दनस्वामींच्या नेत्रांत आनंदाश्रू उभें राहिलें. दत्तप्रभूंची मूर्ति अंतर्धान पावली होती. सहस्र समयांच्या ज्योती एकदम विझून जाव्यात तसें नाथाला वाटलें. त्याला प्रभुप्रसाद लाभला होता. तो आनंदमय बनला होता. आता प्रत्यक्ष काहीं नव्हतें. नाथ गोंधळला. जें पाहिलें तें स्वप्न की सत्य? नाथाला काहींच समजेना. तो उठला आणि गुरुवर्यांना साष्टांग दंडवत घालता झाला. एका अमृतमय अनुभवामध्ये डुंबून, ईशपूजन व गुरुपूजन करून त्याचें जीवन कृतार्थ झालें.

स्वामी त्याला उद्गारले : 'एकनाथा, ऊठ! आता तुझी दीन भक्ति गेलेली आहे. तुझी भक्ति आता तेजस्वी राहील. तुझ्या भक्तीवर असलेलें लाचारीचें प्रावरण भगवान् आता दूर करणार आहे, असें त्याने मला सांगितलें आहे.'

जशी भावशून्य माणसाची सेवा घेऊं नये, तशी ज्याची समाधि लागली आहे, ज्याला ईशदर्शन झालें आहे, त्याच्याकडूनही सेवा घेऊं नये. एकनाथाला ईशदर्शन झालें होतें. आता त्याच्याकडून सेवा कशी घेणार? आणि जोपर्यंत तो आपल्याजवळ राहील तोपर्यंत सेवा करणारच; तेव्हा? जनार्दनस्वामींसमोर समस्या उभी राहिली.

पण ती फार काळ टिकली नाहीं. त्यातून त्यांनी मार्ग काढला. त्यांनी एकनाथाला म्हटलें : 'नाथा! तुला माहीत आहे ना; आत्मदर्शन झाल्यावर मूर्तीवर भाव बसत नाहीं. म्हणून तू कटाक्षाने मूर्तिपूजा चालू ठेव.' आपण भारतीय याच कारणासाठीं सगुणोपासनेला प्रथम स्थान देतो. सगुणोपासनेची शिडी घेऊन निर्गुणोपासनेपर्यंत जातो. म्हणून सगुणोपासना मजबूत ठेव. जसें विषमज्वराच्या आजारातून बरें झाल्यावर शरीराची काळजी घेतो तसेच अनंत जन्मजन्मांतराच्या आजारातून बरें झाल्यावर

काळजी घेतो तसेंच अनंत जन्मजन्मांतराच्या आजारातून बरें झाल्यावर आपलें विशुद्ध जीवन सांभाळावें लागतें. म्हणून 'तू सगुणोपासना करायला आता शूलभंजन पर्वतावर जा. तिथे मार्कंडेयस्वामींच्या आश्रमात राहून सगुणोपासना कर.' असें ते एकनाथाला म्हणाले.

दोघांनाही एकमेकांपासून अलग व्हावें असें वाटत नव्हतें. पण अलग झाल्यावाचून दुसरा इलाजच नव्हता. म्हणून एकनाथ म्हणाला : 'प्रभो! आपण सांगता म्हणून मी जातोय. पण ज्याला आपण पाठवतो त्याला त्याने परत केव्हा यायचें हेंही सांगतो. तेव्हा मी परत केव्हा येऊं?'

'जेव्हा एखादी अघटित घटना घडेल तेव्हा परत ये.' जनार्दन स्वामी म्हणालें.

एकनाथ शूलभंजन पर्वतावर गेला. तिथे त्याने पहिल्याने गुरुपूजन केलें. नंतर ईशपूजन करायला प्रारंभ केला. तिथे त्याला सद्‌गुरूंचा साक्षात्कार झाला. त्यांनी सांगितलें : 'प्रथम ईशपूजन कर व मग गुरुपूजन.'

त्या पर्वताच्या पायथ्याशी एक गांव होतें. तिथला एक गवळी रोज गाईंचें खिल्लार त्या पर्वतावर चरावयास आणीत असे. त्याने पाहिलें : विद्युल्लतेसारख्या अंगकांतीचा एक अवलिया (साधु) समाधि लावून बसला आहे. त्या गवळ्याला वाटलें आपण याला दूध द्यावें. त्याने एक भांडें आणलें. त्यात दुधाची धार काढली व तें भांडें त्याच्या पुढ्यात ठेवून तो निघून गेला. समाधीतून जागा झाल्यावर एकनाथ तें दूध प्यायला. गुरुकृपेने आपल्याला हें दूध मिळालें असें त्याला वाटलें आणि रोज त्याच पद्धतीने त्याच्यासमोर दूध येऊं लागलें.

कित्येक दिवस असाच कार्यक्रम चालला. एक दिवस तो गवळी योगायोगाने रोजच्यापेक्षा लवकर आला. त्यावेळीं एकनाथ समाधिस्थ होता. गवळ्याने आल्यावर जें दृश्य पाहिलें, त्याने तो चकितच झाला. त्याचा समज होती कीं हा कोणीतरी बुवा भटकत भटकत इथे आला असेल. पण आज त्याने ईशचमत्कार पाहिला. एक भला मोठा नाग आपल्या



फण्याने नाथाच्या मस्तकावर छत्र धरून होता आणि त्याच्या शरीराला विळखा घालून बसला होता आणि एकनाथाची तर समाधि लागलेली होती.

त्या गवळ्याने हाकारा करून एकनाथाला समाधीमधून जागवलें. नाग दाखवून घडलेली घटना सांगितली. एकनाथ मनात म्हणाला : 'प्रभु! तुझी किती असीम कृपा ही! तू या देहाला कसा कसा सांभाळतो आहेस!'

झोपेत हा देह प्रतिकारक्षम रहात नाहीं. झोपतेवेळीं सारी रात्र पंखा चालत राहिला तर सर्दी होते. शरीर जड होतें. त्याचप्रमाणे शरीरात राहणाऱ्या चैतन्याला चैतन्य भेटतें त्यावेळीं शरीरावर वाटेल तो परिणाम झाला तरी त्या परिणामाचा प्रतिकार करण्याची शक्ति शरीरात राहात नाहीं. त्यावेळीं या देहाला फारच सांभाळावें लागतें. म्हणूनच ऋषी खुल्या जागेत न बसता गुहेत बसत असत. त्यावेळीं शरीराला ऊबदारपणाची गरज असतें.

एकनाथाच्या शरीराला वेटोळें घालून सर्प त्याला ऊब देत असे. पण ही घटना अघटित होती. त्यामुळें एकनाथाला गुरूंजवळ जायला कारण मिळालें. स्वामींनी सांगितलें होतें : एखादी अघटित घटना घडली की परत ये. एकनाथ शूलभंजन पर्वतावरून परत गुरूंजवळ आला.

जनार्दनस्वामींसमोर पुन्हा समस्या उभी राहिली. असल्या या आत्मज्ञानी शिष्याकडून सेवा कशी घ्यायची? कोणत्या तरी निमित्ताने त्याला दूर पाठवलें पाहिजे.

जनार्दनस्वामी व्यवहारकुशल होते, चतुर होते, शूर होते, भक्त होते व स्थितप्रज्ञ ज्ञानी देखील होते. त्यांच्याकडे भावमय अंत:करण होतें. ते शिष्याला प्रेमाने भेटले व म्हणाले : 'नाथा! भगवंताने मला दोष दिला आहे. तो म्हणतो : एकनाथाला तू रिकामा कां बसविलास? त्याची शक्ति कामाला लाव. आज समाज लाचार झालेला आहे, बापडा बनून जगतो आहे, समाजातून दैवी भक्ति खलास झालेली आहे. आर्षभक्ति- तेजस्वी वैदिक भक्तीचें नांव पण माहीत नाहीं. देवाच्या डोळ्याला डोळा

भिडवण्याची हिम्मत कोणामध्ये राहिली नाहीं. ही वैदिकभक्ति समाजात परत उभी राहिली पाहिजे. म्हणून तू तीर्थाटनाला जा. यात्रा करीत करीत जा व लोकांना दैवीभक्तीचे विचार सांगत जा.'

'प्रभो! माझें तीर्थ आपणच आहात. तुमचे चरण सोडून दुसऱ्या कुठे जायची मला इच्छा नाहीं.'

'परंतु एकनाथा! तीर्थयात्रा झालीच पाहिजे. तू गेला नाहीस तर हे दैवी भक्तीचे विचार समाजात कोण घेऊन जाईल?' जनार्दनस्वामी म्हणाले.

'तें मला माहीत नाहीं. भले भक्ति अडकून बसली तरी मी आपलें सांन्निध्य सोडायला तयार नाहीं!' एकनाथ जरा निग्रहाने म्हणाला.

'तुझी अशीच इच्छा असेल तर आपण सोबतच तीर्थयात्रेला जाऊं. मग तर अडचण नाहीं ना?'

एकनाथाने मूक अनुमति दिली. मग दोघेही तीर्थयात्रेला निघाले. फिरता फिरता ते त्र्यंबकेश्वर क्षेत्रीं आले. तिथे भागवत वाचलें जात होतें. जनार्दनस्वामींनी एकनाथाला सांगितलें : 'आज भागवत तू वाच.'

भागवताचा भावार्थ सांगताना एकनाथाने दैवीभक्तीतील मस्ती उभी केली. लोकांची हृदयें डोलूं लागली. जनार्दनस्वामी नाथाच्या अमृतवाणीचें पान करीतच राहिले. जेव्हा भागवत वाचून पुरें झालें तेव्हा जनार्दनस्वामींनी एकनाथाला सांगितलें : 'तू भागवतावरील तुझे विचार लिहून काढ.'

एकादशस्कंधात पुऱ्या भागवताचें सार आहे. लिहिता लिहिता त्या विचारांत एकनाथ वेडापिसा झाला. साऱ्या जीवनाचें शास्त्र नाथांच्या भागवतात आहे. जीवनातील प्रत्येक समस्येचा त्यात उलगडा आहे. हेंच त्याचें वैशिष्ट्य आहे. दहाव्या स्कंधापर्यंत अंत:करण भावभरित होतें व अकराव्या स्कंधात जीवनाला पुष्टि मिळते; शक्ति मिळते. एकनाथाने भागवत लिहिता लिहिता वेद, उपनिषद यांतील विचारधारा उभी केली.



जनार्दनस्वामींचें अंत:करण या भागवताने प्रफुल्लित बनवलें. त्यांना सतत वाटत होतें : एकनाथाने आता वेगळें झालें पाहिजे. त्यातच त्याचा विकास आहे. परंतु एकनाथ त्यांना सोडायला तयार नव्हता. शेवटी त्यांनी एक मार्ग शोधून काढला. त्यांनी एकनाथाला जवळ बोलावलें व म्हटलें : 'नाथा! मला एक अगत्याचें काम आहे. म्हणून मी परत जातो. ही यात्रा तू सुरू ठेव.'

'पण प्रभो....!'

एकनाथाला मध्येच अडवून जनार्दनस्वामींनी म्हटलें : 'तुला काय म्हणायचें आहे तें मला माहीत आहे. मी तुला तुझ्या यात्रेची रूपरेखा आखून देतो त्याप्रमाणें तू फिरत जा. आपण परत भेटूं.'

गुरूने सांगितलें म्हणजे बुद्धि चालवायची नसते. एवढी प्रखर बुद्धि असून सुद्धा गुरूने सांगितल्यावर एकनाथाने अधिक विचार केला नाहीं. जनार्दनस्वामींनी आखून दिलेली प्रवासाची रूपरेखा अशी होती, कीं त्या आखीव मार्गाप्रमाणे यात्रा करता करता एकनाथ एक दिवस स्वत:च्या गांवीं आला.

गांवात आल्यावर आजोबाआजीचें वात्सल्य क्षणात त्याच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. त्यांना भेटायची उत्कंठा निर्माण झाली. आजोबा हयात असतील की नाहीं? आजी काय करीत असेल? वगैरे शंका मनात निर्माण होऊं लागल्या. त्याने गांवात दाखल होताच विचारलें : 'चक्रपाणि गांवात आहेत कां?'

'ते फार म्हातारे झाले आहेत आणि एक दिवस आपला नातू येऊन भेटेल या आशेवर जगत आहेत.' एका गांवकऱ्याने सांगितलें.

एकनाथ घरीं आला. लांबूनच आजोबा-आजीला पाहिलें. हृदय भरून आलें. दुरूनच धावत येऊन 'आजोबा!' म्हणून हाक मारीत त्यांच्या पायावर मस्तक ठेवलें आणि खूप रडला.

आज आजोबा-आजीच्या आनंदाला पारावार नव्हता. किती वर्षांनी आज त्यांचा नाथ परत आला होता. हर्षभराने त्यांचे नेत्र चमकत होतें. पुन्हा पुन्हा आजोबा-आजी विचारीत होती : 'बाळ नाथा! तू कुठे होतास? आम्हाला टाकून गेला होतास तरी कुठे तू!' आणि प्रेमाने एकनाथाच्या माथ्यावरून हात फिरवीत होती. आजीने त्याला वात्सल्याने उराशी कवटाळलें.

एकनाथ आता किशोर नव्हता. पूर्ण यौवनाच्या उंबरठ्यावर तो उभा होता. ज्ञान, भक्ति व तेज यांनी दुथडी भरून वाहणारी त्याची प्रतिभा अलौकिक होती.

'आजोबा! मला क्षमा करा. मी तुमचें व आजीचें अंत:करण दुखवलें आहे. तुमच्या आज्ञेशिवाय रातोरात घर सोडलें होतें. आजोबा! असें मी केलें नसतें तर मला जायला तुम्ही परवानगीच दिली नसतीत.' बोलता बोलता त्याचा कंठ दाटून आला. आजोबांच्या मांडीवर डोकें ठेवून तो एखाद्या लहान बालकाप्रमाणें पडून राहिला.

'नाथा! बाळा! आमच्यावर कोणता प्रसंग बेतला याची कल्पना तुला कोठून येणार? तू आजोबा होशील तेव्हाच आमची व्यथा तुला समजेल. कोणत्या आशेवर आम्ही जगत होतो तें फक्त भगवंताला माहीत! त्या भगवंतानेच आमची हृदयव्यथा जाणली व तुला परत पाठविलें. नाथा! खरोखर आज आमच्या जीवनाचें सार्थक झालें. भानुदासांची मनीषा भगवंताने पुरी केली. तुला पाहून या जीवनातील कृतकृत्यता मी अनुभवीत आहे.' आणि त्यांचे नेत्र देखील कृतकृत्यतेच्या आनंदाने चमकूं लागले.

'आजोबा! सर्व फिरलो पण तुमच्यासारखें वात्सल्यपूर्ण हृदय कुठेच सांपडलें नाहीं. पण आजोबा! हे त्रिभुवन ज्याने बनवलें, तुमच्यासारखें सोन्याचें हृदय ज्याने घडवलें त्याला पाहायला मी गेलो होतो' एकनाथाने आजोबांच्या मनाचें समाधान केलें.

'नाथा! चल; बाळा, आज तू माझ्या हाताने जेव.' म्हणत आजीने त्याचा हात पकडून त्याला उभा केला.



'नाहीं, नाहीं; आजी! आज तू माझ्या हाताने जेव.' म्हणत एकनाथ आजीला कडकडून भेटला.

चक्रपाणीच्या लहानशा घरात कित्येक वर्षांनंतर आज आनंदाचें साम्राज्य पसरलें होतें. पांच-सात दिवस लाड-कोड, वात्सल्य व ममता यांचा अनुभव घेतल्यावर एकनाथाला वाटलें. आता आपली यात्रा चालूं केली पाहिजे. तो आजोबांकडे गेला व म्हणाला : 'आजोबा आता मला निरोप द्या. भगवत्कार्य थांबलें आहे. जेवढा जास्त वेळ मी इथे राहीन तेवढा गुरूंना भेटायला अधिक विलंब होईल. आता मला जायची अनुज्ञा द्या.'

एकनाथ तीर्थयात्रेनिमित्त गांवोगांवी फिरत होता तेव्हा मधल्या काळात तीर्थयात्रेलाच बाहेर पडलेल्या, पैठणमधल्या, नाथाच्या गुरुंजींचें देवगिरीला जाणें झालें. तिथे जनार्दनस्वामींचें दर्शन घेतेवेळी, गुरुजींनी सहजच, घरातून पळून गेलेल्या एकनाथाची स्वामींकडे विचारणा केली. आणि नाथ स्वामींचा पट्टशिष्य असल्याचें समजल्यावर पंडितजींच्या आनंदाला पारावारच राहिला नाहीं. जनार्दनस्वामींनी देखील सर्व हकीकत जाणून घेतल्यावर चक्रपाणींना दिलासा देणारे आणि नाथाला पुढील काळासाठीं आदेश देणारे पत्र पंडितजींच्या हस्ते पाठवलें होतें.

आजोबा म्हणले : 'नाथा! तुला आता इथून जाण्याची गरज नाहीं. तुझ्या गुरूनेच ही आदेश-पत्रिका पाठविली आहे. तुला इथेच राहाण्याची अनुज्ञा दिलेली आहे.' आणि एकनाथ येण्यापूर्वीच जनार्दन स्वामींनी पाठविलेलें पत्र त्यांनी त्याला दाखवलें. ते पत्र तो अधीरपणे वाचूं लागला.

'तुझ्या वियोगाने शोकाकुल झालेले आजोबा-आजी तुझी फार काळजी करत आहेत. घर सोडल्याला तुला आता तेरा वर्षे झालीत. तुझी वाट पाहून त्यांचे नेत्र आता थकून गेले आहेत. वार्धक्यामध्ये तुझ्याखेरीज त्यांना कुणीही नाहीं. तूच त्यांना आधार आहेस. त्यांची सेवा करणें हाच

तुझा परमधर्म आहे. आता इथेच तीर्थयात्रा थांबव. त्यांची सेवा करणें हीच तुझी तीर्थयात्रा.'

- जनार्दन देशपांडे
मुक्काम दौलताबाद, देवगिरि.

एकनाथाने गुरूंची आज्ञा शिरसावंद्य मानली. तो स्वतःच्या गावीं राहूं लागला.

कांहीं दिवसांनंतर जन्माष्टमीचा दिवस आला. आजपर्यंत दुबळे, लाचार, रडणारे लोक परंपरेप्रमाणे चालत आलेल्या पद्धतीने जन्माष्टमीचा उत्सव साजरा करीत होते. कृष्णाची देखील रडकी भक्ति करीत होते. देवाला सुद्धा असल्या दुबळ्या, लाचार भक्तांच्या भक्तीने चीड येई व दया पण येई. परंतु स्फुल्लिंगाप्रमाणें तेजस्वी भक्त जेव्हा जन्माष्टमीचा कार्यक्रम साजरा करतात तेव्हा धावत जावें, त्यांना कडकडून भेटावें असें भगवंताला वाटणारच

एकनाथ जन्माष्टमीच्या उत्सवावर प्रवचन करीत होता. त्याच वेळीं नेमके जनार्दनस्वामी बादशहाला घेऊन तिथे आले. जनार्दनस्वामींनी पाहिलें मंदिराच्या बाहेर प्रत्यक्ष भगवान् पहारा करीत होता. त्यांनी श्रद्धेने त्याला वंदन केलें. पण भगवंताने केलेला मूक इशारा ते समजले व चुपचाप प्रवचन ऐकूं लागले.

आज जनार्दनस्वामींचें गुरुत्व सार्थकी लागलें होतें. त्यांचें अंतःकरण भरून आलें होतें. एकनाथामध्ये त्यांना चिद्घनशक्तीचें दर्शन झालें होतें. त्याची प्रासादिक, तेजस्वी, भावपूर्ण वाणी ऐकून जनार्दनस्वामी व जमलेला मानवसमुदाय आनंदाने डोलत होता.

एकनाथाने गुरूंची चरणधूळ माथीं धारण केली. 'आजोबा! याच जनार्दनस्वामींच्या चरणांजवळ बसून मी खरी भक्ति शिकलो.' असें म्हणत आजोबा-आजींना त्यांचें दर्शन घडविलें व स्वतः कृतार्थ झाला.



या महान् भक्ताचें बादशहाने पूजन केलें. त्याचा निर्वाह व्यवस्थित चालावा म्हणून त्याने एक मोठी जहागिरी अर्पण केली. लोकांनी सुद्धा त्याला खूप खूप दिलें व एकनाथ आता जहागिरदार बनला.

त्या दिवशीं जेवता जेवता आजोबा म्हणाले : 'गुरुदेव! आपल्या चरणांजवळ माझी एक नम्र विनंति आहे. एकनाथाला आता गृहस्थाश्रम स्वीकारण्यासाठीं समजवा.'

'नाहीं, नाहीं; स्वामी! मला तुम्ही या बंधनात टाकूं नका. हें बंधन प्राप्त झालेला माणूस चार भिंतींच्या बाहेर जाऊं शकत नाहीं. मग माझा तुमच्याशी असलेला संबंध तुटेल.' एकनाथ काकुळतीला येऊन म्हणाला.

'नाथा! तू गृहस्थाश्रमाला घाबरतोस? परमार्थी गृहस्थाश्रमाला घाबरतो? उलट गृहस्थाश्रमच असा एक आश्रम आहे, कीं ज्याच्यात खऱ्या परमार्थी माणसाचा कस लागतो. स्त्री, वित्त व पुत्र यांच्यामुळें मी माझ्या ध्येयापासून चलित होणार नाहीं. ही सिंहगर्जना आहे. आणि नाथा, दुसरी एक गोष्ट खास ध्यानात ठेवण्याजोगी आहे. ज्याला ईशकार्य करायचें आहे त्याला गृहस्थाश्रम स्वीकारलाच पाहिजे. देवाचें काम करताना निःसंकोचपणे समाजात फिरण्यासाठीं गृहस्थाश्रमाची गरज आहे.

भगवंताच्या प्रेरणेनेच सृष्टीचे सारे व्यवहार गतिमान् होत असतात. त्याला एकटा एकनाथ कसा अपवाद ठरणार?

क्षिप्रा नदीच्या कांठीं राहाणारा एक लक्षाधीश श्रेष्ठी फिरत फिरत तेथे आला होता. एकनाथाची प्रतिभा व तेजस्वी वाणी ऐकून त्याचें मन त्याच्याकडे आकर्षित झालें. त्याची मुलगी गिरिजा ही अतिशय सुंदर व सद्गुणी होती. स्त्रीसमाजात आदर्श होती. तिच्यासाठीं योग्य वर शोधीत शोधीत तो गृहस्थ तिथे आला होता.

त्याने स्वतःच्या मुलीचा सून म्हणून स्वीकार करण्यासाठीं चक्रपाणींना विनंति केली. गुरुजींच्या आज्ञेप्रमाणे गिरिजेशी एकनाथाचें लग्न झालें. एकनाथाने गृहस्थाश्रमात प्रवेश केला.

त्याचा गृहस्थाश्रम विलोभनीय होता. साक्षात् परमेश्वर त्याच्या घरीं त्याच्या सेवेला हजर होता. किती भव्य आणि दिव्य असेल हा गृहस्थाश्रम!

एकनाथ उपनिषदांतील दैवी विचार प्राकृत भाषेत आणून समाजाला शिकवूं लागला. प्रभुकार्य करता करता गृहस्थाश्रमी बनला. गिरिजाबाईंच्या सात्त्विक प्रेमाने त्याचा संसार अलौकिक बनला.

पुष्कळ वेळा भक्ताच्या घरात विसंगति पाहायला मिळते. भक्त ईश्वरपरायण असला तर त्याची पत्नी जगत्परायण असते. याबाबतीत तुकाराम महाराजांच्या पत्नीचें उदाहरण सुप्रसिद्ध आहे. एकनाथाचा संसार दिव्य व लोकोत्तर होता. त्याची गोष्टच निराळी होती. त्याला अनुकूल पत्नी होती. तिचें जसें उत्कृष्ट रूप होतें. तसेच तिच्याकडे उत्कृष्ट गुण देखील होते.

**अनुकूलां विमलाङ्गीं कुलजां कुशलां सुशीलसम्पन्नाम्।**
**पञ्चलकारां भार्यां पुरुषः पुण्योदयाल्लभते।।**

पुरुषाचा पुण्योदय होतो त्यावेळीं अशी पत्नी मिळते.

एकनाथाजवळ खूप मोठी जहागिरी होती. संपत्तीही होती. त्याची नीट व्यवस्था राखण्यासाठीं भगवंताने उद्धव नावाच्या एका सात्त्विक, सज्जन मनुष्याला प्रेरणा दिली. विवाह होऊन गिरिजाबाई घरी आली व मागोमाग उद्धव देखील आला त्याने एकनाथाची जहागिरी व संपत्ति यांची व्यवस्था पाहण्याचें काम स्वत:कडे घेतलें. गिरिजाबाई घरचा सारा व्यवहार सांभाळी व उद्धव जहागीर व संपत्ति यांची व्यवस्था पाही. एकनाथ दैवी विचार, तेजस्वी जीवनाबद्दलचे विचार, उपनिषदांतील दैवी सिद्धांत प्राकृत भाषेत लिहून ते विचार घरोघर पोचवीत असे. भगवंताचें नामस्मरण करीत, चित्त एकाग्र करून प्रभुभक्तीने जीवनविकास साधीत अतिशय सुखमय रीतीने त्याचा संसार चालला होता.



एकनाथाच्या गृहस्थाश्रमात विवेक व शांति होती. एकनाथ म्हणजे मूर्तिमंत विवेक आणि गिरिजाबाई म्हणजे साकार शांति. जिथे हा सुरेख संगम आहे तिथे काय विचारावें!

एकनाथाबद्दल बोलायचें म्हणजे तो अनाथांचा एक 'नाथ' होता. त्याचप्रमाणे गिरिजाबाई दीन-दु:खितांची प्रत्यक्ष गिरिजा होती. एकनाथ व गिरिजाबाई ही जोडी साक्षात् लक्ष्मीनारायणाची जोडी होती. कल्पनातीत असा त्यांचा संसार होता. लोकांचें देखील त्यांच्यावर अपार प्रेम होतें.

एकनाथाने पाहिलें : जगातील बहुसंख्य लोक भक्तीच करीत नाहीत. आणि जे करतात त्यांना वेदांतील तेजस्वी भक्ति माहीत नाहीं. रडवी, दीन, दुबळी भक्ति जीवनात आली काय व न आली काय, सारखीच! मग करायचें काय? त्याच्यासमोर ही समस्या होती.

प्रेमाने संस्कारकार्य करायला जागृत व्हा म्हणून भगवान् सूर्यनारायण स्वत:च्या मृदुलकरांनी साऱ्या जगाला उठवायला येत असे, त्यावेळी गोदावरीच्या पवित्र तीरावर एकनाथ त्याला विचारमग्न स्थितीत शतपावली करताना दिसे. एक दिवस त्याच्या त्या समस्येची उकल, सहजपणे त्याच्या ध्यानात आली. त्याने समाजाला एक अभिनव विचार दिला.

लोकांमधील भगवत्प्रेम नष्ट:प्राय झालें होतें. रडवी बुद्धि, भक्ति घरोघर प्रचलित होती. समाजात एक प्रकारची अशास्त्रीय समजूत निर्माण झाली होती, संसारासोबत परमार्थ होत नाहीं. त्यामुळें संसाराबद्दल घृणा निर्माण झाली होती. भक्तीविषयीचे दैवी विचार नाहीसे झाले होते. जीवनाला लोक क्षुद्र समजत होते.

एकनाथाने वेदांचे व उपनिषदांचे विचार समाजात उभे केले. हें जग भगवंताने निर्माण केलें आहे. तें तोच चालवतो, मग जग क्षुद्र कसें असूं शकेल? जीवन चालविणाऱ्या भगवंतावर प्रेम करायचें असेल तर त्याने निर्माण केलेलें जग क्षुद्र लेखून कसें चालेल? प्रभूने निर्माण केलेलें फळ खराब न मानता त्यातील सुंदरता, त्यातील मृदुता, त्याचा परिमळ आठवा

म्हणजे त्या सुंदरतेमागें, त्या मृदुतेमागें एका महान् कलाकाराचा हात आहे हें लक्षात येईल. अनादिकालापासून तो सृष्टीचा सांभाळ करीत आलेला आहे. त्या महान् कलाकाराच्या हाताने निर्माण झालेली सृष्टि, चालत असलेलें हें जीवन खराब व क्षुद्र होऊंच कसें शकतें? जीवन ज्यांना नीरस वाटतें ते अभक्त होत. जीवन तर रसमय आहे.

एकनाथाला दिसून आलें कीं लोकांत आत्मश्रद्धा आणि ईशश्रद्धा नष्ट झाली आहे. तीर्थस्थाने उजाड झाली आहेत. प्रत्येकजण स्वार्थी बनून स्वत:च्या कुटुंबापुरताच विचार करतो आहे. भक्ति तर दीन, दुबळी बनली आहे. 'मी भगवंताचा मुलगा आहे व त्या भगवंताच्या मांडीवर जाऊन बसेन' ही भक्तीतील मस्ती विसरले आहेत. पडेल त्या मोलाने हे दैवी भक्तीचे विचार लोकांमध्ये उभे केले पाहिजेत आणि त्या कार्यासाठीं त्याने एक अभिनव संस्था उभी केली. त्या संस्थेचें नांव **'वासुदेव.'** या वासुदेव संस्थेने फार मोठें भगवत्कार्य केलेलें आहे. या वासुदेवांना एकनाथ प्रेमाने 'भूतलावरील वासुदेव' म्हणे. या संस्थेच्या मदतीने एकनाथाने तत्कालीन समाजातील भ्रांत व दुबळी विचारधारा बदलविली. प्रांताप्रांतात त्याने ती संस्था उभी केली. गेल्या पिढीपर्यंत कर्नाटकामध्ये या संस्थेचे अवशेष होते. आज देखील अव्यवस्थित रूपात उत्तर महाराष्ट्रात अशा प्रकारचे वासुदेव कुठे कुठे दृष्टीस पडतात.

हे वासुदेव डोईवर मोरपिसें धारण करीत व पायात घुंगरू बांधून गांवोगांव फिरत. ते नाचत असल्यामुळें त्यांच्या आजुबाजूला मुलें जमा होत. ते गोड गाणी गात असल्यामुळें त्या गाण्यांना मोहून आबालवृद्ध त्यांच्याकडे आकर्षिले जात. वासुदेवाला पाहण्यासाठीं त्यांची गर्दी होई. त्यांच्या गाण्यांची रचना एकनाथासारख्या महान् द्रष्ट्या पुरुषाकडून झालेली असल्यामुळें ज्ञानपिपासु पुरुषवर्गही त्यांच्याजवळ खेचला जाई. याप्रमाणे एकनाथाने प्राकृत भाषेत उभी केलेली वेदांतील तेजस्वी भक्ति स्त्री, पुरुष व बालक यांच्यापर्यंत पोचूं लागली.



हे वासुदेव रोज तीन-चार घरें फिरत, तेथील लोकांमध्ये बसत, तेजस्वी विचार सांगत, तीन-चार दिवस एका गांवात राहात व नंतर दुसऱ्या गांवात स्वत:चें कार्य सुरू करीत. ते गट करून जात नसत; एकएकटेच जात. असे शेकडों वासुदेव एकनाथाने तयार केले. इतिहासाने त्यांचें हें महान् कार्य अमर केलें आहे.

जुन्या काळीं सांस्कृतिक कार्य करणारांना भूदेव म्हणत असत. त्याच रीतीला अनुसरून हें कार्य करणाऱ्या लोकांना एकनाथ 'वासुदेव' म्हणत असे या वासुदेव संस्थेने जें कार्य केलें तें अजोड आहे. गेल्या पंधरा-वीस हजार वर्षांच्या इतिहासात इतकें सरस काम कुठल्याही संस्थेने केलेलें नाहीं.

ही संस्था उपनिषदांतील दैवी सिद्धांत व तेजस्वी भक्तीचे विचार घरोघर घेऊन गेली. या संस्थेने हिमालयापर्यंतचा प्रवास करून सर्व लोकांना भक्तीकडे वळविलें. जे बसले होते त्यांना भगवत्कार्यासाठीं उभें केलें, जे उभे होते त्यांना चालतें केलें. ही अतिशय कठीण गोष्ट या महान् संस्थेनें केली. जगात कोणी दीन राहूं नयें, भगवंताची तेजस्वी भक्ति उभी राहावी यासाठीं या संस्थेने जबरदस्त कार्य केलें. त्यामुळें भक्तीची चमक येऊं लागली. नेभळटपणा, दुबळेपणा फेंकला जाऊं लागला. अनेक वर्षांपासून खोटी भक्ति करणारे व करविणारे कथाकार एकनाथाला दुश्मन म्हणून ओळखू लागले. त्याच्यावर टीका करूं लागलें.

परंपरेला चिकटून बसलेल्या रूढिग्रस्तांनीही एकनाथाला कडाडून विरोध केला. वैदिक सिद्धांत संस्कृतात राहिले पाहिजेत. ते प्राकृत भाषेत आणून एकनाथाने महान् पातक केलेलें आहे, धर्मामध्ये न्यूनत्व आणलें आहे वगैरे आक्षेप त्याच्यावर केले. परंतु, एकनाथाचें आयुष्य अशा प्रकारच्या पंडितांशी वितंडवाद घालत बसण्यासाठीं नव्हतेंच. ईश्वराने त्याला ज्या कामात जोडलें होतें, त्या कामात तो इतका दंग असे कीं अशा निंदकांना उत्तरें देण्यासाठीं त्याच्याकडें वेळ कुठे होता? भल्या पहाटेपासून रात्री उशिरापर्यंत, त्याचा प्रत्येक क्षण ईश्वरकार्यातच व्यय होत होता. एकनाथाने उभ्या केलेल्या वासुदेव संस्थेवर प्रहार होऊं लागले.

हे लोक वासुदेवांनाही शिव्या देऊं लागले. त्यांचें आगमन अशुभ मानून त्यांना गांवातून हाकलून देऊं लागले. तरी देखील या वासुदेवांनी आपलें काम अविरत चालू ठेवलें.

लोक जेव्हा जीवनाला कंटाळून उद्विग्न होत, निराश होत तेव्हा एकनाथा घरीं जात. तिथून ते संजीवन उत्साह घेऊन परत फिरत. जीवनाच्या समाधानाचा ठेवा मिळवून द्विगुणित उत्साहाने जीवनपथावरील प्रवास पुढें चालवीत.

वास्तविक मंदिरें अशी असली पाहिजेत, कीं जिथे गेल्यावर जीवनात उत्साह निर्माण व्हावा, जीवन तेजस्वी विचारांनी प्रदीप्त व्हावें, पराभूत झालेला नव्या जोमाने पुन्हा उठावा, जीवनात आश्वासन मिळावें. आणि म्हणूनच लोक प्रेमाने एकनाथाच्या घराला 'नाथमंदिर' म्हणत असत. एकनाथाला साक्षात् भगवान् समजत असत.

एक दिवस एकनाथ गोदावरीमध्ये स्नान करावयास गेला होता. त्यावेळीं गोदावरीला देखील स्वत:चें जीवन धन्य वाटत असेल. जो शेकडों जीवांचा उद्धार करतो तो आज माझ्या पाण्यात स्नान करायला आला आहे, आज मी पावन होईन.

एकनाथ स्नान करून शान्त चित्ताने बालरवीला अर्घ्य देत उभा होता. त्याने लोकांचा कोलाहल ऐकला. पाहिलें तर एक धुळीने माखलेलें बालक तिथे रडत होतें. बालकाच्या मातापित्यांच्या पत्ता नव्हता. तो बालक हरवला होता म्हणून साऱ्या लोकांनी गलका केला होता.

एकनाथाने वात्सल्याने त्या बालकाला उचललें. तो रडायचा बंद झाला. त्याने बालकाला नदीमध्ये स्नान घातलें. केवढें भाग्य असेल त्या बालकाचें कीं, ज्याला एकनाथाने स्नान घातलें!

तपास करताच खबर मिळाली कीं तो बालक राण्या धेड नामक महाराचा होता. त्या बालकाला खांद्यावर घेऊन विचारीत विचारीत एकनाथ महारवाड्यात आला. सारे महार जमा झाले. सर्वांना स्वत:च्या जीवनातील



ही धन्य घटिका वाटली. पण एकनाथाने पाहिलें : इथे सारे अव्यवस्थित राहतात. कसें जगावें तें यांना माहीत नाहीं.

मुलाच्या शोधात फिरत असलेला राण्या धेड खबर मिळताच घरीं धावत आला. त्याने मुलाला घेतलें, उराशी कवटाळलें, एकनाथाचे पाय धरले. जीवनातील कृतकृत्यता अनुभवली. त्याच्या नेत्रांत आनंदाचे अश्रू होते. लोक ज्या समाजाला दूर राखत असत, ज्याला अस्पृश्य समजत, ज्याच्या छायेचाही विटाळ मानीत त्या लोकांच्या वस्तीमध्ये एक भगवत्तुल्य संत स्वत:च्या पायाने आला; याच्यासारखें महत्‌भाग्य कोणतें!

गद्‌गद् अंत:करणाने राण्या धेड म्हणाला : 'नाथ! आज आमचा उद्धार झाला. काशीपासून रामेश्वरपर्यंत ज्यांचे शिष्य भगवत्कार्य करीत फिरत आहेत ते तुम्ही आज आमच्या वस्तीत आला. ज्याने हजारों जीवनांचा उद्धार केला, ज्याच्या घरीं जाऊन लोक जीवनातील प्रकाश मिळवत आहेत, ज्याचें घर लोकांना मंदिर वाटतें, त्या मंदिरातील भगवंत आज आमच्या वस्तीत आला आहे. आज आम्ही धन्य झालो, पावन झालो. तुमच्या चरणरजाने आमचें वसतिस्थान पवित्र बनलें.' बोलता बोलता त्याच्या नेत्रांत अश्रू उभे राहिलें.

'नाथ! एक गोष्ट मनात सारखी बोचत असते. विचारूं कां? तुमचे वासुदेव साऱ्या भारतभर फिरतात पण आमच्या वस्तीत येत नाहीत; कां बरे?'

'तुम्ही वेदांचे अधिकारी नाहीत म्हणून.' एकनाथ म्हणाला.

'आम्ही वेदांचे अधिकारी नाहीत हें बरोबर आहे. पण माणूस म्हणून जगण्याचाही आम्हाला अधिकार नाहीं? तुमचे वासुदेव आमच्या वस्तीत आले नाहीत तर आम्हाला जीवनाचे पाठ कोण शिकवेल?'

एकनाथ म्हणाला : 'तुमच्याही जीवनात आदर्श असला पाहिजे. भव्य जीवनाचे आदर्श तुम्हाला मिळाले पाहिजेत.'

राण्या म्हणाला : 'प्रभो! अगदी कांहीं नाहीं तरी आम्हाला आदर्श दाखवा. डोळ्यांसमोर असे महान् जीवन असावें, कीं जें पाहाताच आमच्या जीवनाला वळण लागेल. आमचें संकल्प दृढ होतील. आम्हा हतभाग्यांना आधार मिळेल.'

एकनाथाने महारवाड्यात जायला सुरुवात केली. थोड्याच दिवसांत महारवाड्याचें रूप पालटलें. प्रत्येकाचें अंगण शेणाने सारवलेलें दिसूं लागलें. घरोघरीं तुळशीवृन्दावनें उभी झाली. त्यांच्यासमोर दिवे जळूं लागले. प्रत्येक महार एक-दोन श्लोक म्हणून जेवूं लागला.

एकनाथ संस्कृत सिद्धांत प्राकृत भाषेत लिहून त्यांचा प्रचार करीत असे. नाथाच्या या कृतीला बऱ्याच सनातन्यांचा विरोध होता. त्यातून नाथ आता महारवाड्यात जाऊं लागला. मग काय विचारावें? पेटत्या अग्नीत तूप पडलें! त्याच्या दुश्मनांनी - त्याच्या विरोधकांनी त्याच्या एकुलत्या एक पुत्राला, हरिपंताला भडकावलें. नाथाची कृति पाहून तो काशीला निघून गेला. एकुलता एक पुत्र अशा रीतीने निघून गेला याचें एकनाथाला व गिरिजाबाईला फार दुःख झालें. परंतु प्रभु जें काहीं करतो त्यामध्ये त्याचा सद्हेतुच असतो, असें समजून त्यांनी आपलें मन आवरलें व भगवत्कार्यात गुंतवून टाकलें.

नाथाने मुडद्याचें जीवन जगणारांना सजीव केलें. निस्तेज बनलेल्यांना तेजस्वी बनवलें. लोकांच्या जीवनात तेजस्वी भक्ति पोचविली. त्यामुळें या महान् शक्तीला भेटावें असें प्रभूला वाटलें. त्याच्या सतत संपर्कात राहावें असें त्याला वाटलें. त्याच्या घरीं गेल्यावाचून हा संपर्क साधणार नाहीं. त्याच्याजवळ राहिल्यावाचून त्याचें रूप पोटभर न्याहाळता येणार नाहीं. केवढें भाग्य एकनाथाचें!

जेवण आटोपल्यावर एकनाथ ओट्यावर बसे. गिरिजाबाईही येऊन बसे. आचाऱ्याबद्दलची अडचण सांगे.

'आपल्या घरीं आचारी टिकत नाहीं, पाहुण्यांची ये जा देखील बरीच असते आणि ती देखील अनिश्चित...' अशा प्रकारे बोलणी चालली



होती. एवढ्यात एक अठरा-एकोणीस वर्षांचा तेजस्वी मुलगा दारात येऊन उभा राहिला. गिरिजाबाई आंत गेली.

'तुला काय पाहिजे बाबा!' एकनाथाने प्रेमाने विचारलें.

'मला नोकरी पाहिजे.' आगंतुक म्हणाला.

एकनाथाचें केवढें परम भाग्य असेल, कीं या सृष्टीचा निर्माता, पालनकर्ता, चंद्र-सूर्याला चालविणारा, जगन्नियंता प्रभु स्वतः त्याच्या घरीं नोकरी मागायला आला होता. तो आगंतुक दुसरा कोणी नव्हता. साक्षात् भगवान् एका नोकराच्या वेषात होता.

'काय काम करणार तू?' एकनाथाने विचारलें.

'तुम्ही सांगाल तें.' आगंतुक म्हणाला.

एकनाथाने गिरिजाबाईला हाक मारली. म्हणाला : 'तुझ्या कामासाठीं भगवंताने कोणाला पाठविलें आहे बघ.'

नोकराच्या वेषात आलेला भगवान् गालातल्या गालात हसला. तो मनात म्हणाला : 'भगवंताने पाठविलेला नाहीं; स्वतः भगवान् तुझा नोकर बनून आला आहे.'

गिरिजाबाईने विचारलें : 'तू सगळें काम करशील?'

'हो हो तुम्ही सांगाल तें सर्व काम करीन. कामाबद्दल तुम्ही जरा देखील काळजी बाळगूं नका.'

'मग तू पगार काय घेणार? आमच्या घरीं आचारी टिकत नाहीत. म्हणून प्रथम विचारून ठेवते.' गिरिजाबाई म्हणाली.

'मला पगारबिगाराची कांहीं गरज नाही. मी एकटाच आहे. तुम्ही जेवल्यावर जे दोन घास उरतील ते खाऊन मी राहीन.'

या भावाच्या भुकेल्या भगवंताला भरवणार कोण? आपण नैवेद्य दाखवतो. तो फक्त दाखविण्यासाठीं असतो. आपली पुरेपूर खात्री असते, कीं जो नैवेद्य आपण भगवंताला दाखवतो त्यातला कण देखील कमी होणार नाहीं. म्हणूनच आपण नैवेद्य दाखवतो. नाहींतर या भगवंताला भरवणार कोण?

एकनाथाला हा मुलगा जरा विचित्र वाटला. त्याने गिरिजाबाईला विचारलें : 'ठेवायचा कां?'

गिरिजाबाईने संमति दिली. त्या आगंतुकाला ठेवण्यात आलें.

गिरिजाबाईने विचारलें : 'तुझें नांव काय?'

'श्रीखंड्या!' त्याने सांगितलें. श्रीखंड म्हणजे सुगंध आणि पुढें म्हणाला : 'मी सर्व काम करीन. तुम्ही सांगाल तेवढ्या माणसांचें जेवण बनवीन. पण माझी एक अट आहे. मी थोडा स्वत:च्या मर्जीप्रमाणे वागणारा आहे. मी जेवण बनवायला सुरुवात केली, कीं मला कोणाची लुडबुड चालत नाहीं आणि खिडक्या-दरवाजे बंद करून मी जेवण बनवीन.'

एकनाथ म्हणाला : 'चालेल!'

'परंतु ही दारें आणि खिडक्या बंद कशाला?' गिरिजाबाईने विचारलें.

'त्यात काय मोठेंसें? फार तर तो थोडी मलई खाईल. नाहीं तर पदार्थांत गूळ टाकताना त्यातला थोडा खाईल. यापेक्षा तो काय करणार? आपल्याला स्वादिष्ट जेवण मिळालें म्हणजे झालें. मग तो दरवाजे उघडे ठेवून करो अथवा बंद ठेवून.' नाथाने मिस्किलपणे म्हटलें.

जन्मजन्मांतरीच्या पुण्याईने एकनाथाचें भाग्य उदयाला आलें होतें. साक्षात् भगवान् त्याच्या घरीं नोकर बनला होता.



भगवंत जेवण बनवी व एकनाथ जेवत असे. भोजनातील स्वादाचें काय वर्णन करावें? अद्भुत स्वाद! एकनाथ जेवत असे व भगवंत एक टक पाहात असे. केवढें भाग्य असेल हें!

आपल्याही जीवनात असा एखादा क्षण यावा. देवाने भोजन बनवावें व आपण जेवावें.

'श्रीखंड्या, भोजन तयार आहे ना?' गिरिजाबाई म्हणे.

'हो, आई भोजन तयारच आहे.' श्रीखंड्या ताबडतोब जबाब देई. स्वैपाकघराची दारें व खिडक्या बंद करी. जेवण बनवायला फक्त दारें आणि खिडक्याच बंद करण्याचा अवकाश!

गिरिजाबाई एकनाथाला म्हणत : 'हा श्रीखंड्या फारच चांगला मुलगा आहे. किती छान जेवण बनवतो! शिवाय दारें खिडक्या बंद करूनही कांहीं चोरून खात नाहीं.'

एकनाथ व गिरिजाबाई यांच्या अद्भुत संसारात जगाचा अद्भुत मालक, चाकर बनला. काम करून गौरव व आनंद घेऊं लागला.

एकनाथ सकाळीं उठून प्रातर्विधि, आंघोळ आटोपून येण्यापूर्वीच श्रीखंड्या पूजेची सारी तयारी करून ठेवीत असे. एकनाथ आंघोळीला बसला कीं धोतराच्या निऱ्या काढून धोतर घेऊन श्रीखंड्या तयार! या जगन्नाथाला एकनाथाची अशी लहान लहान कामें करण्यात केवढा आनंद मिळत असेल!

**श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व कामहि करितो**
**स्वकरें चंदन घासी गंगेचे पाणी कावडीं भरितो।।**

भगवान् जगन्नाथ एकनाथाची सेवा करता करता साऱ्या जगाला **विसरत असे.**

एकनाथ झोपला कीं भगवान् अनिमेष नेत्रांनी त्यालाच पाहात राही. जणूं आई आपल्या लाडक्या तान्हुल्याला वात्सल्याने पाहात राहाते तसें. आणि त्याच्या वाणीबद्दल काय बोलावें! इतकें गोड बोले, कीं पराकोटीचा चिडखोरही त्याच्यासमोर गार होऊन बसें. सर्व त्याच्यावर प्रेम करीत. असें साक्षात् श्रीहरि त्याचें सारें काम करीत होता. एकनाथ प्रभुकार्यात तल्लीन राहात असे. लेखनाद्वारे वैदिक सिद्धांतांचा प्रचार करण्यात व वासुदेवांना प्रेरणा देण्यात त्याचा सारा दिवस निघून जात असे.

एक दिवस राण्या महार एकनाथाजवळ येऊन म्हणाला : 'नाथ, तुम्ही आमची सर्वांची जीवनें सुधारली आहेत. आम्ही आता पशुजीवन जगत नाहीं. माणूस बनून जगायला शिकलो आहोत. आपलें आगमन होऊं लागल्यामुळें आमची जीवनें स्वच्छ होऊं लागली आहेत. तुमच्या संपर्काने आमच्या जीवनात कांहीं आदर्श आले आहेत. त्याप्रमाणे जीवन जगण्याचा प्रयत्न करीत आहोत. सारा महारवाडा स्वच्छ व सुंदर बनला आहे. भक्तिमय बनला आहे.'

'भगवंताची तुमच्यावर कृपा आहे.' एकनाथ नम्र भावाने म्हणाला.

'आम्हाला दुसरें कांहीं ठाऊक नाहीं. तुम्हीच आमचे भगवान् आहात. तुम्हीच आमचे जगन्नाथ आहात. आमची सर्वांची इच्छा आहे, आमचा महारवाडा आपण पावन करावा. आमच्या घरची साधी मीठ-भाकरी खावी.'

'धर्मशास्त्र मला तुमच्या घरीं जेवायला अनुमति देत नाहीं.' एकनाथाने म्हटलें.

'आम्ही महार तुमची बालकें नाहीत कां? आम्हा गरिबांचा हा लाडका हट्ट तुम्ही पुरा नाहीं कां करणार? घरोघरं आमची मुलें विचारीत आहेत नाथमहाराज आमच्या घरची भाकरी कां घेत नाहीत? त्यांना कसें समजवयाचें आम्ही?' राण्या महार काकुळतीला आला. त्याचे डोळे पाणावले. तो उद्विग्न झाला.



परंतु एकनाथाला एका बाजूला धर्मशास्त्र विरोध करीत होतें तर दुसऱ्या बाजूला राण्या महारावरचें प्रेम त्याचें आमंत्रण अव्हेरायला मना करीत होतें. त्याच्यासमोर समस्या उभी राहिली. त्याने गिरिजाबाईला बोलावून विचारलें : 'महारवाड्यातून जेवायचें आमंत्रण आलें आहे; जाऊं कां?'

एवढ्यात श्रीखंड्या भोजनगृहातून बाहेर आला. तो म्हणाला : 'मी फक्त जेवण करूं जाणतो अधिक कांहीं मला कळत नाहीं. पण मला वाटतें, हे लोक एवढ्या प्रेमाने तुम्हाला बोलावीत आहेत. त्यांच्या प्रेमाला नकार देऊं नये. तुमच्या रूपात साक्षात् निर्भयता आम्ही पाहातो; असे तुम्ही घाबरता?'

'पण श्रीखंड्या, तुला माहीत नाहीं, असें केल्यावर आमच्या भगवत्कार्यावर आघात होईल.' एकनाथ म्हणाला.

'हा माझा मुलगा मलाच शिकवूं लागला आता! म्हणे भगवत्कार्यावर आघात होईल!' भगवंत मनातल्या मनात म्हणाला.

'एकनाथ एवढे भित्रे असतील असें मला वाटत नव्हतें. साक्षात् भगवंत तुमची काळजी वाहात बसला आहे. मग तुम्हाला कसली चिन्ता?' श्रीखंड्या म्हणाला.

एकनाथाला वाटलें भगवंतच श्रीखंड्याच्या रूपाने बोलत असावा. त्याला हें माहीत नव्हतें, कीं श्रीखंड्या हाच स्वतः भगवंत आहे व तो सल्ला देत आहे. त्याने राण्या महाराला जेवायला यायचें कबूल केलें.

एकनाथाच्या विरुद्ध असलेले लोक-श्रीधर, गदाधर, विद्याधर वगैरे पंडित चिडले. सर्वांनी निर्णय घेतला. एकनाथ जेव्हा महारांसमोर जेवायला बसेल त्यावेळी त्याला पकडायचें व प्रायश्चित्त घ्यायला लावायचें.

नाथ जेवायला येणार म्हणून सारा महारवाडा सजवण्यात आला होता. आज सर्वांनी स्वच्छ कपडे घातले होते. घराघरासमोर रांगोळ्या

घालण्यात आल्या होत्या. युगानुयुगांचा उपेक्षित महारवाडा आज पावन होणार होता.

लोकांत खूप चर्चा झाली. पण निर्भय वृत्तीच्या नाथाच्या मनात चिंता पण नव्हती आणि भीति पण नव्हती. चराचरसृष्टीच्या निर्मात्या भगवंतावर प्रेम असेल, श्रद्धा असेल तर भीति कशाला बाळगायची? म्हणून एकनाथ शांतपणे महारवाड्यात जेवायला गेला.

एकनाथावर बहिष्कार टाकता यावा म्हणून गांवच्या वतीने साक्षी म्हणून विद्याधर आणि राजारामशास्त्री गुप्तपणे महारवाड्यात गेले. खिडकीतून लपून पाहूं लागले. एकनाथ महारांच्या पंक्तीला बसला होता. पानें वाढली, नाथमहाराज चार घास जेवले. आता ही गोष्ट गांवात सांगून एकनाथावर बहिष्कार घालायचा असा विचार करीत ते दोघेही महारवाड्यातून बाहेर आले. वाटेत त्यांना श्रीधरशास्त्री भेटले.

श्रीधरशास्त्री म्हणाला : 'आश्चर्य आहे बुवा! एकनाथ तर प्रवचन करीत आहे. महारवाड्यात गेलाच नाहीं.'

'असें कसें शक्य आहे? आम्ही दोघेही आताच महारवाड्यातून येत आहोत. तो तर आरामात जेवत आहे.'

राजारामशास्त्री म्हणाले : 'शक्य नाहीं. मी माझ्या कानांनी त्याचें प्रवचन ऐकून आलो आहे.'

श्रीधरशास्त्री म्हणाले : 'धन्य आहे एकनाथ आणि धन्य ते महाभाग ज्यांनी त्यांचें प्रवचन ऐकलें. साक्षात् जगन्नाथ एकनाथाचें रूप घेऊन प्रवचन करीत होता. केवढें मोठें या लोकांचें भाग्य असेल कीं ज्यांनी भगवंताच्या मुखाने प्रवचन ऐकलें असेल? भगवंत स्वतःच्या मुखाने स्वतःची कथा सांगत होता!'

परंतु कर्मठांचें समाधान झालें नाहीं. एकनाथ महारवाड्यातून परत येत होता त्यावेळीं त्यांनी त्याचा रस्ता अडवला.



एक ब्राह्मण म्हणाला : 'तुम्ही आता महारवाड्यातून जेवून येत आहात ही गोष्ट खरी?'

एकनाथ : 'हो'

"धर्मशास्त्राप्रमाणे ब्राह्मण महाराचे घरीं जेवूं शकतो कां?"

"त्यांनी प्रेमाने बोलावलें तर काय करावें?"

"उद्या ते आम्हालाही बोलावतील! तर मग काय आम्ही देखील जावें काय?"

"हा व्यक्तिगत प्रश्न आहे."

"हा व्यक्तिगत नव्हे तर धर्मशास्त्राचा प्रश्न आहे."

"महाराकडे जेवूं नये, असें कुठल्या ग्रंथात लिहिलें आहे."

"तसें कदाचित् लिहिलें नसेल. पण वर्णसंकर करूं नये असें तर लिहिलें आहे ना"

"जेवल्याने वर्णसंकर होत नाहीं. तसेंच वर्णसंकर करूं नये तसा खोटा वर्णाभिमान पण बाळगूं नये. खरे ना."

अवाक् होऊन महार हें सर्व ऐकत होते.

हतबुद्ध होऊन शेवटी गंगाधरशास्त्री म्हणाले "आपण विद्वान् आहात. तुमच्यासमोर आम्ही काय बोलणार."

"कां माझी कोणती चूक झाली काय?"

"होय! आमच्या दृष्टीने तुम्ही चुकला आहात. त्यासाठीं तुम्ही प्रायश्चित्त केलें पाहिजे."

"मी महारांवरील प्रेमापोटी त्यांच्याकडे जेवलो. तुमच्यावरील प्रेमासाठीं प्रायश्चित्त सुद्धा करेन."

विरोधकांचा आवाज थंड झाला. ते एकमेकांकडे पाहातच राहिले. पुन्हा एखाद्या प्रसंगीं त्याला चतुराईने पकडावें असा निर्णय घेऊन ते आपापल्या घरीं गेले. अशा प्रकारे अशा अनेक बिकट प्रसंगांतूनही एकनाथ प्रभुकृपेने सहीसलामत सुटला.

एकनाथाचें प्रभुकार्य दिवसेंदिवस वाढत होतें. त्याचें संध्याकाळचें प्रवचन ऐकायला लोकांची अफाट गर्दी होत असे. तें प्रवचनही अगदी ज्ञानप्रचुर असे.

तेजस्वी भक्तीचा शोध लावणाऱ्या, अति उत्कृष्ट व दैवी कार्य करणाऱ्या या महान् भक्ताचा पाठलाग त्याचे विरोधक सोडीत नव्हते. एकनाथ प्रवचन करायला बसला, कीं नेमकी त्याच वेळीं एक रूपवती स्त्री त्याचें प्रवचन ऐकायला येत असे.... अनिमेष नेत्रांनी ती एकनाथाकडे पाहात असे व सर्वजण नमस्कार करून गेल्यावर शेवटी ती स्त्री नाथाला नमस्कार करी आणि जाई. हें चित्र विरोधकांच्या नजरेत भरलें. ती स्त्री कोण असावी तें जाणून घेण्यासाठीं त्यांनी तिचा पाठलाग करायचें ठरविलें.

दुसरे दिवशी प्रवचन संपल्यावर त्या लावण्यवती स्त्रीने मनापासून एकनाथाला नमस्कार केला व हळूहळू चालत ती आपल्या घरीं जाऊं लागली. चालता चालता ती गांवाच्या बाहेर आली. ते लोक तिच्या मागोमाग गेले. ती गोदावरी तटावर आली. नदीत बुडी मारून नदीच्या पाण्यात विलीन झाली. ती साक्षात् गोदावरी, स्त्रीचें रूप धारण करून एकनाथांची वाग्धारा ऐकायला येत असे.

तें दृश्य पाहून एकनाथाच्या कित्येक विरोधकांचे डोळे उघडले. जे प्रामाणिक होते त्यांनी एकनाथाजवळ येऊन स्वतःचा गुन्हा कबूल केला. त्याची माफी मागितली व आदल्या रात्रीं घडलेल्या सर्व घटनेचें वर्णन केलें.

दुसऱ्या दिवशीं जेव्हा ती स्त्री पुन्हा आली तेव्हा एकनाथाने तिचे पाय पकडून म्हटलें 'आई! तू मला कां बरें लाजवतेस?'



'एकनाथा मी काय करूं? शेकडों लोक स्वतःची पातकें माझ्या पाण्यात धुतात. त्याने मलिन झालेली मी शुद्ध कशी होऊं? तुझ्या वाग्गंगेत न्हाते आणि पवित्र होते. म्हणून मी इथे येतेय. साक्षात् चैतन्याचें तेज तुझ्यात आहे. कित्येक वर्षांपासून वेडी भक्ति करणारे, सुतकी चेहरा घेऊन येणारे भक्त माझ्यात स्नान करीत. तू त्यांची दृष्टि बदललीस. तू त्यांचें जीवन सुधारलेंस. ती तुझी तेजस्वी वाणी ऐकण्याचा मोह मला झाला.'

'आई! माझें अहोभाग्य आहे, कीं तू माझें प्रवचन ऐकायला येतेस. पण माझी नम्र प्रार्थना आहे, माझें प्रेमाचें सांगणें आहे, कीं आई! तू माझें प्रवचन ऐकायला येऊं नकोस. तू आलीस तर लोक माझ्या आजूबाजूला चमत्काराचें वलय उभें करतील. स्वतः चमत्काराच्या नादाला लागतील. म्हणून म्हणतो : 'आई! तू येऊं नकोस.'

धन्य तो एकनाथ, कीं सिद्धि पायावर लोळण घ्यायला आल्या तरी त्यांना वापरण्याची त्याला इच्छा झाली नाहीं. साक्षात् जगदीशाचें दर्शन झालें पण त्याच्याकडे कांहीं मागणी केली नाहीं. विश्वातल्या कुणाही भक्ताने अशा प्रकारे भगवंताला सांगितलें नाहीं, कीं 'तू येऊं नकोस.'

एक दिवस एक स्त्री आपल्या तरुण मुलाला घेऊन एकनाथाजवळ आली व म्हणाली : 'हा मुलगा खाण्यापिण्यात मुळीच पथ्य पाळत नाहीं.' एकनाथ म्हणाला : 'आठ दिवस याला माझ्याजवळ ठेवा. कसें पथ्य पाळतात तें मी त्याला समजावतो.' 'एकनाथाने कोणकोणत्या वस्तूंत पथ्य पाळलें पाहिजे त्याची यादी त्याच्या आईकडून घेतली. श्रीखंड्याला बोलावलें व म्हटलें : एवढ्या वस्तू आजपासून माझ्या जेवणात वापरूं नकोस.'

एकनाथाचें त्या तरुणाने अनुकरण केलें. एका आठवड्यात त्याची प्रकृति सुधारली.

त्या तरुणाची आई जेव्हा परत आली तेव्हा एकनाथ म्हणाला : 'तू या तरुणाची आई आहेस. त्याने पथ्य पाळण्यासाठीं तू पथ्य पाळलें

पाहिजेस.' दुसऱ्याला सांगण्यापूर्वी स्वत: तें जीवनात आचरलें पाहिजे हा जागतिक सिद्धांत एकनाथाने उभा केला. वासुदेव संस्थेने तो जीवनात आणला.

ही वासुदेव संस्था घरोघर फिरत असे. तें पाहून भगवंत देखील मनातल्या मनात हरखून जात असे. धन्य धन्य हा माझा मुलगा कीं ज्याने माझे विचार घरोघर पोचविले. तेजस्वी भक्ति पुन्हा उभी केली!

परंतु ग्रीक देशात सॉक्रेटिसचें जसें झालें तसेंच एकनाथाचें झालें. सॉक्रेटिसच्या विरोधकांनी सॉक्रेटीस लोकांना बिघडवतो असा त्याच्यावर आरोप केला होता. एकनाथाच्या विरोधकांनीही त्याच्यावर तोच आरोप केला. एकनाथ तरुणांना भडकावतो, परंपरागत चालत आलेल्या भक्तीला हा विरोध करतो, अशा प्रकारचा आरोप तथाकथित विरोधकांनी त्याच्यावर केला. एकदा एकनाथाला हैराण करण्यासाठीं या गांवकऱ्यांनी एका ब्राह्मणाला दोनशें रुपयें द्यायच्या शर्तीवर उभा केला.

एकनाथ ज्या देवघरात पूजा करीत होता तिथे हा ब्राह्मण पायात जोडे घालून सरळ आंतच शिरला आणि आपलें सर्व सामान तसेंच टाकून थेट एकनाथाच्या मांडीवर जाऊन बसला. त्याला पाहून एकनाथ म्हणाला : 'ओहोहो! मला भेटण्याची एवढी अधीरता! जोडे काढायला सुद्धा विसरलात' एकनाथाने आपल्या प्रेमळ भाषणाने त्याच्यावर मात केली.

नंतर तो ब्राह्मण नदीमध्ये आंघोळीला गेला व तिथेच बसून राहिला. त्याला वाटलें : आपण इथे बसून राहूं. तिकडे जेवण थंड होईल व मग कंटाळून एकनाथ रागावेल. पण तेवढ्यात श्रीखंड्या तेथे येऊन म्हणाला : 'तुम्ही चुकूं नयें म्हणून तुम्हाला न्यायला आलो आहे.' निरुपायानें ब्राह्मण त्याच्या बरोबर घरीं आला.

एकनाथाबरोबर ब्राह्मण जेवायला बसला. गिरिजाबाई प्रेमाने वाढत होती. तो ब्राह्मण एकाएकी पाटावरून उठला व वाढायला वाकलेल्या गिरिजाबाईच्या पाठीवर बसला. एकनाथ म्हणाला : 'सांभाळ हं गिरिजा!'



'तुम्ही चिंता करूं नका. मला सवय आहे. हरिपंडिताला अशीच नाहीं कां घेत होते! फरक इतकाच कीं हा वयाने जरा मोठा आहे!'

यावेळची एकनाथाची व गिरिजाबाईची शांतता व क्षमाशीलता पाहून तो ब्राह्मण विरघळला. त्याने त्यांना साष्टांग नमस्कार घातला व स्वत:च्या दुष्कृत्याबद्दल माफी मागितली.

एकनाथाने विचारलें : 'मग हें सारें कशासाठीं केलेंत?'

तो म्हणाला : मी एक गरीब ब्राह्मण आहे. मला माझ्या मुलाची मुंज करायची आहे. पण पैसे नसल्याने मदतीच्या आशेवर पैठणमध्ये आलो. इथल्या कुटाळांनी मला दोनशें रुपये या शर्तीवर द्यायचें कबूल केलें कीं मी कांहींही करून तुम्हाला हैराण करून दाखवायचें, चीड आणून दाखवायची.

'अरेरे! दोनशें रुपयांसाठीं तुम्हाला एवढें कष्ट करावें लागलें!' एकनाथाने उद्धवाला बोलावलें आणि म्हटलें : 'या माणसाला दोनशें रुपयें देऊन टाका.'

ब्राह्मण तें रुपये घ्यायला तयार होईना. तेव्हा एकनाथ म्हणाला : 'एकनाथ देतो तें परत घेण्यासाठीं देत नाहीं.' एकनाथाचें हें प्रेम व सद्वर्तन पाहून तो ब्राह्मण गहिवरला. स्वत:च्या वर्तनाबद्दल त्याची क्षमा मागितली व एकनाथाचा निरोप घेतला.

या प्रसंगाने एकनाथाच्या द्वेष्ट्यांचे हात लुळे पडले. एकनाथाला चिडविण्यासाठीं त्यांनी कांहीं बाकी ठेवलें नव्हतें. पण ती शांतमूर्ति विरोधकांच्या हुलकावण्याने चिडली तर त्याला एकनाथ कोण म्हणेल? एकनाथाच्या विरोधकांचें त्याच्यावर समाधान झालें नाहीं. त्यांनी शेवटी काशीच्या पंडितांच्या कानावर एकनाथ पाखंडी आहे वगैरे माहिती घातली. एकनाथाचा बुद्धिवान् पुत्र हरिपंडित याला भडकावलें. काशीच्या पंडितांनी व हरिपंडिताने शंकराचार्यांना पत्र लिहून कळविलें : 'एकनाथ पाखंडी आहे. तो खरा भक्त नाहीं. तो भक्तीचा बुरखा पांघरून लोकांना उलट्या

वाटेने नेत आहे.' म्हणून शंकराचार्यांनी स्वत: या गोष्टीची चौकशी करून एकनाथाला शिक्षा करण्याचा विचार केला.

शंकराचार्यांनी एकनाथाला पत्र लिहून कळविलें : 'तुमच्यावर दोषारोपण आहे. जोपर्यंत त्याचें निरसन होत नाहीं तोपर्यंत तुम्ही प्रवचनें करूं नयेत. तुम्ही काशीला या व काशीच्या पंडितांचें समाधान करा.' त्या काळात शंकराचार्यांना फार मोठी सत्ता होती. सर्व भारतवर्षात त्यांच्या शब्दाला महत्त्व होतें.

तें पत्र पाहून गिरिजाबाई उदास झाली. एक तर हरिपंडित निघून गेला त्याचें दु:ख होतेंच त्यात ही शंकराचार्यांची आज्ञा! एकनाथाने तिचें सांत्वन केलें. 'वेडे! याच्यात शोक करण्यासारखें आहेच काय? सर्व लोक गंगास्नान करण्याचा जीवनात संकल्प करतात. काशीला जातात. गंगेत स्नान करून पवित्र होतात. आपण असा संकल्प केला नव्हता. म्हणून काशीविश्वेश्वराने भेटायचा संदेश पाठविला आहे. आपण काशीमध्ये गंगेचें स्नान केल्याशिवाय राहिलो तर? पहा तर खरें; भगवंत आपली किती काळजी घेत आहे!'

एकनाथ व गिरिजाबाई काशीला जायला निघाली. त्यावेळची यात्रा म्हणजे आजच्याप्रमाणे 'रिटर्न' तिकीट काढून होत नव्हती. भगवंताचें नाम घेत घेत गांवोगांवी भगवद्विचार सांगत त्यांनी काशी गाठली. शंकराचार्यांची भेट घेतली. शंकराचार्य म्हणाले : 'तुमच्यावर तीन आरोप आहेत. (१) तुम्ही वेदांचें महत्त्व घटवलें आहे. (२) वेदांतील सिद्धांत प्राकृतात लिहून संस्कृत भाषेचें महत्त्व कमी केलें आहे. (३) भक्तीचा मोठेपणा कमी करून लोकांना उलट्या रस्त्याने घेऊन जात आहात. जोपर्यंत या आरोपांचें निराकरण होत नाहीं तोपर्यंत तुम्हाला काशीविश्वेश्वराचें दर्शन करता येणार नाहीं.'

एकनाथाने शंकराचार्यांची आज्ञा शिरसा मान्य केली.

दुसऱ्या दिवशीं अरुणोदयापूर्वी एकनाथ गंगेत स्नानाला गेला. गंगामातेला काय वाटलें असेल! हजारों लोक माझ्या पाण्यात स्नान करून



आपली मलिनता धुतात. पण त्यांनी माझ्या पाण्यात सोडलेली मलिनता कोण धुणार? असे पुण्यशील जीव माझ्या पाण्याने स्नान करतील तेव्हा ती मलिनता जाते. आई स्वत:चे हात लांब करून बालकाला छातीशी लपेटून घेते त्याप्रमाणे गंगामाईने एकनाथाला स्वत:च्या निर्मळ पवित्र जळात उचलून घेतलें. आज गंगा कृतकृत्य झाली. तिच्या संपर्काने एकनाथ देखील वेडा झाला होता. खरें तीर्थ एकनाथ होता. गंगामातेला देखील त्याचें चरणतीर्थ घ्यावें असें वाटलें.

एकनाथ आंघोळ करून रुद्रसूक्त म्हणत म्हणत येत होता. इतक्यात या पवित्र ब्राह्मणाची मस्करी करण्यासाठीं एक पानपट्टीवाला वेश्येच्या घराच्या खिडकीतून पान खाऊन एकनाथावर थुंकला. एकनाथाने वर पाहिलें. कांहीं न बोलता परत नदीवर गेला आणि आंघोळ केली. परत येताना पुन्हा तो फिदीफिदी हसून एकनाथावर थुंकला. कांहीं न बोलता एकनाथ पुन्हा आंघोळीला गेला. अशा रीतीने एकशें आठ वेळा तो माणूस थुंकला. आणि एकशें आठ वेळा एकनाथाने आंघोळ केली. केवढा धीर असेल एकनाथाचा! सर्वशक्तिमान् असूनही त्याचा संयम सुटला नाहीं. मानवाच्या धैर्याची ही पराकाष्ठा होय. शेवटी तोच माणूस कंटाळला व एकनाथाच्या चरणीं लागला, माफी मागितली. एकनाथाने त्याला प्रेमभराने उभें केलें आणि म्हटलें : 'भल्या माणसा! तू कांहींच वाईट केलेलें नाहीस. तू माझ्यावर फार मोठा उपकार केलेला आहे. एकशें आठ वेळा गंगास्नान करून माझी सारी पातकें धुतली गेली आहेत. मी जेव्हा गुरुगृहीं होतो तेव्हा शत्रूंनी गुरूच्या किल्ल्यावर आक्रमण केलें होतें. तलवार घेऊन मी लढत राहिलो. तें सारें हिंसेचें पातक आज धुतलें गेलें.' एकनाथाच्या या भाषणाने तो माणूस शरमिंदा झाला. स्वत:च्या या वर्तनाबद्दल त्याला पश्चात्ताप झाला व एकनाथाचें गुणगान करीत निघून गेला.

जसा एखाद्या सम्राटाचा दरबार भरतो, त्या दरबारात पाखंडी राजा, सेनाधिपति व सर्व राज्याधिकारी आपापल्या आसनावर आसनस्थ असतात त्याप्रमाणें शंकराचार्यांचा दरबार भरला होता. काशीचे सर्वच पंडित न्यायचूडामणि, व्याकरण वाचस्पति, तर्कवादी विद्याभूषण, तर्कतीर्थ वगैरे दरबारात शोभत होते. एकनाथाचा न्याय व्हायचा होता.

एकनाथाला पंडितांच्या या दरबारात हजर करण्यात आलें. त्याच्या वरचा आरोप जाहीर करण्यात आला. तू वेदान्ताचे सिद्धांत लोकांना प्राकृत भाषेत सांगत फिरतोस. वेद फक्त गीर्वाण भाषेतच सांगितले पाहिजेत. अमृत सोन्याच्या पेल्यातूनच प्यायलें पाहिजे. संस्कृत देवांची भाषा आहे. या दैवी भाषेतच दैवी, वैदिक वाङ्मयाचा प्रचार झाला पाहिजे.

एकनाथ म्हणाला : 'संस्कृत भाषा देवाने निर्माण केली आणि प्राकृत भाषा काय चोरांनी आणली? माझ्या या प्राकृत लिखाणात एक जरी अपसिद्धांत मिळाला अथवा वेदविरोधी शब्द निघाला तरी मी माझें सारें वाङ्मय स्वत:च्या हाताने गंगेत बुडवीन.'

'तर मग तुम्ही भागवत पुराण घ्या व त्यातील औपनिषदिक भक्ति सांगा.'

पंडितधुरीणांच्या त्या दरबारात एकनाथाने भागवतातील वैदिक भक्ति सांगायला सुरुवात केली. गुरूंच्या सहवासात घडलेलें अध्ययन शब्दांमार्फत प्रकट होऊं लागलें. मणिकर्णिका घाटावर अर्थवाही शब्दफुलांची वाग्धाराच एकनाथाने वाहवली. संस्कृत भाषेतील अर्थ मराठीत व्यक्त करण्याची नाथाची हातोटी पाहून ते पंडित अचंबित झाले. मूळ ग्रंथातील प्रतिपादनात अंशमात्रही फरक न करता त्यातील भावार्थ सुंदर रीत्या प्रकट करण्यात आला होता. काशीक्षेत्रीं गुप्त सरस्वतीच प्रकट झाल्याचा सकळांना आनंद झाला. वैदिक भक्तीपासून वंचित झालेल्यांना ती पवित्र वाणी ऐकून जीवन कृतकृत्य वाटलें. एकनाथाच्या एकधार भक्तिपूर्ण वाणीच्या प्रवाहात स्नान करता करता ते सर्व शास्त्री डोलूं लागले. नाथाचा अस्खलित वाक्प्रवाह तीन तास चालू होता. तरी देखील कोणाला उठावें असें वाटलें नाहीं. उलट एकनाथाला विनंति करण्यात आली, कीं जेवल्यानंतर देखील प्रवचन चालू असावें. ठिकठिकाणाहून लोग श्रवणाला येत. गंगामातेच्या सान्निध्यात रुक्मिणी-स्वयंवराच्या रूपाने जिवा-शिवाची मंगल विवाहकथा नाथाने सांगितली.



केवळ भावपूर्ण बोलणें हें हाडाशिवाय असलेल्या मांसाच्या गोळ्या सारखें आहे. असल्या वाणीला आकार नाहीं. नाथाची ही पावन वाणी ऐकताच पंडितांच्याने राहावलें नाहीं. तीन-तीन दिवस या ज्ञानगंगेचा अस्खलित प्रवाह वहात राहिला. श्रोते, सारे पंडित कृतार्थ झाले. त्यांनी एकनाथाची माफी मागितली व एकनाथाला पालखीत बसवून त्याची मिरवणूक काढायला तयार झाले. एकनाथ म्हणाला : 'माझी पालखीतून मिरवणूक नको मी तुमच्यातला एक माणूस आहे.'

पंडित म्हणाले : 'तुमच्यावर आरोप करण्याचें एक महत् पाप आम्ही केलेलें आहे तेव्हा तुमची पालखी नाहीं वाहिली तर आमच्या पापाचें क्षालन होणार नाहीं.'

'बंधुंनो! तुम्हाला पालखी उचलायची असेल तर ती माझी न उचलता वैदिक उपनिषदांचे सिद्धांत ज्याच्या आधारे मी तुम्हाला सांगितले त्या भागवत ग्रंथाची पालखी उचला. तो ग्रंथ भगवंताच्या, काशीविश्वेश्वराच्या चरणावर वहा.' एकनाथाने विनंति केली.

हर्षातिशयाने वेडे झालेले पंडित भागवत ग्रंथ पालखीत घेऊन गेले. त्याची पालखी उचलली व खांद्यावर घेऊन नाचत - गात विश्वेश्वर भगवंताच्या चरणावर तो ग्रंथ त्यांनी अर्पण केला. त्या दिवसापासून आजपर्यंत भागवत सप्ताहानंतर भागवताची मिरवणूक निघत असते.

काशी विश्वेश्वराचें दर्शन करून एकनाथ कृतकृत्य झाला. आनंदाने त्याचें हृदय पुलकित झालें.

'काशीयात्रा झाली तरी देखील यात्रा अपूर्ण मानतात. जेव्हा काशीचें तीर्थ रामेश्वरी पोचविलें जातें तेव्हा ती यात्रा पूर्ण होते.' असा कुणा पंडिताने एकनाथाला सल्ला दिला व एकनाथ काशीच्या सर्व पंडितांसह रामेश्वराच्या यात्रेला निघाला. रामेश्वरावर अभिषेक करण्यासाठीं गंगाजळ देखील घेतलें. ते सर्व गांवोगांव फिरत जात होते. लोकांना समजवीत होते. 'तुम्ही जीवनात हताश होऊं नका. प्रभूने रडण्यासाठीं जीवन दिलेलें

नाहीं. तुमचें जीवन प्रभु चालवीत असतो. याच्यावर श्रद्धा ठेवा.' याप्रमाणे हजारो लोकांना सांत्वना देत ते रामेश्वराजवळ येऊन पोचले.

उन्हाळ्याचे दिवस होते. आकाशात सूर्य आणि खाली वाळू तापत होती. रस्त्यात एक गाढव पाण्यावाचून तडफडत होतें. आजूबाजूला कुठेच पाणी नव्हतें. गाढवाची तहान कशी भागणार? सर्वांसमोर समस्या उभी राहिली. एकनाथाने तें पाहिलें. त्याने उद्धवाला बोलावून सांगितलें : 'रामेश्वर भगवंतासाठीं घेतलेलें गंगाजळ आण.' आणि एकनाथाने तें गंगाजळ गाढवाला पाजलें.

केवढ्या श्रद्धेने ते गंगाजळ घेऊन जात होते! रामेश्वराला त्या पवित्र पाण्याने आंघोळ घालावी म्हणून घेतलें होतें. पण तें एका गाढवाला पाजलें. गाढव आनंदाने उभें राहिलें. लोकांनी विचारलें : 'नाथ! एवढ्या श्रद्धेने सहा-सहा महिन्यांच्या तपश्चर्येनंतर एवढ्या दुरून आणलेलें गंगाजळ रामेश्वराला वाहायचें सोडून एका गाढवाला पाजलेंत? गाढव मेलें असतें तर कुणाचें काय अडणार होतें?'

एकनाथ म्हणाला : 'अहो, गाढवावरचा हा शरीररूपी अंगरखा काढून टाका आणि मग पाहा; म्हणजे माहीत होईल, कीं रामेश्वर व या गाढवातील मसाला एकच आहे!' **सर्वभूतहितेरताः** या गीतावाक्याची साक्षात् मूर्ति म्हणजे संत एकनाथ.

तीर्थयात्रा पुरी झाल्यावर एकनाथ घरीं परत आला. भारतविजय मिळवून परत आलेल्या एकनाथाचें स्वागत करायला हजारों लोक वेडे होऊन उभे होते. जसा महासागर आपल्या हजारो लाटांसह किनाऱ्याला भेटायला आला होता. हजारों माणसें नाथमंदिरात जमा झाली. श्रीखंड्या अतिशय चलाख होताच. त्याने कोठारातून बरेंच धान्य मागवून घेतलें. त्यामुळें इकडे एक चमत्कार झाला. एका लहानशा तपेलीत शिजविलेलें अन्न हजारो जेवले.

लवकरच एकनाथाच्या वडिलांची श्राद्धतिथि आली. गिरिजाबाई म्हणाली : 'आज मामंजींचें श्राद्ध आहे. पांच ब्राह्मणांना बोलावून जेवूं



घालूं.' श्रीखंड्या म्हणाला : 'पांचाचें काय घेऊन बसलात. अखिल ब्राह्मणवृंद बोलवा ना! मी सारा स्वयंपाक बनवून देतो.'

स्वयंपाक तयार झाला. ब्राह्मण जेवायला यायच्या तयारीत होते. इतक्यात नाथमंदिराजवळून जाणाऱ्या भुकेलेल्या भिकाऱ्यांना नाथाच्या घरात शिजत असलेल्या स्वयंपाकाचा सुगंध लागला. ते भिकारी थांबले. त्यांनी जेवण मागितलें. उद्धवाने सांगितलें : 'ब्राह्मण जेवून गेल्यावर जेवणें वाढूं. तोपर्यंत तिकडे दूर बसा.'

एकनाथाला त्या क्षुधातुर भिकाऱ्यांची व्याकुळता सहन झाली नाहीं. त्याच्या मनात आलें, 'ही देखील माणसेंच आहेत ना! ब्राह्मणांना खायला मिळणारें अन्न हे लोक एक दिवसी खाऊं शकत नाहीत?' प्रत्येक मानव ईश्वराचा पुत्र आहे असें मानणाऱ्या नाथाचें हृदय कारुण्याने भरून आलें. त्याने उद्धवाला सांगितलें : 'सर्वांना पोटभर जेवूं वाढा.'

या भिकाऱ्यांचें केवढें महत्‌भाग्य असेल! ब्राह्मणांसाठीं बनविलेलें व तें सुद्धा श्रीखंड्याने बनविलेलें भोजन त्यांना जेवायला मिळालें!

सर्व ब्राह्मण जेवायला आले. पाहतात तर भिकारी जेवत होते. त्यांना राग आला. आम्ही जेवण्यापूर्वी हे भिकारी जेवतात? हा आमचा धडधडीत अपमान आहे. एकनाथ म्हणाला : 'जरा शांतपणे ऐकाल कीं नाहीं? हें सारें जेवण तुम्हा सर्वांसाठींच बनविलेलें होतें. पण हे भिकारी आले. स्वयंपाकाच्या वासाने गुदमरून गेले. त्यांनी वास घेतलेलें उष्टें, जेवण तुम्हा सर्वांना कसें बरें वाढायचें? तसें केलें तर माझ्यावर दोष येईल.' त्यावर एकजण म्हणाला 'वास घेतल्याने अन्न कधी उष्टें होतें होय!' 'सौत्रामणि यज्ञात जेव्हा मदिरेचा नैवेद्य दाखवतो तेव्हा आपण मदिरा पीत नाहीं. फक्त तिचें अवग्रहण करतो. म्हणजे प्यायल्यासारखें होतें. त्याचप्रमाणे या भोजनाचेंही भिकाऱ्यांनी अवग्रहण केल्यामुळें तें उष्टें नाहीं कां झालें? मग माझ्यासारख्याकडून तें तुम्हाला कसें बरें वाढलें जाईल?' सौत्रामणि यज्ञाप्रमाणे दुसरी दोन चार उदाहरणें देऊन एकनाथाने ब्राह्मणांचें समाधान केलें. पुन्हा स्वैपाक बनविला व ब्राह्मणांना जेवविलें.

*****

एकदा एक दंडवत् संन्यासी फिरत फिरत तेथे आला. त्याच्या मनात एकनाथाबद्दल प्रेम होतें एकनाथाचें वचन त्याला वेदवचनाप्रमाणें वाटलें. तो येत असताना त्याला एक मेलेलें गाढव दिसलें. त्या मृत गाढवाला पाहाण्यासाठीं लोक टोळी टोळीने जमा होत होते. त्याच्यासमोर त्या संन्याशाने म्हटलें, 'या चैतन्याला माझा नमस्कार!' आणि आश्चर्य असें कीं तें गाढव आळस झाडून उभें राहिलें. गांवात या संन्याशाच्या सिद्धिसाधनेबद्दल गोष्टी होऊं लागल्या. एकनाथाने त्या संन्याशाला म्हटलें : 'तुम्ही हें योग्य केलें नाहीं. अयोग्य रीतीने तुम्ही आपली सिद्धि वापरली आहे. लोक चमत्काराच्या नादाला लागले तर त्यांचा जीवनविकास थांबेल. तुम्ही फार मोठा अनर्थ केलेला आहे. लोक तुम्हाला त्रास देतील. मेलेल्यांना जीवंत करण्यासाठीं तुमच्याकडे येतील. नियतीसमोर देखील समस्या उभी राहील.'

'मग मी काय करूं? या चुकीला प्रायश्चित्त काय?'

'आता फक्त एकच रस्ता आहे. देहत्याग!' एकनाथाने सल्ला दिला. त्या संन्याशाने तत्काळ हरिचिंतन करत करत समाधी घेतली.

*****

एकनाथाचें जीवन नजरेसमोर ठेवून लोक जगत होते. एकनाथ देखील प्रभुकार्यात निमग्न राहून कालक्रमण करीत होता. तेवढ्यात द्वारकेचा एक ब्राह्मण एकनाथाचें घर विचारीत नाथमंदिरात आला.

एकनाथाने प्रेमाने त्याचें आगत-स्वागत करून विचारलें : 'आगमनप्रयोजनं किम्' ब्राह्मणाने सांगितलें : 'द्वारकेचा द्वारकाधीश हरवला आहे. वैकुंठाचा नाथ जगन्नाथ तुमच्या घरीं आहे.' एकनाथ म्हणाला : 'असें असेल तर माझ्या भाग्याला तोडच नाहीं. जन्मोजन्मीच्या माझ्या पापाचें क्षालन होईल. परंतु देवा! माझ्या घरी श्रीखंड्या, हा उद्धव आणि माझी पत्नी यांच्याशिवाय कोणीच नाहीं.'

'तो श्रीखंड्या कुठे आहे तो दाखवा.'



परंतु श्रीखंड्या घरात नव्हता. घराचा कोनाकोपरा शोधला. त्याचा पत्ता लागला नाहीं. गिरिजाबाईला विचारलें. ती म्हणाली : 'कपडे धुवायला गेला असेल.' साऱ्या गांवात श्रीखंड्याचा शोध केला पण तो सापडला नाहीं.

सगुण भगवान् अज्ञात राहून जीवाची, साऱ्या जगाची सेवा करीत होता. पण माहीत होताच जगाची सेवा करायला आलेला भगवान् निघून गेला. एकनाथाच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.

'मी गुरुगृही होतो तेव्हा भगवंता! तू मला भेटायला आला होतास. माझ्याजवळून गेलास. मी ओळखूं शकलो नाहीं. आणि आज देखील माझ्या घरात राहून तू काय नाहीं केलेंस? माझें घर सुद्धा सारवलेंस, जेवण बनवून तू मला जेवूं घालत होतास तरी देखील मी तुला ओळखलें नाहीं. तुझ्याकडून कसली कसली कामें मी करून घेतली! भगवंता! क्षमा कर.' एकनाथ शोकविव्हळ झाला.

'साक्षात् भगवंत स्वत:च्या घरात राहिला पण त्याला ओळखूं शकलो नाहीं. त्याच्याकडून एका नोकरासारखें काम घेतलें. मी हा केवढा मोठा अपराध केला?' या शोकाने एकनाथ खूप रडला. पुन: पुन्हा स्वत:च्या अपराधाबद्दल भगवंताची क्षमा मागितली. गिरिजाबाई तर बातमी समजताच रडूं लागली. तिच्या नजरेसमोर घरातील प्रसंग उभे राहूं लागले. श्रीखंड्याला ती एकेरी नांवाने संबोधत होती. कित्येक वेळा रागानेही बोलली होती. तिला तिचा अपराध असह्य झाला.

आपल्याही जीवनात असा प्रसंग यावा! भले, आपणही अशाप्रकारे गुन्हेगार झालो तर! त्याची कृपा मागताना सांगूं : भगवंता! आमच्याही जीवनात असा एखादा प्रसंग आण!

एकनाथ देवघरात जाऊन भगवंताजवळ खूप रडला. 'प्रभो! हें रडणें माझ्या नशिबी लिहिलेंच होतें कां? सारी जिंदगी संपत आली तरी देखील मी तुझ्या दर्शनापासून वंचित राहिलो. प्रभो! तू माझ्या घरी आलास,

राहिलास, चाकरी केलीस आणि मीच तुला ओळखूं शकलो नाहीं. कारण, माझ्या नशिबी रडणें लिहिलें होतें!' नाथाने आर्त स्वरांत हाक मारली : मधुसूदना, लक्ष्मीनारायणा,.... श्रीखंड्या..... तू कुठे आहेस.' जीवनात प्रथमच नाथ इतका आर्त बनून अश्रू ढाळत होता.

तेवढ्यात त्याच्यासमोर साक्षात् भगवंत उभा असलेला दिसला. त्याच्या त्या चतुर्भुज रूपात श्रीखंड्याच्या कावडीसहितच्या रूपाचीही झाक नाथांना जाणवली.

**तुज मज नाहीं भेद केला सहज विनोद**

भगवंत नाथांना प्रेमभराने भेटला, त्यांचे अश्रू पुसले. करोडों जन्मांच्या परिपाकातून साक्षात् जगन्नियंत्याचें दर्शन झालें तेव्हा त्यांचें जीवन धन्य बनलें, कृतकृत्य झालें.

त्यानंतर एकनाथांना सतत वाटूं लागलें. आता या जीवनात अर्थ नाहीं व चार दिवसांच्या लहानशा आजारात त्यांचें देहावसान झालें. या विश्वातील सौंदर्य विलोप पावलें. जगाचें सौभाग्य हरपलें. सृष्टीचें एक अति सुन्दर, मकरंद भरलेलें पुष्प कोमेजलें.

एकनाथांचें अंत्यदर्शन घ्यायला लोकांची खूप गर्दी जमली. ज्याने हजारों मुडद्यासारख्या जीवनांत प्राण फुंकला होता आणि आज तोच स्वत: निश्चेष्ट होऊन चिरनिद्रा उपभोगीत होता. पृथ्वीचा लाल गेला, सृष्टीचा अलंकार गेला!

एकनाथ म्हणजे जीवनाचें सौंदर्य! एकनाथ म्हणजे जीवनाची तेजस्विता. जीवनाचा दरवळणारा मकरंद. त्यांनी प्रचंड बुद्धि व श्रद्धा यांना एकत्र विणून जीवनाचा सुंदर पट तयार केला होता. म्हणूनच जगदीशाला त्यांच्या घरीं यायचा मोह झाला.

तरुण मुलाचा मृत्यु पाहून ज्याप्रमाणे आई हृदय फाडून हंबरते व रडते त्याप्रमाणे लोक एकनाथांचा मृत्यु पाहून रडले. ज्यांना दर्शन झालें



नाहीं त्यांना संदेश मिळाला. भारतभर चूल पेटली नाहीं. अन्नाचा एक घास कुणाच्या मुखात गेला नाहीं.

सारेच, ब्राह्मण व अब्राह्मण, त्यांच्या अन्त्यदर्शनाला उभे होते. ब्राह्मणांनी त्यांचें शव उचललें. शास्त्री-पंडितांनी खांदा दिला. एकाने सहज विनोद केला : 'पाहिलेंत! एकनाथांनी जीवंत असताना आम्हा ब्राह्मणांना प्राधान्य दिलें नाहीं. पण मेल्यानंतर आता आम्हालाच उचलावें लागलें कीं नाहीं?'

तें ऐकताच तिरडीवरचा निश्चेतन देह सजीव झाला. त्यानी हरिपंडितालाही हाक मारली : 'या लोकांना माझा देह उचलताना त्रास होतोय, मी जलसमाधि घेतो.'

ब्राह्मणांनी क्षमा मागून म्हटलें : 'अशा प्रकारची क्षुद्र गोष्ट बोलल्याबद्दल आम्हाला लाज वाटते. आम्हाला क्षमा करा.' एकनाथांनी त्यांना क्षमा केली.

नामस्मरण करता करता हळूहळू नाथांनी गोदावरीच्या जळात प्रवेश केला. कमरेइतक्या पाण्यातून सर्वांचा निरोप घेताना त्यांनी सांगितलें : समाजात चालणारी भ्रांत कल्पना आणि मान्यता हटविण्यासाठीं मी कधी कठोर शब्द वापरले असतील तर ते विसरून जा. मला विसरलात तरी चालेल पण मी जे सनातन सिद्धांत सांगितले ते वैदिक सिद्धांत कधी विसरूं नका. असें सांगून नाथांनी सर्वांना शेवटचा नमस्कार केला. आणि गोदावरीमातेने प्रेमाने या आपल्या लाडक्या लेकराला कवेत घेतलें.

अशी ती पुण्यशील व्यक्ति तेजात विलीन झाली.

फाल्गुन वद्य षष्ठीला हा प्रभूचा लाल नश्वर संसारातून कायमचा निघून केला. त्याची स्मृति म्हणून फाल्गुन वद्य षष्ठीला आज सुद्धा लोक नाथांच्या पुण्यतिथीचा उत्सव साजरा करतात. त्या षष्ठीला **नाथषष्ठी म्हणतात.**

